नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका

**महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ,**
**'बालभारती', सेनापती बापट मार्ग, पुणे ४११ ००४**

## पाठ्येतर प्रकाशने

पाठ्यपुस्तक मंडळाने तयार केलेली पाठ्येतर प्रकाशने, साहित्य व अन्य साहित्य मंडळाच्या गोरेगाव (मुंबई), पुणे, नागपूर, औरंगाबाद, लातूर, नाशिक व कोल्हापूर येथील विभागीय भांडारात तसेच अमरावती येथील उपभांडारात उपलब्ध आहेत. या पाठ्येतर पुस्तकांमध्ये इ. १ ली ते ७ वीच्या शिक्षकांसाठी शिक्षक मार्गदर्शिका, संस्कार वाचनमाला, इ. २ री ते ४ थी (प्रत्येक इयत्तेसाठी दोन पुस्तके) व अन्य पाठ्येतर पुस्तके उपलब्ध आहेत. या संदर्भात शैक्षणिक संस्था, जिल्हा परिषदा, शिक्षक, पालक व विद्यार्थी यांना आवाहन करण्यात येते की, त्यांनी हे साहित्य व पाठ्येतर प्रकाशने संबंधित भांडार व उपभांडारातून खरेदी केल्यास प्रत्येक प्रतीवर २० टक्के वटाव देण्यात येईल.

तरी या योजनेचा सर्व संबंधितांनी लाभ घ्यावा.

वरील पाठ्येतर प्रकाशनाखेरीज मंडळाने आदर्श शिक्षकाची आत्मचरित्रे प्रकाशित केली आहेत. यात 'माझे जीवन माझी बाळं' (कै. दादासाहेब रेगे यांचे आत्मचरित्र) व 'जीवनगाथा' (श्रीमती राधाबाई शेवडे यांचे आत्मचरित्र) मंडळाने प्रकाशित केले आहे. शिवाय 'कथा स्वातंत्र्याची' व 'वंद्य वंदेमातरम्' यासारखी स्वातंत्र्यलढ्यावरील दर्जेदार पुस्तकेही सवलतीच्या दरात उपलब्ध करून दिली आहेत.

| क्र. | पुस्तकाचे नाव | मूळ किंमत | वटाव/सवलत |
|---|---|---|---|
| १. | माझे जीवन माझी बाळ | रु. ३७.५० | |
| २. | जीवनगाथा-राधाबाई शेवडे आत्मचरित्र | रु.३२.५० | प्रत्येक प्रतीवर |
| ३. | आत्मकथा गांधीजी | रु. २६.०० | २० टक्के वटाव |
| ४. | कथा स्वातंत्र्याची | रु. २८.८० | |
| ५. | वंद्य वंदेमातरम् | रु. ३०.०० | |
| ६. | 'किशोर मासिक' | रु. ५.०० | वार्षिक वर्गणी रु. ५०/- |
| ७. | गोष्ट स्वातंत्र्यलढ्याची | रु. ११.८० | वटाव नाही. |
| ८. | शिल्पकार स्वातंत्र्याचे | रु. १२.०० | वटाव नाही. |

वरील पुस्तकांसाठी खालील विभागीय भांडार/उपभांडारात संपर्क साधावा. (कंसात फोन क्रमांक)

भांडार व्यवस्थापक,
पाठ्यपुस्तक भांडार व वितरण केंद्र
१. 'बालभारती' सेनापती बापट मार्ग,
पुणे ४११ ००४ (३३०४६७)
२. १०. उद्योगनगर, एस. व्ही. रोड,
गोरेगाव (प.) मुंबई ४०० ०६२ (८७४४०७१)
३. एम. आय. डी. सी. शेड नं. २/३,
रेल्वे स्टेशनजवळ,
औरंगाबाद ४३१००१ (२९४२७)
४. 'बालभारती' रवींद्रनाथ टागोर
सायन्स कॉलेजसमोर, महाराजा बाग रोड
नागपूर ४४००१२ (५२३०७८)
५. प्लॉट नं. एफ ९१, एम. आय. डी. सी.,
लातूर ४१३ ५३१ (२८८७)
६. प्लॉट नं. २४, 'माघ' सेक्टर, लेखानगरजवळ,
सिडको, नवीन मुंबई-आग्रा रोड,
नाशिक ४२२००९ (२९२६५)
७. 'बालभारती', पी-४१, औद्योगिक वसाहत,
मुंबई-बगलोर महामार्ग, 'सकाळ' कार्यालयासमोर,
कोल्हापूर ४१६००५ (६५४५२१/ ६८५७६)

**सहायक भांडार व्यवस्थापक,**
पाठ्यपुस्तक उपभांडार व वितरण केंद्र,
'पुष्करभवन' चौबे प्लॉट, राधानगर,
अमरावती ४४४६०३ (७९०८९)

अनुक्रमणिका

# अंतरंग



(लेखांतील मतांशी महाराष्ट्र साहित्य परिषद सहमत असेलच, असे नाही.)

# संपादकीय

### श्री. नारायण सुर्वे यांचे अभिनंदन

परभणी येथे येत्या जानेवारीमध्ये भरणाऱ्या अडुसष्टाव्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदी निवड झाल्याबद्दल ज्येष्ठ कवी श्री. नारायण सुर्वे यांचे अभिनंदन.

आपण निवडून आलेलो आहोत हे कळल्यावर श्री. सुर्वे यांनी जी प्रतिक्रिया व्यक्त केली ती त्यांच्या अस्सल वाङ्मयीन आस्थेची, विशेषतः कवितेवरील आंतरिक निष्ठेची द्योतक आहे. ते म्हणाले, "आगामी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावर झालेली माझी निवड हा मी केवळ माझा एकट्याचा गौरव मानत नाही. माझ्या निवडीमुळे संपूर्ण कविकुलाचाच यथोचित गौरव झालेला आहे. तसेच, १९६० नंतर मराठी वाङ्मयामध्ये जे अनेक प्रवाह आविष्कृत होऊ लागले, त्यांचा सत्कार होत आहे याचा मला विशेष आनंद वाटतो."

साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावर आपल्यासारख्या कवीची निवड व्हावी याचे श्री. सुर्वे यांना विशेष समाधान वाटणे स्वाभाविक आहे. कारण कविता या माध्यमाविषयी त्यांना जेवढा जिव्हाळा वाटतो तेवढा तो इतर कशासंबंधी वाटत नाही. कविश्रेष्ठ कुसुमाग्रज यांची १९६४ मध्ये मडगाव येथे झालेल्या संमेलनाच्या अध्यक्षपदावर निवड झाली होती. त्यानंतर तब्बल तीस वर्षांनी हा सन्मान एका कवीला प्राप्त होत आहे.

दुसरे महायुद्ध, स्वातंत्र्यप्राप्ती आणि महाराष्ट्र राज्याची निर्मिती या आंतरराष्ट्रीय, राष्ट्रीय आणि राज्य पातळीवरील तीन ऐतिहासिक महत्त्वाच्या घटनांमुळे १९४० पूर्वीचा काव्याविष्कार आणि १९६० नंतरचे कवितालेखन यांत केवळ अभिव्यक्तीच्या बाबतीतच नव्हे, तर आशयाच्या दृष्टीनेही वेगळेपणा येणे अपरिहार्य ठरले. १९६० पासून मराठी कवितेने जे नवे वळण घेतले त्याचे प्रातिनिधिक प्रतिबिंब श्री. नारायण सुर्वे यांच्या कवितेमध्ये स्पष्टपणे उमटलेले आहे. सुर्वे वाढले ते कामगारवर्गात. त्यामुळे अव्याहत काबाडकष्ट करून आपला आणि आपल्या कुटुंबियांचा उदरनिर्वाह करणाऱ्या श्रमिकवर्गाला कोणते जीवन जगावे लागते, कशा प्रकारच्या व्यथावेदना सोसाव्या लागतात, याचा त्यांना साक्षात अनुभव घेता आला आणि आपल्या प्रतिभेच्या बळावर त्यांनी तो कविताबद्ध केला. तो अनुभव अत्यंत सच्चा आणि प्रामाणिक असल्यामुळे, सुर्वे यांच्या कवितेने मराठी साहित्यविश्वामध्ये स्वतःचे स्वतंत्र स्थान निर्माण केले. घरच्या आर्थिक ओढगस्तीमुळे, श्री. सुर्वे यांना उच्च शिक्षण घेता आले नाही. परंतु त्यांचे 'ऐसा गा मी ब्रह्म', 'माझे विद्यापीठ,' 'सनद' हे काव्यसंग्रह महाविद्यालयीन आणि विद्यापीठीय अभ्यासक्रमात समाविष्ट होऊन गेले.

श्री. सुर्वे मार्क्सवादी असले तरी त्या विचारसरणीच्या मर्यादांचे त्यांना भान असल्यामुळे शोषितांच्या आणि उपेक्षितांच्या अपेक्षांना वाचा फोडणारी त्यांची कविता प्रचारकी थाटाची होऊ शकली नाही. दु:खितांच्या आसवांना त्यांनी काव्यरूप दिले, परंतु या गहिवराचा त्यांनी कधीही बाजार मांडला नाही. आपल्या विचारांशी आणि अनुभूतींशी असलेली बांधिलकी सुर्वे यांनी कलावंताच्या निष्ठेने जोपासली आणि म्हणूनच वेगवेगळे प्रवाह मराठी कविता समृद्ध करीत असतानाही सुर्वे यांचे लेखन सदैव अग्रभागी राहिलेले आहे.

**प्राचीन वाङ्मयाचा अभ्यासक हरपला**

प्राचीन मराठी भाषेचे, संतसाहित्याचे आणि लोकसंस्कृतीचे व्यासंगी अभ्यासक डॉ. शं. गो. तुळपुळे यांचे ३० ऑगस्ट रोजी निधन झाले. त्यांच्या देहावसानामुळे जुन्या वाङ्मयाचे यथायोग्य मूल्यमापन करणारा विद्वान हरपला आहे. डॉ. तुळपुळे यांचे वैशिष्ट्य असे की, ते मराठी भाषेचे अभ्यासक म्हणून ओळखले ,जात असले, तरी त्यांची ख्याती केवळ मराठी मुलुखापुरती मर्यादित राहिली नाही. त्यांचे मराठीइतकेच इंग्रजीवरही प्रभुत्व होते आणि त्यामुळे मराठी वाङ्मयासंबंधीच्या त्यांच्या संशोधनाला आणि निष्कर्षांना आंतरराष्ट्रीय प्रतिष्ठा प्राप्त होऊ शकली.

मुंबई विद्यापीठातून एम्.ए. आणि पीएच.डी. या पदव्या संपादन केल्यानंतर डॉ. तुळपुळे यांनी काही काळ बेळगाव आणि सोलापूर येथे अध्यापन केले. पुणे विद्यापीठाची स्थापना झाल्यानंतर ते तेथे मराठी विभागाचे प्रमुख म्हणून रुजू झाले आणि हे पद त्यांनी १९५० पासून १९६८ पर्यंत सांभाळले. विभागप्रमुखाची जबाबदारी पार पाडत असताना, डॉ. तुळपुळे यांनी आपल्या आवडत्या विषयाकडे म्हणजे संतसाहित्याच्या अभ्यासाकडे दुर्लक्ष होऊ दिले नाही, यावरून या क्षेत्रामध्ये ते किती रममाण होत असत याची कल्पना देतो. 'पाच संतकवी,' 'गुरुदेव रानडे यांचे चरित्र,' 'यादवकालीन मराठी,' 'भक्तीचा मळा' असे त्यांनी पंचवीस ग्रंथ लिहिले. मराठी साहित्यविशेषांचा विश्वसाहित्याच्या विद्यार्थ्यांना परिचय व्हावा या हेतूने त्यांनी 'क्लासिकल मराठी लिटरेचर' यांसारखे काही ग्रंथ इंग्रजीमध्येही लिहिले. महाराष्ट्रातील लोकदेवतांसंबंधी समग्र अन् साधार माहिती मिळविण्यासाठी डॉ. सोनथायमर हे जर्मन प्राध्यापक अधूनमधून महाराष्ट्रात वास्तव्यासाठी येत असत. या अभ्यासामध्ये डॉ. सोनथायमर यांना डॉ. तुळपुळे यांचे विशेष साहाय्य होत असे. डॉ. तुळपुळे यांचा या विषयातील अधिकार लक्षात आल्यामुळे जर्मनीतील हायडलबर्ग विद्यापीठाने त्यांची अभ्यागत प्राध्यापक म्हणून नियुक्ती केली होती. या नेमणुकीमुळे डॉ. तुळपुळे यांचे परदेशी जाणे-येणे होऊ लागले आणि त्यांचा युरोपमधील अनेक भाषाकोविदांशी निकटचा परिचय होऊ शकला.

डॉ. तुळपुळे यांनी अलीकडे जुन्या मराठी साहित्यातील शब्दांचा इंग्रजीमध्ये अर्थ विशद करणारा कोश लिहिण्याचे काम अंगिकारले होते आणि प्रकृती साथ देत नसतानाही,

चिकाटी बाळगून ते अवघड कार्य पूर्ण केले.

डॉ. शं. गो. तुळपुळे यांच्या निधनामुळे मराठी भाषा आणि साहित्य यांना आंतरराष्ट्रीय परिमाण प्राप्त करून देणाऱ्या व्यासंगी व्यक्तीला महाराष्ट्र मुकला आहे.

**'ठणठणपाळ' गेले**

कथा, कादंबरी, नाटक, विनोदी लेखन, स्तंभलेखन अशा अनेक साहित्य प्रकारांवर आपला ठसा उमटविणारे श्री. जयवंत दळवी १६ सप्टेंबर रोजी कालवश झाले. आपले दोन्ही मूत्रपिंड निकामी झालेले आहेत हे दळवींना वर्षा-दीड वर्षापूर्वी कळून आले आणि रक्तशुद्धीसाठी डायलेसिस करून घेणे आवश्यक झालेले आहे हे जाणवल्यापासून आपला अंतकाळ जवळ आलेला आहे, याची त्यांना कल्पना आली. तरीही मूळची प्रसन्न वृत्ती श्री. दळवी यांनी अखेरपर्यंत कायम राखली. भेटायला येणाऱ्यांचे ते अगत्याने स्वागत करीत, नर्मविनोद होत असत. नवोदित लेखकांसंबंधी, त्यांच्या लेखनासंबंधी पूर्वीइतकीच आस्था ते दाखवत. दळवी हे सभा-समारंभामध्ये ठळकपणे वावरणारे व्यक्तित्व नव्हते. तरीही त्यांनी केवळ लेखनाच्या बळावर आपला केवढा चाहतावर्ग निर्माण केलेला आहे, याचा प्रत्यय ४ सप्टेंबर रोजी त्यांचा जो सत्कार आयोजिला होता त्या वेळी आला. बोरिवलीसारख्या दूरच्या उपनगरातही पाऊस कोसळत असताना दळवींच्या गौरवासाठी असंख्य साहित्यरसिक आवर्जून उपस्थित राहिले.

दळवी यांनी कथांपासून आपल्या लेखनाला प्रारंभ केला. परंतु त्यांना विशेष लौकिक प्राप्त झाला तो त्यांच्या 'चक्र' या झोपडपट्टीवरच्या कादंबरीने. तेव्हापासून ते कादंबरी-लेखनाकडे वळले आणि पुढे कादंबऱ्यांबरोबर त्यांच्या नाट्यकृतीही लोकांसमोर सादर होऊ लागल्या.

'ललित' मासिकामध्ये जयवंत दळवी 'ठणठणपाळ' या टोपण नावाने 'घटिका गेली, पळे गेली' हे मिष्किल टीकाटिप्पणी करणारे सदर सतत वीस वर्षे लिहीत होते. साहित्यिकांच्या वर्तुळामध्ये हे सदर एवढे लोकप्रिय झाले की, 'ललित'चे ते एक मोठेच आकर्षण ठरले. ते लिखाण करताना, ज्यांच्यासंबंधी आपण लिहीत आहोत त्यांच्यापैकी कोणीही दुखावला जाऊ नये अशी दळवी काळजी घेत. त्यासाठी त्यांना मुद्दाम प्रयत्न करावा लागत नसे. आकस बाळगून एखाद्यावर लिहिणे हे त्यांच्या स्वभावतच नव्हते. दळवी यांच्या 'ठणठणपाळ'ने 'ललित' मधील सदरातून एक प्रकारे मराठी साहित्यसृष्टीचा धावता इतिहासच कथन केला आहे.

दळवींच्या निधनामुळे अनेकांचा परममित्र अस्तंगत झाला.

**इतिहासविषयक ज्ञानकोश**

महाराष्ट्राच्या इतिहासाचे मूलगामी आणि सर्वांगीण संशोधन करण्यात ज्यांनी आपले

सारे आयुष्य व्यतीत केले ते सेतुमाधवराव पगडी गेल्या १४ ऑक्टोबर रोजी निधन पावले. सेतुमाधवराव म्हणजे मराठ्यांचा इतिहासाचा एक चालता-बोलता ज्ञानकोशच होता. मराठी आणि इंग्रजीप्रमाणे सेतुमाधवरावांना उर्दू, कन्नड, फारसी आणि संस्कृत ह्या भाषाही अवगत होत्या. मोगलकालीन कागदपत्रे मुख्यतः फारसीमध्ये लिहिली गेली. त्या कागदपत्रांचा शोध घेऊन, त्यातून त्या काळातील व्यक्तींच्या कर्तृत्वाचे यथायोग्य मूल्यमापन करणे फारसीवरच्या प्रभुत्वामुळे पगडी यांना शक्य झाले. राज्यपुनर्रचनेनंतर म्हणजे १९५६ मध्ये हैद्राबाद सोडून सेतुमाधवराव मुंबईला आले, आणि तेव्हापासून त्यांनी इतिहास-संशोधनावर आपले लक्ष अधिकच केंद्रित केले. आजवर त्यांचे चौसष्ट ग्रंथ प्रसिद्ध झाले असून येत्या एक-दोन वर्षांत त्यांचे आणखी आठ ग्रंथ प्रकाशित होतील.

शिवाजीमहाराजांच्या क्रांतिकारक कार्यकर्तृत्वाचा सम्यक परिचय अमराठी लोकांना व्हावा या तळमळीतून श्री. पगडी यांनी छत्रपतींचे साडेतीनशे पानांचे इंग्रजी चरित्र लिहिले. त्यांचे हे शिवचरित्र नॅशनल् बुक ट्रस्टमार्फत, संक्षिप्त स्वरूपात का होईना, १४ भारतीय भाषांमध्ये प्रसिद्ध झाले.

**साक्षेपी संपादक**

वाङ्‌मयशोभा या दर्जेदार मासिकाचे संपादक आणि 'मनोहर ग्रंथमाला' या प्रकाशनसंस्थेचे संचालक श्री. मनोहरपंत केळकर यांचे ५ नोव्हेंबरला वार्धक्यामुळे निधन झाले. ते ८२ वर्षांचे होते.

श्री. म. म. केळकर हे साहित्यसम्राट न. चिं. केळकर यांचे पुतणे. तसेच मनोहरपंतांचे वडील महादेवराव आणि मातुश्री गिरिजाबाई यांचाही साहित्यक्षेत्राशी संबंध होता. घरातील या साहित्यप्रेमी वातावरणामुळे आपण मासिक आणि प्रकाशनसंस्था सुरू करायची असे मनोहरपंतांनी ठरविले आणि तो निर्धार त्यांनी प्रत्यक्षातही आणला. अन्य कोणाचेही वा कोणतेही पाठबळ नसताना एखादे मासिक पंचावन्न वर्षे चालू ठेवण्याची अनन्यसाधारण जिद्द मनोहरपंतांपाशी होती. आजच्या अनेक प्रथितयश लेखकांचे प्रारंभीचे लिखाण 'वाङ्‌मयशोभे' मध्येच प्रसिद्ध झाले होते, यावरून एखाद्याचे लेखनगुण ओळखण्याचे मनोहरपंतांपाशी केवढे कसब होते, याची कल्पना येते. अनेक वैचारिक हस्तलिखितांना मनोहरपंतांच्या पुढाकारामुळेच ग्रंथरूप लाभू शकले. मनोहरपंतांच्या निधनामुळे आस्थेवाईक संपादक आणि चिकित्सक प्रकाशक नाहीसा झाला आहे.

या सर्व श्रेष्ठ आणि ज्येष्ठ साहित्यकारांना विनम्र श्रद्धांजली.

**– वि. स. वाळिंबे**

# लीळाचरित्र : प्रक्षेप आणि प्रमेय

मध्ययुगीन मराठी वाङ्मयातील ऐतिहासिक घटनांची मीमांसा करताना जे आजवर प्रमाद घडले आहेत, तेच महानुभावांच्या साहित्याविषयीही घडत आले आहेत. हे संशोधन चुकीच्या मार्गानेच गेले असल्यामुळे त्यातून सत्यार्थ किती प्रकटला असावा, याविषयी शंकाच आहे. जे संशोधन करतो, ते पूर्वग्रहदूषित वा एखाद्या विचाराची केवळ री ओढायची म्हणून करायचे नसते, तर ते समर्थपणे वास्तववादी कसोटीवर घासून त्यातील अंतिम प्रमेये संशोधिली गेली पाहिजेत. हे जर झाले नाही तर त्यातून सत्य तर बाहेर येत नाहीच, उलट मतामतांतरांचा एवढा गलबला होतो की, सर्वसामान्यांना त्यातून प्रबोधन होण्याऐवजी त्यांचा बुद्धिभेदच होतो. म्हणून आजवर झालेल्या संशोधित महानुभाव वाङ्मयाचे पुन्हा एकदा वास्तववादी मूल्यांकन होणे आवश्यक आहे.

ही पूर्वपीठिका लक्षात घेऊन लीळाचरित्रात श्रीचक्रधरस्वामींच्या वधविषयक लीळांचा मागोवा घेणे महत्त्वाचे ठरेल.

**दोन भिन्न मते**

श्रीचक्रधरांचा वध झाला, वध झाला नाही अशी मते प्रतिपादणारे महानुभावांच्या अभ्यासकांत उघडउघड दोन वर्ग आहेत. या मतांवर सुमारे ७५ वर्षांपासून चर्चा चालू आहे. गो. मा. चांदोरकर यांनी प्रथम 'मानभावोत्पत्ती' हा लेख लिहून तो इ. स. १९१६ च्या भारत इतिहास संशोधन मंडळाच्या अंकात प्रसिद्ध केला होता. त्यात त्यांनी श्रीचक्रधरांचा वध झाला आहे, असे मत दिले होते. तसेच पुन्हा दोन वर्षांनी इतिहास आणि ऐतिहासिक या त्रैमासिकातील 'मानभाव की बौद्ध' या लेखातही तोच उल्लेख केला होता. चांदोरकरांनी आपल्या मतांच्या पुष्ट्यर्थ घेतलेले संदर्भ धुळ्याच्या समर्थ वाग्देवता मंदिरातील एका महानुभावीय हस्तलिखितातील असल्याचे त्यांनी लिहिले होते. १९४६ साली ह. ना. नेने यांनी संपादित केलेल्या लीळाचरित्राच्या उत्तरार्धातही वधप्रकरणाची लीळा नसली, तरी श्रीचक्रधरांच्या अवयवच्छेदाशी व अवयवस्वीकाराशी संबंधित लीळा आहे. डॉ. वि. भि. कोलते यांनी १९५२ मध्ये लिहिलेल्या 'श्रीचक्रधरचरित्र' या पुस्तकातही अवयवच्छेद व शिरच्छेद हे प्रकरण विस्तृतपणे मांडले आहे. डॉ. शं. गो. तुळपुळे यांनी १९६७ साली संपादित केलेल्या लीळाचरित्रातही वधाच्या लीळा आलेल्या आहेत. डॉ. अ. ना. देशपांडे

यांनीही वध-प्रकरण रसभरित शब्दांत वर्णन केले आहे. (प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास, भाग-१ पूर्वार्ध पृ. ३६७ ते ३७०, व्हीनस, १९६६) त्यांना वध झाला हे पूर्णपणे मान्य असून तो संभाव्य वस्तुस्थिती व तत्कालीन घटनांशी सुसंगत होता, असे ते म्हणतात. तेव्हा 'वध प्रकरणाविषयीची' आपली मते निवेदन करणारे व ते लिखित स्वरूपात प्रकाशित करणारे डॉ. वि. भि. कोलते हे काही पहिलेच व एकमेव अभ्यासक नव्हेत. तथापि १९७८ व १९८२ साली प्रसिद्ध झालेल्या क्रमशः पहिल्या व दुसऱ्या लीळाचरित्राच्या शासन-आवृत्तीत त्यांनी या लीळांचे प्रथमच संपादन केले असेही समजण्याचे कारण नाही. या दोनही शासकीय आवृत्त्या प्रसिद्ध होण्यापूर्वी वा १९८२ साली 'श्रीचक्रधर : शेवटचे प्रकरण' हे पुस्तक होण्याआधी या मतांची मांडणी त्यांनी ग्रंथस्वरूपातून केली होती.

### शास्त्रीय स्वरूपातून आक्षेप

आतापर्यंतच्या या अभ्यासकांच्या मतांवर शास्त्रीय स्वरूपातून आक्षेप घेण्याचा प्रयत्न डॉ. सुरेश म. डोळके यांच्याशिवाय कुणीही केल्याचे आठवत नाही. श्रीचक्रधरांचे शुद्ध, निर्मळ चारित्र्य यांनी अनेक पुराव्यांच्या आधारे दाखवून दिले ते सर्वप्रथम सत्यकथा-जून १९५४ च्या अंकातून. हा लेख अनेक दृष्टिकोनांतून उपयुक्त ठरावा, इतका तो महत्त्वपूर्ण आहे. मात्र पुढे 'श्रीचक्रधरांचे शेवटचे प्रकरण' घडलेच नाही, हे सांगण्यासाठीही त्यांना चार दशकांचा काळ जाऊ द्यावा लागला. या प्रकरणावर त्यांनी चार प्रदीर्घ शोधनिबंध लिहून 'वध झालाच नाही' हे मत सिद्ध केले आहे. ते त्यांच्या 'संशोधन शलाका व संशोधनसमस्या' या क्रमशः १९८३ व १९९० या वर्षी प्रसिद्ध झालेल्या महत्त्वपूर्ण ग्रंथांतून पाहावयास मिळते.

गेल्या काही वर्षांमध्ये या प्रकरणावर श्रीनागदेवाश्रमाचे संचालक पूज्यनीय महंत श्रीदर्यापूरकर बाबा यांनी वेळोवेळी अनेक पत्रके काढून आपले काही विचार मांडण्याचा प्रयत्न केला होता, असे समजते. अर्थात हाही प्रयत्न गेल्या १०/१५ वर्षांपासूनच असावा. तथापि १९९० साली त्यांनी 'सर्वज्ञ श्रीचक्रधरांचे उत्तरापंथे गमन– डॉ. वि. भि. कोलते यांना झालेला चकवा' हे पुस्तक प्रकाशित करून वधप्रकरणाशी संबंधित लीळा कशा प्रक्षेपित आहेत हे अनेक हस्तलिखितांच्या अध्ययनानंतर दाखवून दिले आहे. तथापि एकूणच या सर्व आक्षेपार्ह लीळा चांगनाथ नावाच्या श्रीचक्रधरसदृश एका नाथपंथीय पुरुषाच्या बाबतीत घडल्यात, हे यक्षदेवपाठाच्या आधारे सिद्ध केले आहे. हा त्यांच्या संपूर्ण ग्रंथाचा मथितार्थ आहे.

खरे तर दोन्ही बाजूंचा विचार मांडणाऱ्या सर्व अभ्यासकांनी आपली जी मते मांडलीत, ती महानुभाव पोथ्यांच्या आधारेच. या महानुभावीय पोथ्यांमध्ये प्रक्षेप कसे होत गेले, हे पाहण्यापूर्वी वधप्रकरणाच्या संदर्भात येणाऱ्या काही लीळांचे परीक्षण करू.

**शिष्यांशी झालेला संवाद**

लीळाचरित्राच्या उत्तरार्धात आलेल्या ज्या आक्षेपार्ह लीळा आहेत त्यांचा अभ्यास करण्यापूर्वी त्या लीळांतील घटनांच्या विरोधी ठरणाऱ्या काही लीळांचा अभ्यास करणे सयुक्तिक होईल. जीवोद्धरणाच्या अनेक गोष्टी आपल्या भक्तपरिवाराला सांगितल्यानंतर स्वामींनी उत्तरापंथे जाण्याचे ठरविले यावर त्यांच्या शिष्यांशी त्यांचा झालेला संवाद पाहण्यासारखा आहे :

*श्रीप्रभुपासौनि कैवल्यदान :*
*महादाइसे भटासि नीरोविलेयां मग भटी*
*पुसिलें : जी जी : मज कव्हणां निरोविले जी : ?"*
*सर्वज्ञे म्हणीतले : "तूज श्रीप्रभूसि निरोविले :"*
*भटी पुसिलें : "जी जी : गोसावी आम्हांसि*
*श्रीप्रभूसि निरोविताति तरि काइ ते*
*केवल्यदान देतील ?" सर्वज्ञे म्हणीतलें :*
*"श्रीप्रभुपासौनि जीवां कैवल्यदान आति :"*
*...... " जी जी : आम्हीं कैसिया परि*
*असावे जी ? कोठे असावे जी ?" सर्वज्ञे*
*म्हणीतलें 'आपणेयांते' कव्हणी नेणे : आपण*
*कव्हणातें नेणिजे : ऐसेया स्थानी असावे :"*
*... महाराष्ट्रासी असावे... देशाचा सेवटी*
*झाडातळी जन्म क्षेपावे"*

(कोलते प्रत १९८२ ली.क्र.उत्त.६०७)

या लीळेत स्वामींनी महादाइसादी भक्तांना श्रीनागदेवाचार्यांकडे तर त्यांना श्रीगोविंदप्रभूंकडे सोपविल्याचे स्पष्टपणे सांगतात. स्वामी स्वतः उत्तरापंथे जाण्याची तयारी करीत असताना आलेले हे संवाद आहेत. तथापि त्यांना असन्निधानीचा आचारही विहिल्याचे आपणास दिसते. या लीळेचे बाह्यावलोकन केले तरी असे दिसते की, स्वामींना उत्तरापंथे निघून जाण्याची स्वतःच इच्छा झाली होती. या लीळेत कुठेही स्वामींचा वध होणार आहे, म्हणून ही सारी निरवानिरव चालली आहे, हे कुठेही दिसत नाही. यातील संवाद इतका स्पष्ट आहे की, कोणत्याही वाईट घटनेची चाहूलही लागत नाही.

**'प्रवृत्ती भंगैल'**

उत्तरापंथी जाण्याची प्रवृत्ती कशाने भंगेल यावर स्वामींनी दिलेली उत्तरे अशी :

१. "सरालेकार ब्राह्मण एइल : तयाप्रति गीता वाखाणीजैल तरि प्रवृति भंगैल."

२."ना तरि एथचेन नामे जाप्य करा तरि प्रवृति भंगैल : "

३."ना राओ बोलावील तरि प्रवृत्ति भंगैल"

(कोलते प्रत,१९८२,लीळा उत्त.६०८)

या तीनपैकी कोणतीही एखादी गोष्ट घडली असती, तर स्वामींचे उत्तरापंथे जाणे रहित झाले असते, यात शंका नाही. मग म्हाइंभटांना बोलावून त्यांना गीता ऐकवणे अशक्य होते काय? स्वामींच्या सर्व परिवाराला स्वामींच्या नावाचा जप करणे अशक्य होते काय? राजाचे बोलावणे येणे हे शक्य नसेल, परंतु वरील दोन गोष्टी होणे अशक्य नव्हतेच. राजाला स्वामींनी निरोप पाठविला असता, तर राजाही स्वतः स्वामींच्या भेटीला येऊ शकला असता. स्वामींच्या नामाचा, स्वरूपाचा वेध स्त्री, पुरुष, आबालवृद्ध सगळ्यांनाच होता. ही तीनही पर्यायी कारणे आहेत. याचा अर्थ 'उत्तरापंथे' व 'प्रवृत्ती' या शब्दांचा अर्थ निश्चितच घडू पाहणाऱ्या कल्पित वधघटनेशी नाही, हे सिद्ध होते.

पुढील एक लीळाही या संदर्भात पाहण्यासारखी आहे. महादाइसा विचारते 'जी जी : गोसावी आमते सोडुनि बीजे करू पाहताती : तरि आम्ही काइ करुनि असावे जी ?' (उत्त. ६०९) याचा अर्थ "स्वामी आम्हाला सोडून निघून जाऊ इच्छितात, तर आम्ही काय करून असावे ?" यावर स्वामी म्हणतात, "बाइ हे देखिले : तैसे आठवीजे." या संवादात तरी कुठे कल्पित वध घटनेशी दूरान्वयाने तरी संबंध दिसतो का? हे सर्व संवाद स्वामी इथून स्वखुशीने उत्तरापंथे निघून जाण्याच्याच संदर्भात आहेत. या संवादात कुठेही भक्तांच्या दुःखाची, विरहाची अल्पशीही जाणीव होत नाही. महादाइसा विचारते, "जैसे हे बरवे रूप : तैसे आणीक काइ बरवे असे ?" यावर स्वामींनी श्रीकृष्ण, सीता यांच्या सौंदर्याची भलामण केली. तथा "याहीहुनि एक बरवे असे" असे स्वामी म्हणतात. यावर महादाइसा ते कोणते हे विचारते. स्वामी म्हणतात, "बाइ हे बरवे नव्हे : भीतरि असे ते बरवे" आम्हाला ते रूप कसे दिसेल, असे महादाइसाने विचारल्यावर स्वामींनी दिलेले उत्तर खरोखरच सुंदर होते. स्वामी म्हणतात "बाइ : जीवासि सकळ संपत्ति तिया असंपत्ति : जीवाची परमेश्वर एक संपत्ति : ऐसे जै प्रगटे : तै भीतरि जे बरवे असे ते दिसे" यातही संसारमोचन करायचे असेल तर वैराग्याशिवाय दुसरे काहीच नाही हेच त्यांना सांगायचे आहे. यातही कुठे उत्तरापंथे जाण्याचे फारसे दुःख वा वधघटनेचा संबंध दिसत नाही.

स्वामींची उत्तरापंथे जाण्याची तयारी झालेली आहे आणि सर्व भक्तगण स्वामींच्या प्रयाणोत्तर काळातील आचाराविषयीची माहिती विचारताहेत. किंबहुना स्वामी आपल्यातून निघून गेल्यावर आपला असन्निधानीचा आचार कसा होईल, हे विचारण्याची सर्व भक्तांमध्ये चढाओढच लागलेली दिसते. यावर स्वामी सर्वांना शांतपणे असतिपरीच्या आचाराची माहिती देत आहेत.

'भटा राष्ट्रासि विनश्यंति निरुपण' (उत्त. ६१४) या लीळेतही स्वामी म्हणतात, "हे

उत्तरापंथे जाइल : श्रीप्रभुमागा उत्तरेकडूनि म्लेंछ येतील : ते जाधवाते मारितील : आणि राज्य घेतील" स्वामींनी हे सांगितल्यावर नागदेवाचार्यांनी एका शब्दानेही त्यांच्या उत्तरापंथे जाण्याच्या निश्चयाविषयी विचारले नाही. या सर्व लीळांमधून, जे दिसते ते आम्ही आता राजीखुशीने भक्तजनांना सोडून निघून जात आहोत, तुम्ही असन्निधानीचा आचार करावा, हेच प्रतिपादन आहे. यापुढील येणाऱ्या "धातुसाम्य निरोपण" (उत्त. ६१७); ज्ञानप्रेमसाधन निरुपण (उत्त. ६१८) याही लीळांमधून आमचा वध होईल किंवा आमचे असे दुःखाने जाणे होईल असे कुठेही नाही, उलट आहे तो देवभक्तांचा सुसंवादच.

**स्वामींची उत्तरापंथे जाण्याची प्रवृत्ती अभंगच**

स्वामींची उत्तरापंथे जाण्याची प्रवृत्ती अभंगच होती हे पुढील लीळेवरून दिसते :

तथा सां मासां अपरोक्ष अनुवादु : ॥ भटी म्हणीतलें : "जी जी : मज अपरोक्ष देयावे" सर्वज्ञे म्हणीतलें : "वानरेशा : तुम्हांसि आणीक सा मास संनिधान होतें तरि एथचि अपरोक्ष देइजते" तवं भटीं म्हणीतलें : "जी जी : मज सा मासां देयावें तें आतांचि कां नेदावें जी ? गोसावी करिती तें काइ एक नव्हे ?" (उत्तरार्ध. ६१९)

या लीळेतही सहा महिन्यांचा आमचा निवास आणखी वाढला असता, तर तुम्हास अपरोक्ष ज्ञान देण्याच्या योग्यतेचे आम्ही केले असते. म्हणजे स्वामींनी मनात आणले असते तर ते आपला उत्तरापंथी निघून जाण्याचा बेत लांबणीवर टाकू शकले असते. परंतु त्यांच्या मनाची उत्तरापंथे बीजे करण्याची प्रवृत्ती अभंग होती, हेच यातून दिसते.

लीळाचरित्र उत्तरार्धाच्या ६२० व्या लीळेतही स्वामींनी नागदेवाचार्यांना तुम्ही विचारशास्त्र निरूपण करण्याच्या योग्यतेचे झालात, असे सांगितले. एवढेच काय, "आता तुम्हासि आचार्ये होआवे लागैल" असे निक्षून सांगितले. स्वामी उत्तरापंथी जाण्याच्या अवकाशातच या सर्व लीळांची यादी आपल्यासमोर आहे. यात वध होईल असा कुठलाही भावार्थ प्रत्ययास येत नाही. श्रीनागदेवांना आचार्यत्व प्रदान करण्याची लीळा पाहण्यासारखी आहे.

अधिकरण करुनि ज्ञानदान ॥ सर्वज्ञे म्हणीतलें : ॥ "वानरेसांपासौनि सातापांचां बोधु :" भटी म्हणीतलें : "हे काइ जी : गोसावियापासौनि एकांदोघा बोधु : आणि मजपासौनि सातापांचांचा बोधु : ?" सर्वज्ञे म्हणीतलें : "हो कां गा : देता काइं तुं ? देते ते आणीक असे कीं गा : अक्षरदाता जीवु : बोधदाता परमेश्वरु : जीवासि बोधु आणि बोधशक्ति ते एथौनिंचि कीं गा : अधिकरणाते अधिकरुनि परमेश्वरु जीवांतें उधरीति : परि माहात्मेनि जिज्ञासा करावी : न करि तरि अक्षरे न रिगती : मां बोध कैसा रीगैल ?"

(उत्त. ६२३)

म्हणजे स्वामींनी नागदेवांना आचार्यत्व देऊन आपला भार हलका केला, असे लौकिक

अर्थाने म्हणावयास हरकत नाही. यात हे आचार्यत्वही नागदेवाचार्यांनी सहजासहजी स्वीकारले नाही. "आचार्यासि नर्क नीरुपिले असति की ?" (उत्त.६२२) असा प्रश्नही त्यांनी स्वामींना केला आहे. यावर "तु प्राणियांते अनिस्टापासौनि काढिता : आणि इस्टी लावतां आचार्य कीं गा," असे सांगितले. एवढेच काय "तुझेनि मुखे अशास्त्रीय न नीगे की" असा आशीर्वादही दिलेला आहे. हे सर्व स्पष्ट झाल्यावरच श्रीनागदेवांनी हे आचार्यत्व स्वतःकडे स्वीकारल्याचे आपणास दिसते. म्हणजे स्वामी उत्तरापंथे जात आहेत– ते त्यांच्या प्रवृत्तीप्रमाणे आम्हाला सोडून जात आहेत, याबद्दल कुणालाच काही तक्रार नव्हती. जर स्वामींची वध स्वीकारण्याची प्रवृत्ती असती, तर नागदेवांनी आचार्यत्व स्वीकारणे, भक्तजनांचे मनमोकळेपणाने स्वामींशी असन्निधानीच्या आचारधर्मावर चर्चा करणे हे संभवनीय तरी झाले असते काय ?

### दाइंबाचे स्वप्न

भटा एकलेपण अनुवादु (उत्त.६२५) या लीळेत स्वामी श्रीनागदेवाचार्यांच्या खांद्यावर हात ठेवून म्हणतात, "बापुडे वानरे आता एणेवीण एकले असैल" यावर आउसाने विचारले, "नागदेओ कैसा एकला ? स्वामी जगन्नाथु असति की :" यावर स्वामी म्हणाले : "हे ऐसे कव्हणीकडे जाए पां" म्हणजे आम्ही आता असे कुणीकडेही निघून जाऊ. हे स्वामींचे सांगणे आणि "तरि आम्हासी कवणासि निरोविले जी स्वामी जगन्नाथा ?" हे आउसाचे विचारणे किती सहज आहे ! स्वामींचा विरह असह्य होईल, या जाणिवेने नागदेवाचार्यांना आपसूकच रडू आले. ते स्वाभाविकही होते. स्वामींनी त्यांना रडू नये म्हणून सांगितले. यातूनही आता वधाचा क्षण जवळ येत आहे. माझा वध होणार आहे, असा अर्थ निघत नाही. दाइंबालाही रिद्धपुरात असताना "गोसावी बीजे केले" असे स्वप्न दिसले. (उत्त.६३०) याचा अर्थ स्वामींनी मृत्यू स्वीकारला, वध स्वीकारला असे कसे म्हणता येईल. त्यातून पुसटसाही अर्थ निघणे शक्य तरी आहे काय ? बीजे केले-निघून गेले-स्वामी आपल्या परिवारास सोडून निघून गेले, असाच त्याचा अर्थ होतो.

स्वामी जेव्हा जेव्हा उत्तरापंथे बीजे करण्याचा मनोदय व्यक्त करतात, त्या त्या वेळी सर्व भक्तपरिवार अस्वस्थ होत असला तरी आता आमचे स्वामी वधस्तंभावर जाणार आहेत किंवा आता त्यांचे ओखटे होणार आहे असे चुकून वाच्यार्थानेच काय लक्षणेनेही निघत नाही.

लीळाचरित्र काय किंवा इतरही महानुभावीय चरित्रग्रंथ काय, प्रत्येक लीळा वा स्मृती ही मागील-पुढील लीळा-स्मृतीशी संबंध साधून असते. निदान त्याची क्रमवारी बव्हंशी तरी संगतशीर असते. कोलते प्रतीत काय किंवा इतरही काही हस्तलिखित लीळाचरित्राच्या पोथ्यांमध्ये येणाऱ्या "भटा लग्नघडी अनुवादु : तथा रुदन नीक्षेदू" (उत्त. ६४७) या

लीळेपासून तो “वींझी चाटेया भेटी” (उत्त. ६५४) या लीळेपर्यंतच्या लीळांचा मागील लीळांशी कोणताच भावार्थानेही संबंध जुळत नाही, हे सलग लीळाचरित्राचे वाचन करताना लक्षात येते.

“आता तुम्हा नवेया संबंधु :” (उत्त. ६४६) असे सांगतानादेखील सारे भक्तजन अस्वस्थ नाहीत. उलट “नवा संबंध तो कसा ?” “त्याची प्रक्रिया काय ?” इत्यादी प्रश्नांची विचारणा सारे भक्तजन स्वामींना करतात, त्यावर “साधनापसि साध्य उत्तम” असे सांगून आपल्या उत्तरापंथी जाण्याविषयीचे आपले मत निश्चित करतात.

याचा अर्थ असा की, स्वामींनी आपण येथून या प्रदेशातून निघून जाऊन-उत्तरापंथी जाऊन असे सांगून सर्व गोष्टींची निरवानिरव करून टाकली होती. तथा माझ्या माघारी तुमचा आचारधर्म कसा राहील, याची सांगोपांग माहितीही ते देत होते. या सर्व गोष्टी स्वामींच्या संघात/परिवारात इतक्या सहजपणे होत होत्या की वधप्रकरणाशी कोणताच संबंध पोचत नव्हता.

### या लीळा बेलापुरीच्याच

विशेष म्हणजे वर उल्लेखिलेल्या लीळा काय किंवा ज्याविषयी आणखी अधिक माहिती देता येतील अशा अनेक लीळा स्वामी बेलापुरात असतानाच घडल्या आहेत. या लीळांमध्ये कुठेही वधघटनेच्या विषयीची अल्पशी कल्पनाही येत नाही. उलट स्वामी आपल्या सर्व परिवाराची निरवानिरव करून सर्वांना नागदेवांकडे सोपवून निरोप घेण्याच्या तयारीला म्हणजे महाराष्ट्र सोडून जाण्याच्या तयारीला लागलेले दिसतात. तेव्हा वध ही कल्पना चुकीची ठरते.

पुढे उत्तरार्ध लीळा क्र. ६४७ ते ६५४ या लीळांचा आपण विचार करू.

### लग्नघडी

यानंतरच्या सर्व लीळा या वधप्रकरणाशी संबंधित अशाच आहेत. त्या लीळांमधील आतंरिक विसंगती कशी आहे, तसेच या लीळांच्या आधीच्या लीळांशी या लीळांचा संबंध कसा पोचत नाही, हे अभ्यासाने सहज कळेल.

भटा लग्नघडी अनुवादु : तथा रुदन नीक्षेदु (उत्त. ६४७) या लीळेत भटोबास भिक्षा मागण्यासाठी चालले असताना स्वामींनी त्यांना जाण्यास प्रतिबंध घातला आणि “वानरेया : लग्नघडी वर्तत असे गा : वाटे एत असती : याते सांडू नका :” हे ऐकून भटोबासांनी उभ्यानेच देह टाकले. गडबडा लोळू लागले. स्वामींनी त्यांना देवळात नेले. तेथे काही सांगून काठिण्य आणले. तरी भटोबासांचे रडणे थांबेना. त्यावर पुन्हा काजळी पडेल, अशी भीती दाखवली.

ही लीळा वाचताना प्रश्न असा निर्माण होतो की, जर स्वामींनी "तळमळीत जन्मातें धाडी : तेयासि परमेश्वरु आपुले प्रेम देति" (आचार ७०) असे सांगितले असताना असा प्रसंग आल्यावर त्यांना आवरण्याचे कारण काय? दुसरे असे की, लग्नघडी वर्तत आहे, असे म्हणताना स्वामींच्या आजूबाजूस कोणीच नव्हते काय? या लीळेत दुःख झाले ते फक्त नागदेवाचार्यांनाच ! महादाइसा तिथे नव्हती? इतर परिवार काय अनुपस्थित होता? त्यांना का नाही रडू आले? आले असेल, तर त्याची नोंद या लीळेत का नाही? नागदेवाचार्यांच्याच तोलामोलाचा इतरही भक्तगण होताच की ! पण असे का झाले नाही? यावरून या लीळेची वैय्यर्थ्यता लक्षात येते.

**जीवोद्धरणीया नि अभक्ष्य भक्षणारा**

"मलैसामध्ये अवतरण" ही लीळा काय सांगते.

"गोसावी आऊसाते म्हणीतले : " आता हे मलैसामध्ये जाइल : एकिवासना असैल : उत्तरापंथे गमन कीजैल : तेथे अभक्षे भक्षीजैल : अपेयपान पान कीजैल : एकिवासना तेयाचेया सुपातियांवरि निद्रा कीजैल"

(माझ्याकडे असलेले हस्तलिखित क्र. ३७ मधील लीळा).

याही लीळेत उत्तरापंथे गमन कीजैल असे लिहिले आहे. तरी ती महानुभावीय तत्त्वज्ञानाप्रमाणे आक्षेपार्ह आहे. "तुमचेनि मुंगी रांड न होआवी" (आचार-६०) असे म्हाइंभटांना निक्षून सांगणारे श्रीचक्रधरस्वामी "खरुज खाजवी ना तो विरक्त (आचार २६६) अशी विरक्ताची प्रतिमा भक्तांच्या मनावर ठसविणारे श्रीचक्रधरस्वामी यवनांमध्ये जाऊन अपेयपान (मद्यपान), अभक्ष (मांस) भक्षण करतील हे संभवते तरी काय? "कव्हणा कव्हणी व्येसनु : कव्हणा कव्हणी व्येसनु : एथ जीव उद्धरेजति हेचि व्येसनु (उत्त. १३४) असे म्हणणारे स्वामी अभक्ष-अपेय ग्रहण करून जीवांचा उद्धार करणार होते काय? त्यातही यवनांचा एवढा कळवळा स्वामींना यावा? "महाराष्ट्री असावे" असे आवर्जून सांगणारे स्वामी यवनांच्या उद्धारासाठी अपेयपान, अभक्ष भक्षण करतील, ही कल्पना तरी सहन होईल काय? याचाच अर्थ ही लीळा "जीवोद्धरणाचे व्येसन" असलेल्या श्रीचक्रधरस्वामींची नव्हेच.

राजेया आव्हानी आउप्रती उत्तर देणे (उत्त. ६४९) ही लीळाही अशीच विसंगतीपूर्ण आहे. आउसाला उद्देशून स्वामी म्हणतात, "नाएका : एथ रायाचा हाकारा एइल : दांडीए बैसोनि तेथ जाइजैल :" "या विधानातील विसंगती उघड आहे. याआधी आलेल्या "स्मरण माहादाइसा जाप्यकरणी अनोज्ञा" (उत्त. ६०८) या लीळेत "राओ बोलावील तरी प्रवृत्ती भंगैल :" असे म्हटले असताना रायाचे बोलावणे आल्यावर पालखीत बसून आम्हाला "ते ऐसे नेती : आणि ऐसे लोटितील" किंवा डॉ. कोलते यांनी दिलेल्या एका प्रतीत "ओखटे

करीति" असे म्हणणे कसे संभवते ? रायाचे बोलावणे आल्यावर स्वामींनी आपली प्रवृत्ती (निघून जाण्याची) का नष्ट केली नाही ? आणि रायाचा हाकारा आला तोही मृत्युदंड म्हणूनच ! या स्वामींच्या विविध विसंगतपूर्ण वक्तव्याची संगती कशी काय लावता येईल. म्हणून ही लीळाही स्वामींच्या संदर्भात घडणे शक्य नाही. पर्यायाने ही लीळाही प्रक्षिप्तच समजावी.

**"राया बोलाविल तरि. . ."**

या लीळेत अत्यंत विसंगती आहे, किंबहुना स्वामींचे व्यक्तिमत्त्व पाहता त्यातील घटना एक विनोदच वाटतो. दांडीए आरोहण या लीळेत तर तो आणखी कळसाला पोचलेला आहे. कोलते प्रतीतील "दांडीए आरोहण : बीजे करणे" (उत्त. ६५०) या लीळेत दांडी आल्यावर स्वामी तीत वसले. परस्परेच दांडी बंदिशाळेकडे किंवा खोलदरीकडे निघाली. पुन्हा राजाने पालखी घेऊन या म्हणून निरोप पाठविला. (माझ्याकडील क्र. ३७ च्या हस्तलिखितात "तव राजापुढे सांघावेया गेले" असा पाठ आहे.) नागदेवाचार्यांनी पुनः पुन्हा विनंती केली "जी जी प्रवृत्ती भंगिजो जी :" यावर स्वामी म्हणाले, "राओ बोलावील : तरी भंगिजैल" स्वामींना राजाने दोनदा बोलावणे पाठविले असताना व स्वामींची पालखी तिकडेच निघाली असतानाही स्वामींनी पुनः पुन्हा "राजाने बोलाविले तरच प्रवृत्ती भंगवून" या म्हणण्यात काही अर्थ आहे काय ? स्वामी भेटीला निघाले तरी त्यांचे आपले पालुपद तेच. तेव्हा श्रीचक्रधरस्वामींच्या जीवनातली ही लीळा असणेच शक्य नाही, कारण ती स्वामींच्या कोणत्याही प्रवृत्तीशी जुळत नाही. स्वामींच्या महनीयतेला ती निश्चितच बाध आणणारी आहे.

हीच लीळा कोलते प्रतीत पुढे अशी आहे :

"मग रायापासी दांडी नेली : तवं गोसावीयांचीया श्रीचरणीचा आंगुठा देखिला कैसा जोगिया बरवा !" (उत्त. ६५०)

एवढे बोलूनही हा "अवतार" आपण दिलेला शब्द पाळत नाही, हा विनोदच नाही काय ?

डॉ. कोलते यांनी वापरलेल्या दधन प्रतीतील "दांडीए आरोहण" (उत्त. ६५० ची तळटीप, पृष्ठांक ७३०) या लीळेत दांडीबरोबर भटोबास, महादाइसा जाताहेत. एके ठिकाणी वसती झाल्यावर तेथील लोकांनी कणिक, तांदूळ, तूप इत्यादी पदार्थ आणून दिले. भटोबासांनी स्वयंपाक केला. स्वामींनी आरोगणा केली. अशा वेळी स्वयंपाक करणे, जेवणे हे शक्य तरी आहे काय ? जेवायचे नव्हते, तर स्वयंपाक का करू दिला ? एरव्ही भिक्षा मागून आणणाऱ्या भटोबासांनी स्वयंपाक करावा, हे नवलच आहे. एक मत– घेतलीच नाही. याच आशयाची लीळा पुण्याच्या पू. महंत श्रीप्रभाकरबाबा पुणेकर यांच्या श्रीकृष्ण

मंदिरातील हस्तलिखित संग्रहालयात मी बघितलेल्या पोथी क्र. ३३ मध्ये आलेले वर्णन अधिक गमतीशीर आहे. ती लीळाच येथे उद्‌धृत करतो :

> तथा दांडी अनुवादु "गोसावीयाचे सोडीएवरी आसन होते :
> तव गोसावी म्हणीतले : "पोरे हो काइ हासत खेळत असा :
> हे नव्हे पैरा दांडी एति असें : तवं राउत पाइक देखिलें :
> दांडी घोडे ऐसे आंगणी" (उत्त. ११०)

यापूर्वीच्या लीळेत लग्नघडी वर्तत आहे, ही कल्पना स्वामींनी सर्वांना दिलेली आहे. (कोलते प्रत उत्त. ६४७ व पुणे श्रीकृष्ण मंदिरातील हस्तलिखित लीळा उत्त. १०९) तरी स्वामींच्या परिवारात हसणे, खिदळणे वा खेळणे चालले आहे. त्यांना आपल्यावरील संकट सांगण्यासाठी स्वामींना पुन्हा सांगावे लागत आहे- "पोरे हो : काइ हासत खेळत असा ?" . हा केवढा विरोधाभास आहे ! आपला स्वामी जगन्नाथ (आउसा, महादाइसा यांचे संबोधन) मृत्यूकडे जात असताना हसणारा-खिदळणारा स्वामींचा परिवार असू शकतो ? याचा विचार या लीळा सत्य आहे असे मानणारांनी अवश्य करावा.

### भटोबास लाचार ?

पुणे येथील श्रीकृष्ण मंदिरातील ३३ क्र. च्या लीळा चरित्राच्या हस्तलिखितात आलेली एक लीळा अशीच विसंगत आहे. दांडीचा कोंभ धरून भटोबास चालले होते. स्वामींना "प्रवृत्ती भंगावी" म्हणून वारंवार विनंती करीतच आहेत. अशा वेळी "दांडी सभामंडपासी नेली : तवं राओ सारी खेळत होता : तवं भटी म्हणीतलें : राया : हा साक्षात परमेश्वरु : पुस पुस काही : एकांवासना : हा घे द्वापरीचा देओ : साक्षात श्रीकृष्णचक्रवर्ती : पुसा पुसा काही :" पुढील भाग नागदेवाचार्यांना कांवीने हाणण्याचा प्रसंग कोलते प्रतीतही आलेला आहे. (उत्त. ६५० ) स्वामींना मृत्युदंड देण्यासाठी पालखी दरबारात येत असताना रामदेवराजा सारीपाट खेळत आहे. भटोबास सामोरे जाऊन लाचार होऊन विनवणी करीत आहे. हे दृश्यच मुळी न पटणारे असे आहे. "स्वातंत्र्यु हा मोक्ष" (पूर्वार्ध ५०७), किंवा "आपण कव्हणा अधीन होआवें नाहीं : आपणेंया अधीन कव्हणाते करावें नाहीं : जीवे परमेश्वरा अधीन होआवें :" (उत्त. ६१०) असे आपल्या शिष्यांना पटवून देणारे स्वामी त्यांच्याच समोर त्यांच्या परमार्गाचा म्होरकाच अशी लाचारी पत्करतो हे कदापि शक्य नाही. स्वामींचे अलौकिकत्व काय रामदेवाला ठाऊक नव्हते ? तशाही प्रसंगी सारीपाट खेळण्याचा प्रसंग काय रस्त्यावर चालला होता ? की या स्वामींची पालखी देवगिरीच्या किल्ल्याच्या आत राजाच्या दिवान ए खासमध्ये घेऊन गेले होते ? याचाच अर्थ ही लीळा स्वामींच्या संदर्भात घडणेच शक्य नाही.

**पुन:संबंध म्हणजे काय ?**

कोलते प्रतीतील उत्त. ६५० व्या लीळेत शेवटी "हाण हाण याते" असे भटोबासांना मारण्यास चांडाळांनी सांगितले तेव्हा भटोबास जाऊ लागले. सर्वज्ञे म्हणाले, "वानरेया नावेक राहा गा : मग आश्चर्ये एक देखाल आणि पुनसंबंधु देइजैल" यावर भटोबास म्हणाले, "ना जी मज राहावे ना" असे म्हणून ते तेथून निघून गेले. हीच लीळा पुणे येथील श्रीकृष्ण मंदिरातील हस्तलिखित क्र. ३३ मध्ये पुढीलप्रमाणे आलेली आहे :

भटोवासा पुनसंबंध कथन : भटोबास नीगो वैसलें : गोसावी म्हणीतलें : वानरेया याते सांडो नका गा : तुमने सांघाते नेइजैल : तुम्हा पुनसंबंध दीजैल : तुम्हा अधीकरण कीजैल : एथौनि तुम्हासि अश्चर्ये दाखवीजैल : तुम्ही जाउ नको : चाला : तवं भटोबासी म्हणीतले : ना जी ते मज असक्ष : हे मज पाहावेना जी : म्हणौन निघाले : . . . ॥ ११२ ॥

कोलते प्रतीतील म्हणा वा वर उल्लेखिलेल्या पोथीतील म्हणा आशय सारखाच आहे. किंवहुना या हस्तलिखितात थोडी अधिक माहिती पाहावयास मिळते.

ही लीळा वाचताना पहिला प्रश्न असा निर्माण होतो की, स्वामी भटोबासांना राहून जाण्याविषयी वारंवार विनंती करतात व भटोबास वेळोवेळी ती विनंती नाकारतात, ही कल्पनाच सहन होत नाही. नागदेवाचार्य तेवढ्याच आवेगात "जी जी मज हे असक्ष, मज हे पाहविना" असे का म्हणतात ? एरव्ही प्रत्येक आज्ञेचे पालन करणारे भटोबास, ज्याला लाळिले, पाळिले, असा नागदेव, अनिष्टातून काढून इष्टी लावणारा आचार्य, जो संपूर्ण लीळाचरित्रात स्वामींच्या वचनाबाहेर कधीही जात नाही, असा नागदेवाचार्य (वचनोल्लंघन केले, अशी एक तरी लीळा दाखवून द्यावी. अर्थात अशा काही प्रक्षेपित लीळा वगळून) स्वामींची ही आज्ञा कसा उल्लंघेल ? त्यांच्या शब्दांचा अवमान कसा करेल ? चालत्या बोलत्या देवाचे सान्निध्य कसा नाकारेल ?

त्यातही एक गंमत म्हणजे वधस्तंभाकडे जाणारे हे चक्रधर त्या नागदेवाला आमिषही दाखवीत आहेत. "चाला गा तुमते सांघाते नेइजैल" एकदा असन्निधानीचा आचार निरूपण केल्यावर आपला संपूर्ण परिवार त्यांच्याकडे सोपविल्यावर व नागदेवांना श्रीगोविंदप्रभूंकडे सोपविल्यावर पुन्हा आणखी आपल्या सोबत घेऊन जाण्याची दुतोंडी भाषा श्रीचक्रधरांच्या मुखात कशी ? "तुम्हा पुनः संबंधु दीजैल" हेही वाक्य तसेच आहे. पुनःसंबंध देण्याविषयीचे एकदा स्वामींनी सांगून टाकले आहेच. महादाइसाने "नवेया संबंधु तो कैसा ?" यावर स्वामींनी सांगितले होते "बाइ : सुखिया श्रीमंताचा घरी बरवे पुरुप देह देउनि जन्मवीजैल : मग बारा वरुषा संबंधु दीजैल" यावर महादाइसा म्हणतात, "तरि तो संबंधु आणि हा संबंधु काइ सारिखाचि की अनसारिखा ?" यावर स्वामी म्हणतात, "बाइ : साधनापासि साध्य ते उत्तम" याचा अर्थ स्वतः स्वामी साधन आहेत व मोक्षपद हे साध्य ! यातील महत्त्वाचा मुद्दा

एवढाच की, नवेया पुनः संबंध देण्याची प्रक्रिया, पद्धती ही असतिपरीचा आचार केल्यावर "एथ म्हणितले ते कीजे" या वचनाचे पालन केल्यावर तळमळीत जन्माते धाडल्यावर नवीन जन्म सुखिया श्रीमंताचा घरी होतो. तेथे १२ वर्षेचि झाल्यावर ईश्वरावतार त्याला पुनसंबंध देतील. एकदा स्वामींनी भक्तांना एवढे निक्षून सांगितल्यावर याच देही नागदेवाचार्यांना पुनः संबंध कसा देतील? आपलेच वचन आपणच खोटे ठरवतील काय? आपणच सांगितलेली सृष्टिव्यवस्था स्वतःच नाकारतील काय? स्वामीच नागांबिकेला संबोधून म्हणतात, "बाइ, एथौनि जरी अवेवस्था होआवी : तरि वेवस्था कोठौनि होआवी" (सूत्रपाठ विचार २२२), असे स्वतःच घालून दिलेल्या नियमांना स्वामी बाध आणतील काय? स्वतःच घालून दिलेले नियम स्वतः मोडणारा एखादा विचारी पुरुषही असू शकत नाही. मग श्रीचक्रधरांसारखा विश्वव्यवस्था लावणारा अवतार अव्यवस्था कशी करणार? आपल्याच विचारांची पायमल्ली स्वतःच कशी करणार?

**चक्रधरांच्या अव्यवस्थेची कडी**

चक्रधरस्वामींच्या अविवेकी विचारांची कडी पाहायला मिळते, ती याच लीळेत. स्वामी पुनसंबंध देण्याचे आश्वासन तर देतातच, शिवाय "तुम्हां अधीकरण कीजैल" असेही म्हणतात. हा प्रक्षेप करणारे महानुभावच श्रीचक्रधरांना ईश्वरावतार समजत होते की नाही, याविषयी मला शंका आहे. आताचे संशोधक लीळा संपादनात तार्किक संगती ही गोष्टच मुळी विसरून जातात. एकनाथांच्याच शब्दांत सांगायचे झाले तर "ठावो बुडविणाऱ्या" महानुभावांनीही श्रीचक्रधरांचे ईश्वरावतारित्व नाकारले होते की काय हेही तपासून पाहणे आवश्यक आहे, थोडक्यात ही लीळा कशी प्रक्षेपित आहे हे वर वर विचार केला तरी समजते. पुनःसंबंधाचा प्रक्षेप तसाच "अधिकरण कीजैल" हेही म्हणणे चुकीचेच.

या संदर्भात डॉ. कोलते यांनी वापरलेल्या प्रवआ या हस्तलिखितातील लीळा पाहूया (उत्त. ६२१). "भक्ती उपावो नीरुपणे" ही ती लीळा. या लीळेत असन्निधानीचा आचार निरोपण करताना स्वामी भक्तांना म्हणतात, "बाइ, आता एथौनि वानरेशा आचार्येत्व देउनि उत्तरापंथे वीजे कीजैल :" यावरि भटी म्हणीतले : "जी जी मी काइसेया आचार्येत्व करीन?" मी गोसावियांचा वियोगी देसाचां सेवटां झाडा एका तळी देह पाडीन जी." या संवादातून काय दिसते, स्वामींनी नागदेवांना आचार्यत्व प्रदान करून स्वतः उत्तरापंथे जाणार असे स्पष्ट सांगितले आहे. स्वामी उत्तरापंथे निघून जातो, असे म्हणतात. यावर स्वामींच्या वियोगात पुढील जन्म जाणार असे तेही सांगतात. परंतु या "उत्तरापंथे बीजे" करण्याविषयीचे फारसे कुणाला काही वाटत नाही. तथा या लीळेचा वधप्रकरणाशी किंवा डॉ. कोलते यांनी बीजे करणे म्हणजे मृत्यू स्वीकारणे हा काढलेला अर्थही पटत नाही. (शेवटचे प्रकरण, पृ. १९८२, पृष्ठांक १४१) या लीळेत आपण शोधत होतो तो अर्थ हा की, नागदेवाचार्यांना एकदा

आचार्यत्व बहाल केल्यानंतर "पुनः आचार्यत्व करूत" हे आश्वासन देणारा चक्रधर कोण ?

कोलते प्रतीत आचार्यत्व नामकरण (उत्त. ६२२) ही लीळा महत्त्वाची आहे. स्वामी आसनस्थ असताना श्रीनागदेव तिकडून आले. स्वामी त्यांना म्हणाले, "आचार्ये हो या:" यावर दोघांचा संवाद झाला. आचार्याला तर नरक असतात आणि मला आपण आचार्यत्व कसे प्रदान करता ? यावर स्वामींनी दिलेले उत्तर मार्मिक आहे. स्वामी म्हणतात, "तैसा तु प्रतारक आचार्या नव्हसि कीं गा : तु प्राणियाते अनिष्टापासौनि काढिता : इष्टी लाविता आचार्या की गां : तुझेनि मुखे अशास्त्रीय न निगे की :" याचा अर्थ श्रीचक्रधरांनी नागदेवांना आचार्यत्व सर्व भक्तजनांच्या साक्षीनेच दिले होते. मग पुन्हा स्वामींनी "तुम्हासी अधिकरण कीजैल" असे म्हणण्याचे कारण काय ? स्वामी तसे म्हणू शकतात काय ? अर्थातच ही प्रक्षेपित लीळा किती विसंगत आहे, हे सांगावयास नको. स्वामी म्हणतात, "वानरेयापासौनि सातांपांचा बोधु", "अधिकरणाते अधिकरुनि परमेश्वरु जीवाते उद्धरिती :" एवढा अधिकार व एवढे नागदेवांचे महत्त्व मान्य केल्यावर पुन्हा कोणते आचार्यत्व स्वामी बहाल करणार होते ? तेव्हा कोणत्याही तार्किक कसो[illegible]वर न उतरणारी ही लीळा खरी समजणारे डॉ. कोलते काय किंवा त्यांच्या होत हो [illegible]सळणारे काही महानुभाव काय किंवा त्यांचे समर्थक काय, आपणच काढलेल्या निष्कर्षाचा नीट विचार करीत नाहीत, असे दिसते. खरे तर, या "असल्या" महानुभावांनी एकदा तरी डॉ. कोलते यांचे संपादित लीळाचरित्र वाचून काढले आहे काय, याचे उत्तर त्यांनी द्यावे.

काही प्रश्न निर्माण होतात ते असे- दांडीत बसलेले स्वामी जर नागदेवांना म्हणतात, "तुला मी सोबत घेऊन जाणार आहे." जर सोबत नेलेच असते, तर स्वामींनीच त्यांच्याकडे सोपविलेल्या परिवाराचे काय झाले असते ? कोणी म्हणतील श्रीगोविंदप्रभुकडे गेले असते. परंतु स्वामींचे वचन तर "तुम्हा वानरेशासी निरोवीले" (म्हणजे सर्व परिवार भटोवासांकडे सोपविला) मग या वचनाची सत्यता कशी लक्षात घ्यावी ? लौकिक अर्थाने जरी बघितले तरी जीवांना अनिष्टापासून कादून इष्टी लावणारा दुसरा नागदेवतुल्य महापुरुष मार्गात होता काय ? परिवारात दुसरा नसताना स्वामींची ही धुरा चालविणारा कोणी उपलब्ध झाला असता काय ? आणि स्वतः स्वामींनी नागदेवांना आचार्यच काय परंतु प्रतिचक्रधर बनविले असताना पुन्हा आपल्या सोबत चलण्याविषयी कसे बरे म्हणतील ? पुनःसंबंध देण्याचे अभिवचन पुन्हा का ? या प्रश्नांची उत्तरे डॉ. कोलते काय किंवा त्यांचे समर्थक महानुभाव काय, देऊ शकतील ?

### अनैतिहासिक प्रक्षेपित लीळेचा कळस

"हा होय हा नव्हे म्हणणे" (उत्त. ६५१) ही लीळा तर प्रक्षेपित लीळांचा कळसच म्हणावयास पाहिजे. "दांडी उतरवली : स्वामी दांडिएखाली उतरले. : शस्त्रधरांनी शस्त्र प्रजिर्ले : हाक देउनि उभा राहिला : खर्ग घातले : श्रीकमळ एरिकडे पडिले : श्रीमूर्ती एरीकडे

पडिले : अवघा जन प्रतला" याचा अर्थ हे दृश्य पाहण्यासाठी अनेक लोक तेथे जमलेले होते. स्वामींच्या या मृत्युदंडावी त्यांना पूर्वकल्पना होती. यापूर्वीच्या लीळेतही दांडी घेऊन जाताना लोकांनी मार्गात कणिक, तांदूळ, तूप स्वामींना आणून दिले होते. राजाकडून मृत्युदंड झालेला असूनदेखील गावाचे लोक त्यांना खाणपानासाठी शिधा आणून देत आहेत, ही घटना निश्चितच नवलपूर्ण म्हटली पाहिजे. त्यांना राजदंडाची भीती नव्हती काय ? राजाच्या नामर्जीतल्या माणसाला आपण मदत करीत आहोत, हा साधा विवेकही त्यांना नव्हता काय ? पुढे दोन्ही शिर व धड एकत्र मिळाले. ते दृश्य तेथे बाजूला असलेल्या नाथपंथीय जोग्यांनी बघितले व 'सिद्ध रे सिद्ध' म्हणून ते ओरडलेही. डॉ. कोलते यांनी वापरलेल्या दधन प्रतीत ही माहिती अधिक अतिशयोक्तीने आलेली आहे. (लीळा उत्त. ६५२ तळटीप पाहावी.) त्यात नगरात अंधकार पडलेला आहे, गाई-पाखरांनी चारा खाणे सोडले, लेकरांनी मातेचे दूध पिणे सोडले इत्यादी अवास्तव व अनैतिहासिक वर्णन आलेले आहे. याच वेळी रामदेवराजाला आपली चूक समजली : तो म्हणाला, "आम्ही थोर वोखटे केले : ईश्वरपात्री क्रिया वीसंवली :"

दिवसा नगरात अंधकार पडणे, पशुपक्ष्यांनी चारा खाण्याचे टाळणे इत्यादी वर्णने तथा राजाला या सर्व गोष्टी झाल्या म्हणून स्वतःची चूक कळून येणे इत्यादी सर्व साक्षात्कारी गोष्टी याच वेळी कशा व्हाव्यात ? सूर्यग्रहण असेल तरच दिवसा अंधकार पडेल मग हा अंधकार कसा झाला ? तो सृष्टिनियमाच्या विरुद्ध नाही काय ? ही श्रीचक्रधरस्वामींची सृष्टिव्यवस्था कशी ? एकूण कोलते प्रतीतील काय किंवा इतर वधप्रकरणाच्या लीळा सांगणारी हस्तलिखिते काय-यांची तार्किक सुसंगती घडवून आणणे शक्यच नाही. "जोगियाचा अंगठा कैसा बरवा" असे म्हटल्यावर रामदेवाने स्वामींना पाहण्याची इच्छा का प्रगट करू नये ? अंगठा इतका सुंदर तर जोगी किती सुंदर असू शकेल ? किंवा स्वामींच्या ईश्वरी कार्यकर्तृत्वाची कीर्ती त्याच्या कानावर कधी गेलीच नसेल काय ? रामदेवाने स्वामींना पाहण्याची इच्छा व्यक्त केली असती तर राजापुढे नकार देण्याची कुणाची प्राज्ञा झाली असती ?

अतिशयोक्तीची अतिशयोक्ती मी वर वर्णन केलेल्या पोथी क्र. ३७ मध्ये पाहावयास मिळते. या अतिशयोक्तीचे उदाहरण डॉ. कोलते व डॉ. तुळपुळे यांना सापडले नसले तरी या हस्तलिखितात ते आहे.

"देवताचक्र आले : फुलांचा वरुषाओ जाला : लोकु आपुलालिया घरा : फुले घेउनि गेले : तडकु पडिला : पृथ्वी थरारिली : आपैसेयाचि तीडिकिया पडालिया : तीनी दी गावाआंतू आंधारे पडिले : रायाचिये जयपत्रीकेसि निगाले : जे इश्वरहनन घडेल ॥ ५७८ ॥"

यापुढचा भाग कोलते प्रतीतील दधन या प्रतीतील मजकुराशी संवादीच आहे. याही

लीळा किती वास्तव असू शकतील याचे विवरण डॉ. कोलते किंवा वध-घटना मानणारे महानुभाव देऊ शकतील काय ? आकाशात देवताचक्र येणे, आकाशातून फुलांचा वर्षाव होणे, विजा चमकणे, भूकंप होणे, तीन दिवस अंधकार पडणे या सर्व गोष्टी लोककथांशी जवळीक साधणाऱ्या आहेत. केवळ Myths आहेत. राजाची पत्रिका वधाच्या घटनेनंतरच सापडावी ? हेमाद्रीसारखे ब्राह्मण राजाची पत्रिका जाणत नव्हते ? आणि तीही त्यांना या "घटने"नंतरच उपलब्ध व्हावी ? "भटा अरिष्ट उठणे" या गोष्टी परीकथेत शोभतात. परंतु त्या स्वामींच्या नावाखाली दडपून देण्यात याव्यात, ही महानुभाव म्हणविणाऱ्यांची चलाखी आहे, यात शंका नाही. आणि अशा गोष्टी महानुभाव साहित्याचा अभ्यास करणारांच्या लक्षात येऊ नयेत, याचे आश्चर्य वाटते.

**आणखी एक अतिशयोक्ती**

देह व शिर हे एकत्र येऊन मिळण्याच्या प्रक्रियेबद्दल पुढे पाहूच; परंतु तत्पूर्वी याही अतिशयोक्तीवर कडी करणारी एक लीळा पुणे येथील श्रीकृष्णमंदिरातील हस्तलिखितात सापडली. त्यातील सोयीचा भाग पुढीलप्रमाणे :

श्रीमुगुट वोडवीला : श्रीकरीआंजुळी झेलीली : गरुडासनी बैसलें : माडे खुटी...... लोकु आवघा जाउ लागला : गोसावी श्रीमुगुट लाविला : वरि पुस्पाचा वरुशावो जाला : आकासी दुंधभी वाजीनलीया : तवं पाउस आला : तेथ फुलांची रासी जाली : गोसावी हळूहळू बीजे केले : घाटासि परतेसे तांबोळ प्रभजिले : पुढा परश्रय सारिली : ॥ ११२ ॥

म्हणजे श्रीचक्रधरांचे शिर धडावेगळे केल्यानंतर स्वामींनीच ते आपल्या हातात झेलले, व ते पुन्हा धडावर ठेवले, तथा ते पूर्ववत झाले. नाक, कान या अवयवच्छेदानंतर ज्यांना ते अवयव पूर्ववत करवून घेण्यासाठी तीन दिवसांचा एकांत लागतो (तात्पुरते खरे मानले तर), त्या चक्रधरांनी केवळ एका क्षणार्धात ही जादू करावी, याचे नवल कुणालाही वाटेल. कोणत्याही हस्तलिखितात नसणारी व कोणत्याही तर्कात न बसणारी ही प्रक्षेपित लीळा कशी अद्‌भुत म्हणून वाचकांच्या समोर प्रकट होऊ शकते, याचे जिवंत उदाहरण होय. आकाशात दुंदुभी वाजणे, आकाशातून फुलांच्या राशी पडणे, किंवा हस्तलिखित क्र. ३७ मध्ये उल्लेखिल्याप्रमाणे पृथ्वी थरारणे, देवताचक्र येणे, लोकांनी आपापल्या घरी फुले घेऊन जाणे, राजाच्या पत्रिकेत ईश्वरहनन लिहिले असणे या गोष्टी वास्तवाच्या पातळीवर उतरू शकतात काय ? वध या कल्पित घटनेला जे सत्य मानतात ते अभ्यासक वर उल्लेखिलेल्या सर्व प्रसंग-घटनांना सत्य मानतील काय ? या सर्व घटना ऐतिहासिक, प्राकृतिक म्हणून त्या सिद्ध करून देऊ शकतील काय ? तेव्हा अशा कल्पित लीळांचे पेव अनेक लीळाचरित्राच्या पोथ्यांमध्ये असल्याचे आपल्याला दिसेल.

**भटोबासांचे पुनः येणे शक्य नाही**

कोलते यांनी उद्‌धृत केलेल्या ही. बी. प्रतीत आलेली "अवस्था प्रकटणे" ही लीळा तसेच पुणे येथील श्रीकृष्ण मंदिरातील उपरिनिर्दिष्ट केलेल्या हस्तलिखितात तीच लीळा पाहण्यासारखी आहे. स्वामी येथून निघून गेल्यावर त्यांच्या वधस्थळी भटोबास आले. स्वामींचा देह जोडला जाताना तेथे काही "वोबाइणारे" नाथपंथी जोगी होते. त्यांना भटोबास भेटले. ते भटोबासांना म्हणाले, "साक्षात गोरक्षु : पुरुखी उठविले :" तेवढ्यात पाल्हा डांगिया भेटला, पुढे स्वामींचा "तांबोळ," "परिश्रयो" बघितला.

याही लीळेच्या संदर्भात काही प्रश्न निर्माण होतात. जेव्हा स्वामींनी भटोबासांना "राहा गा आश्चर्य देखाल" म्हणून वारंवार सांगितले, तेव्हा स्वामींची आज्ञा न प्रतिपाळता तेथून निघून गेले. आपण आता वधस्थळाकडे चाललो आहोत, हे स्वामींनी वारंवार सांगूनही तेथे भटोबास थांबले नाहीत. आणि मग स्वामींची अवस्था काय झाली असावी, हे पाहण्यासाठी नागदेवाचार्य तेथे आले होते काय ? ६५५ व्या लीळेत "उजनीए अवस्थान" या लीळेतही स्वामी उजनीयेला आहेत, असे गंगातीरीच्या चाट्यांनी सांगितल्यावर भटोबास त्यांना भेटण्यासाठी का जात नाहीत ? "वानरेया आता नवेया भेटी" अशी स्वामीजींची ब्रह्मवाचा असल्यावर मी तेथे जाऊन काय करू ? त्यांच्या आज्ञेचे उल्लंघन कसे करू ? असे स्पष्टपणे त्यांनी आपल्या शिष्यांना सांगितले होते. तेव्हा स्वामींच्या वचनावर दृढ श्रद्धा असणारे नागदेवाचार्य पुन्हा "घाटु चढु" लागेल हे संभवते तरी काय ?

**विसंगतीतील विनोद**

गंमत म्हणजे, कोलते प्रतीत काय किंवा त्यांनी नोंदवलेल्या पाठभेदांच्या हस्तलिखितात काय, आलेला मजकूरही अत्यंत विसंगत आहे, हे कोणाच्याही कसे लक्षात येऊ नये याचे आश्चर्य वाटते. उत्तरार्ध ६५४ व्या लीळेत विंध्य पर्वतावर भेटलेल्या चाट्यांना गोसावियांचे रूप पुढीलप्रमाणे दिसले : "गोसावियांची वरवी चांपेगौरा श्रीमूर्ती : श्रीकंठी फुलांची माळ" ही फुलांची माळ एवढी वधघटना घडल्यानंतर कुणा भक्ताने घातली होती ? जसे त्यांना दांडीएवरी बसून नेल्यानंतर लोकांनी तूप-कणिक नेऊन देणे गमतीचे, तसेच हेही गमतीचेच ! राजदंडानंतरही गावातील लोक स्वामींवर असे फिदा असावेत, राज्यशासन करणाऱ्या राजाची त्यांना यत्किंचितही भीती वाटली नाही, याचे नवल वाटते. किमान राजभीतीमुळे तरी हे करणे कदापिही शक्य नव्हते. ही घटनाच मुळी वास्तवापर्यंत जाऊ शकत नाही, याचे पुन्हा स्पष्टीकरण नको.

चाटे विचारतात, "स्वामी गोसावी एथ एकले : भक्तजन देखे ना जी" हा प्रश्न ठीक आहे; कारण स्वामी महाराष्ट्रातून विंध्य पर्वत ओलांडून चालले होते. तिकडून विंध्यपर्वत

अनुक्रमणिका

उतरून महाराष्ट्रात चाटे परतत होते. तेव्हा महाराष्ट्रातून निघून जाणाऱ्या या स्वामींना त्यांनी विचारलेला हा प्रश्न योग्यच होता. परंतु स्वामींनी दिलेले उत्तर मात्र किती विसंगत आहे ते पाहा– चाट्यांच्या त्या प्रश्नावर हे स्वामी म्हणतात, "तीये एणेवीण जीआली असती ?" चाट्यांनाच हा विचारलेला प्रतिप्रश्न म्हणजे आमच्याशिवाय ते काय जिवंत राहिले असतील ? यावाच अर्थ त्यांनी आमच्याविना प्राणत्याग केला असेल, असाच त्यातून अर्थ निघतो. परंतु या परिवाराने खरंच प्राणत्याग केला होता काय ? किंवा आमचा निरोप कसा सांगावा हे सांगताना जिवंत झालेले हे स्वामी म्हणतात, "तीये एणेवीण जीआली असती : आणि हे पुसत होते" यातून स्पष्ट होते की ते आमच्याशिवाय जिवंत आहेत. आणि आम्ही त्यांचे क्षेमकुशल विचारीत होतो हे त्यांना सांगावे. एकदा म्हणायचे- ते आमच्याशिवाय जिवंत राहणे शक्य नाही व लगेच सांगायचे आम्ही त्यांची विचारपूस करीत होतो. तेव्हा एकदा एक व दुसऱ्यांदा वेगळेच काही बोलणाऱ्या या पुरुषास सर्वज्ञ श्रीचक्रधर कसे म्हणावे ? तथापि या विसंगतीपूर्ण वाक्यांची दखल "वध झाला–" हे सिद्ध करू पाहणारांनी घेऊ नये याचे नवल वाटते.

**सारंगपंडिता भेटी**

"पुनरपि सारंगपंडिता भेटी" ही कोलते प्रतीतील ६५३ वी लीळाही तपासून पाहावी. गोसावी प्रतिष्ठानला आल्यानंतर सारंगपंडिताची भेट झाली. त्याने "आडपालौ" केला. स्वामींनी त्याबद्दल त्याला हटकले. तो खोटे बोलला, स्वामी मी आपल्याला बघितलेच नाही. पुन्हा सारंगपंडित विचारतो– "जी जी केव्हेळी बीजे केले ?" नंतर तो त्यांना स्वतःच्या घरी जाण्यास सांगतो. स्वतः लगेच स्नान उरकून येतो. असेही तो सांगतो. घरी आल्यावर वायकोला स्वामी आलेत काय म्हणून विचारतो. यावर उमाइसा – त्याची पत्नी – स्वामी न आल्याचे सांगते, उलट तुम्हाला भेटले होते तर तुम्हीच स्वामींना घरी येऊन का नाही आलात ? असे ती सारंगपंडितास म्हणते.

या लीळेत स्वामी सारंगपंडितांना भेटतात, परंतु पाल्हा डांगिया किंवा चाटे यांना भेटल्यानंतर जसे त्यांनी स्वामी जिवंत असल्याबद्दलचे आश्चर्य व्यक्त केले होते, तसे सारंगपंडिताने का करू नये ? वध होऊन पुन्हा जिवंत होणे-ही काही सामान्य प्रक्रिया निश्चितच नव्हे. वधानंतर पहिल्यांदाच तो स्वामींना भेटला-तेव्हा त्याने याविषयी कोणतीच विचारणा करू नये, हे एक आश्चर्यच नाही काय ? की गुजराथेहून येणाऱ्या चाट्यांना स्वामींचा वध झाला ही घटना गुजराथेत कळावी व महाराष्ट्रातच झालेल्या (?) या घटनेचा सारंगपंडितास मागमूसही नसावा ? एवढेच काय परंतु स्वामींच्यावर नितांत श्रद्धा ठेवणाऱ्या उमाइसाला– सारंगपंडिताच्या बायकोलाही–स्वामींच्या पुनरपि आगमनाचे आश्चर्य वाटू नये-तेव्हा वध ही घटना ऐतिहासिक मानणारांनी या लीळांमधील विसंगती

थोडीही तपासून पाहू नये काय? स्वामींचा वध झाला व ते पुन्हा जिवंत होऊन पैठणला आलेत, याचे थोडेतरी नवल तिने व्यक्त केले नसते काय? ही शंका निश्चितच तिने आपल्या नवऱ्याजवळ बोलून दाखविली असती. सारंगपंडितानेही त्यावर आपला काहीतरी अभिप्राय निश्चितच दिला असता. तेव्हा हे घडलेच नसल्याने सारंगपंडित काय किंवा उमाइसा काय-त्यांना शंका येण्याचे कारण नव्हते.

## एका अवताराची खंत दुसऱ्या अवतारी

बरे वध झाला, असे गृहित धरले, सारंगपंडिताची खोटी साक्षही स्वीकारली-तर स्वामींना त्यांच्याविषयी खंत येऊ नये काय? तरी स्वामींनी त्याला पुन्हा भेट देण्याचे कारण काय होते? स्वामींची भेट दूर ठेवू. श्रीगोविंदप्रभुचरित्रात आलेली लीळा क्र. २७५ काय सुचविते? सारंगपंडितांचा उपहार श्रीप्रभूंनी मोठ्या कौतुकाने स्वीकारला होता. "एरी अवताराची खंति एरि अवतारी विसंवे" हा पक्ष जर आपण गृहित धरला, तर स्वामींच्या विरुद्ध दिलेली खोटी साक्ष याविषयीची खंत श्रीगोविंदप्रभूंना यावयास नव्हती काय? परंतु तसे दिसत नाही. याच श्रीगोविंदप्रभुचरित्रात आलेली "एकाइसा संचरित पोळीका अंतर" (ली. १४६) ही लीळा विशेष विचारात घेण्यासारखी आहे. ही लीळा पाहण्यापूर्वी या लीळेची पार्श्वभूमी सिद्ध करणाऱ्या लीळाचरित्रातील एका लीळेचा विचार येथे करू. लीळाचरित्रातील (उत्त. ५६३) "एकाइ रीणयाचनी लखुबाइसी उरीण करणे" या लीळेत लखुबाइसाने आपली सेताची पाटी दोन आसूना एकाइसाजवळ गहाण ठेवली होती. एकाइसाला वाराणशीला जायचे होते म्हणून तिने आपले दोन आसू लखुबाइसाला परत मागितले. अर्थातच त्या वेळी तिच्याजवळ दोन आसू नव्हते. त्याऐवजी आपण तुम्हाला दुसरे काही देऊत म्हणून स्वामींनी तिला परोपरीने सांगितले. परंतु एकाइसा ऐकेना. शेवटी स्वामींनी नागदेवाचार्यांना एल्हंभट सावखेडकरांकडे दोन आसू मागण्यासाठी पाठविले. तिकडून आल्यावर भुकेलेल्या नागदेवाचार्यांना एकाइसाजवळ असलेली शिदोरी तिला देण्यास लक्षणेने सुचविले. परंतु एकाइसाने आपली शिदोरी भटोबासांना दिली नाही, याची स्वामींना खंत आली. पुढे याच एकाइसाने जेव्हा श्रीगोविंदप्रभुंना आपला उपाहार करण्याबद्दलचा मनोदय म्हाइंभटादी प्रभृतींजवळ व्यक्त केला, तेव्हा त्यांनी त्यास स्पष्टपणे नकारच दिला. विनंती करूनही ऐकत नाही, असे पाहून शेवटी ती आबाइसाजवळ आली. भोळ्याभाबड्या आबाइसाने एकाइसाच्या पोळ्यांचा उपाहार श्रीगोविंदप्रभूंना दिला. श्रीप्रभूंनी आलेल्या उपाहारातील नेमक्या एकाइसाच्या पोळ्या बाहेर काढल्या, बाहेर फेकल्या. शेवटी दुसऱ्या पोळ्या आल्यावरच श्रीगोविंदप्रभूंनी भोजन घेतले. (श्रीगोविंदप्रभुचरित्र लीळा क्र. १४६) केवळ आपल्या शिष्याच्या शिष्याला (श्रीचक्रधरांच्या शिष्याला-नागदेवांना) स्वामींची इच्छा असूनही आपले अन्न दिले नाही म्हणून एकाइसाच्या

पोळ्या बाहेर फेकणारे श्रीगोविंदप्रभू जेव्हा आपल्याच शिष्याच्या (श्रीचक्रधरस्वामींच्या) वधाला कारणीभूत होणाऱ्या सारंगपंडिताचा उपाहार कसा स्वीकार करतील? परंतु तो तर त्यांनी स्वीकारला (श्रीगोविंदप्रभुचरित्र २७५). एवढेच काय "ऐया माझा आता होए म्हणे" असे म्हणून सारंगपंडितावर ते खूपही झालेत. ते कसे काय? या गोष्टीचा महानुभाव वाङ्मयाचा व तत्त्वज्ञानाचा अभ्यास करणारांनी पुन्हा एकदा विचार करावा, असे नम्रपणे सुचवावेसे वाटते.

(उत्तरार्ध पुढील अंकी)

(रेव्हेन्यू कॉलनी, शिरूर ४१२२१०)



अनुक्रमणिका

डॉ. सुधाकर शं. देशपांडे

# साहित्यसंशोधन आणि समीक्षा

संशोधन हा शब्द आज काही नवे शोधून काढणे, उपलब्ध सिद्धान्ताचे/सामग्रीचे अभिनव दृष्टीने विवेचन करणे या अर्थाने योजिला जातो. ज्ञानसंपादन प्रक्रियेचा तो एक महत्त्वाचा भाग आहे. उपलब्ध ज्ञानाच्या त्या त्या क्षेत्रातील कक्षा संशोधनाने पहिल्यापेक्षा विस्तृत व सखोल व्हाव्यात अशी अपेक्षा असते. संशोधन शब्द व्युत्पत्तीच्या अंगाने पारखला तर तो चुका, दोष, भ्रष्टता काढून एखादी कृती निर्मळ, लखलखीत, शुद्ध करणे असा अर्थ सुचवितो. एकनाथांनी ज्ञानेश्वरीचे संशोधन केले ते या अर्थाने. अलीकडे संशोधन या शब्दाचा संदर्भविस्तार झालेला आहे. संशोधन कोणत्या क्षेत्रात होत नसते ? विज्ञान, सामाजिक शास्त्रे, साहित्य आणि अन्य कला यांत संशोधन होत असते. तथापि त्यांची सामग्री, त्यांची उपकरणे, त्यातील वास्तव हे इतक्या वेगवेगळया प्रकारचे आहे की, संशोधन म्हणजे निश्चित काय हे सुटसुटीतपणे सांगता येत नाही. संशोधन हा परिश्रमपूर्वक, दक्षतेने आणि एका विशिष्ट शिस्तीने केलेला अभ्यास असतो. ते अभ्यासाचे केवळ फलित नसते तर फलिताप्रत पोचण्याची अभ्यासप्रक्रियाही त्यात सादर केलेली असते, वस्तुनिष्ठा हा तिचा प्राण असतो असे मात्र निश्चित म्हणता येते.

समीक्षा म्हणजे उपलब्ध कृतीची सम्यक, परिपूर्ण पाहणी करणे, चिकित्सा करणे. वेगवेगळ्या शास्त्रांतील मर्मदृष्टी घेऊन साहित्याची समीक्षा करता येते. त्यामुळे समीक्षा ही बहुरूपिणी होते. चरित्रात्मक, ऐतिहासिक, समाजशास्त्रीय, मानसशास्त्रीय, रूपलक्षी, शैलीविज्ञानात्मक, आदिबंधात्मक, संरचनावादी, घटितार्थशास्त्रीय व अस्तित्ववादी सौंदर्यविचारांच्या अनुषंगाने, तौलनिक, आस्वादक अशा विविध पद्धती योजून समीक्षा करता येते. साहित्यव्यवहारात साहित्यिक, कलाकृती आणि वाचक ही तीन महत्त्वाची अंगे असतात. संशोधन या तिन्ही अंगांविषयी होऊ शकते. नवीन अज्ञात साहित्यिकाचा शोध लावणे, अनुपलब्ध कृती प्रकाशात आणणे आणि विशिष्ट कालखंडातील वाचकाभिरुचीचा आलेख काढणे व या सामग्रीच्या आधारे काही निष्कर्ष सांगणे हे काम संशोधन करते. समीक्षाव्यापारसुद्धा या त्रिविध अंगांनी सिद्ध होऊ शकतो. चरित्रात्मक पद्धती लेखककेंद्री असते, रूपलक्षी साहित्यकृतिनिष्ठ असते तर आस्वादक पद्धती वाचककेंद्री असते. याचा अर्थ असा नव्हे की, फक्त एका घटकाशी एक समीक्षापद्धती निगडित असते. उदा. घटितार्थशास्त्रान्वये साहित्यकृतीचा आस्वाद हा कलाकृतिनिष्ठही नाही आणि

वाचकनिष्ठही नाही. कलाकृती व सहृदय वाचक यांच्या सहसर्जक साद-प्रतिसादातून तो निष्पन्न होतो. समाजशास्त्रीय समीक्षा साहित्यिकाचा मूळ पिंड, त्याच्या काळच्या समस्या, आशयाने साहित्यकृतीत धारण केलेले रूप आणि वाचकांवर त्याचा पडणारा प्रभाव या साऱ्यांचा विचार करते. साहित्यकृतीच्या आकलनाला, अर्थनिर्णयनाला कोणती पद्धती उपकारक ठरेल हे ओळखून तारतम्यानेच तिची योजना करावी लागते. कधीकधी एका पद्धतीवरच विसंबून न राहता तारतम्याने तिला पूरक अशा इतर अभ्यासपद्धतीही योजाव्या लागतात. वॉरन आणि वेलेक यांनी 'थिअरी ऑफ लिटरेचर' या ग्रंथात बहिर्वेधी व अंतर्वेधी असे या समीक्षापद्धतींचे दोन गटांत वर्गीकरण केले आहे. समाजशास्त्रीय, मानसशास्त्रीय, चरित्रात्मक, साहित्य आणि इतर ललित कला यांचे संबंधदर्शन हे बहिर्वेधी अध्ययन आहे तर ज्या पद्धतीत छंद, शैली, तंत्र, प्रतिमा-रूपक-प्रतीक आणि प्राक्कथा यावर दृष्टी केंद्रित केलेली असते तिला अंतर्वेधी गटात समाविष्ट केलेले आहे. या दोन प्रकारांतील भेद साधनरूपी, वर्णनात्मक अध्ययन (म्हणजेच बहिर्वेधी) व साध्यरूपी, मूल्यमापनात्मक (म्हणजेच अंतर्वेधी) असाही दाखवता येणे शक्य आहे. संशोधन बहिर्वेधी गटात तर समीक्षा अंतर्वेधी गटात पडेल.

साहित्यसंशोधन हे मुळाकडे जाण्याचा प्रयत्न करते, तर साहित्यसमीक्षा जी साहित्यकृती समोर आहे, उपलब्ध आहे तिची चिकित्सा करते. 'ज्ञानेश्वरीचे मूळ गीता आहे' हे संशोधन; तर 'यथार्थदीपिका या वामनपंडितांच्या ग्रंथापेक्षा ज्ञानेश्वरी श्रेष्ठ आहे,' हे वाङ्मयीन कसोट्यांच्या आधारे सांगणे ही साहित्यसमीक्षा ठरेल.

साहित्यसंशोधन हे साधन आहे तर साहित्यसमीक्षा हे साध्य आहे. साहित्यसंशोधनाचा पाया भक्कम नसेल तर साहित्यसमीक्षा स्थिर होणारच नाही. प्रा. अ. का. प्रियोळकरांनी असे दाखवून दिले आहे की, 'दमयन्ती स्वयंवरा'तील हंसाचे स्वभावचित्रण रघुनाथपंडितांनी फार बहारीने केले आहे, असे श्रेय मराठीचे अभ्यासक देतात. पण ते स्वभावचित्रण अनेक ठिकाणी मूळ 'नैषधा'लाच अनुसरणारे आहे. आपणास माहीत आहे की ज्ञानदेवगाथ्यातील वा नामदेवगाथ्यातील अभंगांत खूप भेसळ आहे. त्या गाथांत अभंगकर्तृत्वनिश्चिती केल्यावाचून, त्या संशोधनावाचून लेखकाभ्यासाच्या अंगाने जाणारी समीक्षा करण्यात दिशाभूल होण्याचा धोका फार मोठा आहे. प्राचीन वाङ्मयाचा अभ्यास करीत असताना व्यक्ती, काल, स्थळ, ग्रंथकर्तृत्व, संप्रदाय याविषयी वादंग आढळते. ज्ञानदेव एक की दोन; नामदेव, वामन किती ? मुकुंदराजाची अंबानगरी कोणती ? हरिनाथ आणि चक्रधर हे एकच की वेगळे ? मग चक्रधर गुजराती प्रधानपुत्र होते हे ऐतिहासिक सत्य की पारंपरिक समजूत ? आदी-तीर्थावळी-समाधी या ज्ञानेश्वर चरित्रात्मक प्रकरणांचा लेखक ज्ञानदेवसमकालीन नामदेव आहे की नाही ? ज्ञानेश्वरीची अधिकृत संहिता आणि तिची ओवीसंख्या या साऱ्याचा उलगडा संशोधनाने झाल्यावाचून,

अनुपलब्धी व भ्रष्टोपलब्धी या अडचणींवर मात केल्यावाचून लेखकाभ्यासाच्या अंगाने जाणारी समीक्षा चाचपडतच राहणार. या समस्या केवळ प्राचीन साहित्याच्या संदर्भातच नव्हे, तर आधुनिक साहित्याच्या संदर्भातही समीक्षेची वाट बिकट करून उभ्या असतात. आधुनिक साहित्यिकांच्या निर्मितिप्रक्रियेवर प्रकाश पडू शकेल अशी त्यांनी केलेली परिष्करणे, त्यांचा पत्रव्यवहार, त्यांची विश्वसनीय चरित्रे, दैनंदिन्या यांचे संशोधन होणे अगत्याचे आहे. केशवसुत-तांबे यांच्या कवितांची मूळ हस्तलिखिते, त्यांचा पत्रव्यवहार उपलब्ध झाल्याने त्यांच्यावरील समीक्षेला एक नवी दिशा मिळालेली आहे, हे येथे ध्यानी घ्यावे.

प्राचीन साहित्याची समीक्षा करताना आजच्या संकल्पना, आजचे अर्थ आपण त्या वाङ्मयाच्या आशयावर, भाषेवर लादण्याची शक्यता असते. ज्ञानेश्वरीत 'महामेरू' हा शब्द प्रासादरचनेचा एक श्रेष्ठ प्रकार या अर्थी येतो, धर्मकीर्तनमधील कीर्तन म्हणजे मंदिर वा तत्सदृश धार्मिक स्वरूपाचे शिल्प, धर्मनिधान म्हणजे धर्मार्थ बांधलेली तीर्थकुंडे असे स्पष्टीकरण डॉ. रा. चिं. ढेरे यांनी दिले आहे. रामदासांनी योजिलेले 'राजकारण', 'मराठा', 'महाराष्ट्र धर्म' यांचा अर्थ वादाच्या वावटळीस कारण झाला आहे. समीक्षेत आकलन, अर्थनिर्णयन हा महत्त्वाचा टप्पा आहे. शब्दांच्या अर्थच्छटांचे, प्रयोगाचे संशोधन ऐतिहासिक शब्दकोशात ग्रथन केले असेल, तर ते समीक्षेस फार साह्यकारक होते.

प्राचीन मराठी साहित्य ज्या काळात लिहिले गेले त्या काळच्या महाराष्ट्राच्या राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक जीवनाचे संशोधन समीक्षेस उपकारक ठरते. डॉ. रा. चिं. ढेरे यांनी ज्ञानदेवांनी ज्ञानदेवीच्या अठराव्या अध्यायात गीतारत्नप्रासाद रूपक रचले त्यामागे राष्ट्रकूट नृपती कृष्णराज याने ज्याची रचना करून घेतली ते वेरूळ येथील कैलास लेणे कसे प्रेरक असावे ते दाखवले आहे. प्रा. म. वा. धोंड यांनी ज्ञानदेव ज्ञानेश्वरीच्या बाराव्या अध्यायात योगदुर्गाचे जे रूपक उभारतात त्या रूपकातील दुर्ग ज्ञानेश्वरांच्या भ्रमणपरिसरात असणारा आणि ज्ञानेश्वरीच्या रचनास्थळापासून अगदी जवळ असलेला देवगिरीचा दुर्ग होय, असे रहस्योद्घाटन केले आहे. त्यामुळे ज्ञानेश्वरीतील या भागाची पाठचिकित्सा नीट होऊन मूळ पाठांना सार्थता प्राप्त झालेली आहे. परंपरेचे अज्ञान असेल, ऐतिहासिक अनुबंधाकडे दुर्लक्ष असेल, तर साहित्यकृतीचे यथार्थ आकलन या प्राथमिक टप्प्यावरच समीक्षेचा मार्ग कुंठित होईल. आधुनिक काळातील केशवसुत, तांबे, सावरकर, पु. शि. रेगे आदी कवींच्या कवितेतील पाठांतराचा, परिष्करणांचा विचार, हे संशोधन समीक्षेस लाभदायक ठरते असे दिसून आले आहे.

संशोधनात कार्यपद्धतीची शिस्त पाळावी लागते. एखाद्या समस्येवर उत्तर शोधण्यासाठी, एखाद्या प्रश्नाचा उलगडा करण्यासाठी संशोधन हाती घेण्यात येते. तो एक प्रकल्प असतो. विषयाची निवड केल्यावर साधनसामग्री गोळा करून समस्येच्या

सोडवणुकीसाठी अभ्यासक काही एक अभ्युपगम मांडतो. त्यानंतर अभ्युपगमास बळकटी येणारी तथ्ये आढळतात काय हे तो पर्यवेक्षण, प्रत्यक्ष प्रयोग यांच्या आधारे शोधतो. सामग्रीचे वर्गीकरण, विश्लेषण करतो. अभ्युपगम समस्येच्या सोडवणुकीस साह्यभूत होत आहे हे ध्यानी घेतल्यावर तो निष्कर्ष मांडतो. सिद्धांतस्थापना करतो. हे करीत असताना विषयाच्या सर्व बाजू लक्षात याव्यात म्हणून पूरक माहिती, संदर्भ, अवतरणे बिनचूकपणे देतो. ती देण्यातही एक सर्वमान्य पद्धत काटेकोरपणे स्वीकारून शेवटपर्यंत तिचे तो निर्वहण करतो.

ज्या प्रमाणात समीक्षा वरील शिस्त अवलंबील त्या प्रमाणात ती संशोधनाच्या क्षेत्रात जाईल. सर्व प्रकारचे (अभ्यासाची शिस्त पाळणारे) चिकित्सापर लेखन म्हणजे संशोधन या व्यापक अर्थाने ती संशोधन या पदवीस पात्र होईल. ज्या समीक्षालेखात असे अभ्युपगम नसतात, आधार दिलेले नसतात ते कितीही विचारप्रवर्तक, मौलिक असो त्याला "पारिभाषिक संज्ञा' या निकषान्वये तरी संशोधन म्हणता यावयाचे नाही. तसेच जे संशोधन मूल्यमापन हा टप्पा वगळून पाठचिकित्सा, स्थलकालनिर्णय, साहित्यिकाचे लौकिक चरित्र, ग्रंथसंख्या, ग्रंथाची जननिक चिकित्सा या टप्प्यावरच थबकते त्याला समीक्षा ही पदवी मिळणार नाही. थोडक्यात, संशोधकीय प्रक्रिया व समीक्षकीय प्रक्रिया या परस्परपूरक आहेत; पण समकक्ष मात्र नाहीत.

साहजिकच सर्व प्रकारचे संशोधन समीक्षा या वर्गात बसणार नाही आणि समीक्षेची सर्व रूपे 'संशोधन' म्हणून गणता येत नाहीत. आस्वादक पद्धतीची समीक्षा, संस्कारवादी समीक्षा, काव्यात्मक समीक्षा यांना संशोधन म्हणणे अशक्य आहे. तसेच वर सांगितल्याप्रमाणे पाठचिकित्सा, लेखकाचा स्थलकालनिर्णय आदी संशोधन असले, तरी समीक्षा नाही. परंतु असा एक प्रांत येतो की, जेथे संशोधन व समीक्षा यांचे एकात्म रूप दृष्टीस पडते तेथे संशोधक हा समीक्षेत उणा नसतो किंवा समीक्षक संशोधनाच्या तंत्रात आणि मंत्रातही उणा पडत नसतो. समीक्षा आणि संशोधन हे द्वंद्व तेथे पार मिटलेले असते.

साहित्याभ्यासाची ही आदर्श अवस्था होय.

(५/५ चंद्रशेखर, स्वामी नित्यानंद नगर, अंधेरी (पूर्व) मुंबई ४०००६९)

---

### साभार स्वीकार

**अत्र्यांची हास्यप्रधान नाटके** : डॉ. शशिकांत देशपांडे, उमा प्रकाशन, पुणे, पृष्ठे २४४, मूल्य- १२०/-

**अनंत** : आशा बगे, ज्ञानदा प्रकाशन, पुणे, पृष्ठे १९८, मूल्य- ९०/-

**क्रांतिफुले** : भा. द. खेर, ज्ञानदा प्रकाशन, पुणे, पृष्ठे १२१, मूल्य- १००/-

**आवड निवड** : शांता शेळके, ज्ञानदा प्रकाशन, पुणे, पृष्ठे १९८, मूल्य- ९०/-



अनुक्रमणिका

डॉ. यशवंत शंकर साधु

# 'विवेक-सिंधू': एक पुनर्मूल्यांकन

'विवेकसिंधू'बद्दल काही रूढ मते आहेत. जसे 'विवेकसिंधू हे कवितारतीचे विलासभवन नव्हे. तो योगेश्वराचा आश्रम आहे' असे डॉ. अ. ना. देशपांडे यांचे मत आहे'[१] किंवा 'मराठी भाषेच्या वेशातला शांकरमठातला सुबोध वेदान्तपाठं म्हणजे विवेकसिंधू होय,' असे मत तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी मांडले.[२] ही मते वरवर पाहता खरी वाटतात. कारण 'विवेकसिंधू'त प्रामुख्याने 'तत्त्वमसि' महावाक्याची फोड केली आहे.[३] त्यातील १८ प्रकरणांतून 'तत्त्वमसि' महावाक्याचाच विस्ताराने विचार केला आहे. विशेषतः पूर्वार्धाच्या तिसऱ्या प्रकरणापासून सातव्या प्रकरणापर्यंत वेदान्तातील अनेक विषय कवीने सुबोध शब्दांत मांडलेले आहेत. उत्तरार्धातील १० वे प्रकरण हे तर वेदान्तातील सत्, चित् आणि आनंद या तीन पदांचे सूत्रबद्ध विवेचन करण्यासाठीच लिहिले आहे. सूत्रात्मक भाषेचा वापर करून कवीने उपनिषदांतील सिद्धांताचे विवेचन केले आहे. त्यामुळे 'विवेकसिंधू'त केवळ वेदान्ताचीच चर्चा आहे, हा ग्रंथ अतिशय रूक्ष आणि तर्ककठोर आहे अशी समजूत होणे स्वाभाविक आहे. 'विवेकसिंधू'त कोणत्याही प्रकारची काव्यात्मकता नाही, कोणत्याही प्रकारचे सौंदर्य नाही, असा बळकट समज ठामपणे वाचकांच्या मनात दृढ झाला आहे. परंतु बारकाईने पाहिल्यास 'विवेकसिंधू' हा ग्रंथ केवळ तत्त्वज्ञानाची रूक्ष चर्चा करणारा ग्रंथ नाही, तर मराठीच्या या आद्यग्रंथात पुढील 'ज्ञानेश्वरी', 'एकनाथी भागवत', 'दासबोध' इत्यादी ग्रंथांच्या निरूपण-पद्धतीची बीजे आढळतात.

'विवेकसिंधू' हा ग्रंथ केवळ वेदान्त चर्चेचाच ग्रंथ आहे असे समीक्षकांचे मत बनण्यास दुसरेही एक कारण आहे, ते म्हणजे स्वतः मुकुंदराजांनी 'आपण मराठीतून वेदशास्त्राचा मथितार्थ कथन करणार आहोत,' असे म्हटले आहे.' शंकराचार्यांच्या उक्तीचे मराठीतून आपण प्रतिपादन करणार आहेत अशी भूमिका कवीने 'विवेकसिंधू'त घेतली आहे. इतकेच नव्हे, तर नवरसनिर्मितीबद्दल उदासीनतेचे उद्‌गार कवीने काढले आहेत. 'नवरसनिर्मिती म्हणजे भाषेची उघड फसवणूक आहे. त्यामुळे फारतर कवीचे चातुर्य प्रगट होईल पण त्यास परमार्थाचा लाभ होणार नाही. रसनिर्मिती ही मायीक आहे,' असे कवीचे मत आहे. जो कवी उघड उघड रसपूर्ण शैलीबद्दल उपरेपणाचे उद्‌गार काढतो त्याचे काव्य रसपूर्ण असे असू शकेल, असे वाटणे स्वाभाविक आहे. परंतु 'विवेकसिंधू' चे अंतरंग पाहिल्यास कवीच्या वरील भूमिकेस छेद देणारी अनेक स्थळे 'विवेकसिंधू'त आढळतात.

'विवेकसिंधू' हा मराठीतील आद्यग्रंथ आहे हे गृहीत धरूनच 'ज्ञानेश्वरी' या त्यानंतरच्या ग्रंथामुळेदेखील 'विवेकसिंधू' बद्दल अपेक्षा वाढणे स्वाभाविकच आहे. ज्ञानेश्वरीतदेखील तत्त्वनिरूपण आले असले, तरी काव्याच्या अंगाने ते फुलविण्याची ज्ञानदेवांची एक खास शैली आहे. त्यामुळे ज्ञानेश्वरी हा काव्याच्या दृष्टीने अजोड ग्रंथ आहे. त्या तुलनेत 'विवेकसिंधू' हा अतिशय फिका वाटणारा ग्रंथ आहे. पण याचा अर्थ असा नव्हे की, 'विवेकसिंधू'त काव्यसौंदर्याचा लवलेशही नाही. एकूण १७०० ओव्यांच्या या ग्रंथात तत्त्वनिरूपणासाठी अधिकात अधिक ओव्या खर्च केल्या आहेत. वेदान्तातील पारिभाषिक शब्द (जसे : पंचीकरण, स्थूलदेह, कारणदेह, लिंगदेह, सत्पद, चित्पद इ.) योजून मुकुंदराजांनी निरूपण केले आहे. परंतु हे काही केवळ विवेकसिंधूचेच वैशिष्ट्य नाही. 'ज्ञानेश्वरी' तही १५ व्या अध्यायात, १३ व्या अध्यायात निखळ वेदान्ताचे निरूपण आले आहे. ते निरूपण वरीलप्रमाणे पारिभाषिक शब्दांतच आहे. पण केवळ निरूपण ज्यात आहे अशी स्थळे ज्ञानेश्वरीत अतिशय कमी प्रमाणात आलेली आहेत. जो काही तात्त्विक आशय असेल, तो काव्यानुभवाच्या पातळीवर ज्ञानेश्वर मोठ्या प्रमाणात नेत असतात. अर्थात प्रतिभेचे हे सामर्थ्य मुकुंदराजाच्याही ठिकाणी होते असे मुळीच म्हणावयाचे नाही. परंतु मुकुंदराजांकडे कसलीच काव्यप्रतिभा नव्हती, हे मत मात्र मान्य होण्यासारखे नाही. मराठीच्या या आद्यकवीने आपल्या काव्यात पुढील मराठी कवितेच्या पायवाटा कशा निर्माण केल्या होत्या, प्राचीन मराठी कवींची म्हणून काहीएक काव्यशैली होती, त्या काव्यशैलीचे उद्घाटन मुकुंदराजांनी कसे केले आहे हे पाहणे उद्बोधक ठरेल.

**मराठी भाषेविषयीचा अभिमान :** मराठीचा गौरव सर्वच प्राचीन कवींनी केला आहे. नरेंद्र, ज्ञानदेव, चक्रधर हे एकापेक्षा एक मराठीचे अभिमानी होते. पण मराठीविषयी वाटणारा हा आपलेपणा प्रथम आपणास मुकुंदराजाच्या 'विवेकसिंधू'त आढळतो. 'ऊस वरवर काळा व ओबडधोबड वाटत असला, तरी त्यातील रस मात्र काळा आणि ओबडधोबड नसतो. तो अतिशय मधुर असतो,' किंवा 'एखादे रत्न धुळीत सापडले म्हणून शहाणे लोक त्या रत्नाची उपेक्षा करीत नसतात. त्याप्रमाणे वेदशास्त्रांचा मथितार्थ जर मराठीसारख्या भाषेतून मिळत असेल, तर सुज्ञांनी त्याचा स्वीकार का करू नये ?' असा प्रश्न मुकुंदराजांनी उपस्थित केला आहे. 'रुईच्या झाडातूनच मधाच्या कावडीच्या कावडी मिळत असतील, तर मधासाठी ठिकठिकाणी हिंडण्याचा खटाटोप कशासाठी ?' असा प्रश्न निर्माण करून कवीने मराठी भाषेतही मधाचा गोडवा आहे, पण त्याचबरोबर विचाराचे तेजदेखील आहे, असे दाखवून दिलेले आहे. आपल्या प्राचीन कवींनी (म्हणजे मुकुंदराज, ज्ञानेश्वर, एकनाथ इ.) संस्कृताभिमानी पंडितांना मराठी भाषादेखील तत्त्वप्रतिपादनास व रसनिर्मितीस समर्थ आहे, हे तर दाखवून दिलेच, पण संस्कृतच्या तुलनेत प्राकृत भाषा आजवर उपेक्षित होत्या ही वस्तुस्थिती लक्षात घेऊन त्या प्राकृत भाषांतील ब्रह्मज्ञानाचा, वेदान्ताचा अव्हेर करू नये

अशी विनंती सर्व जुन्या कवींनी केली आहे. ज्याप्रमाणे मुकुंदराजाने मराठीतील वेदान्तास 'धुळीतील रत्न' म्हटले आहे (पूर्वार्ध प्र. १ ओवी १३), त्याचप्रमाणे तशाच प्रकारचे उद्‌गार संत एकनाथांनी भागवत टीकेत (एकनाथी भागवत, अध्याय ९ ओवी ४९७) काढले आहेत. 'श्रीकृष्णमुखीची अक्षरे संजयाने आंधळ्या धृतराष्ट्रास मोठ्या प्रेमाने सांगितली तीच ती मराठी भाषेत कशीतरी अव्यवस्थित ओबडधोबड रचना करून तुम्हा श्रोत्यांपुढे निवेदन केली आहेत,' असे जेव्हा ज्ञानदेव म्हणतात तेव्हा त्यात ज्ञानदेवांच्या स्वभावातील विनय स्पष्टपणे जाणवतो. मोठ्या विनयाने मराठी भाषेचा गौरव करण्याची जी मराठीची परंपरा आहे तिचा उगम मुकुंदराजाच्या 'विवेकसिंधू'त आढळतो.

**स्त्रीशूद्रांचा कळवळा :** 'ज्यांना शास्त्राचे अध्ययन करण्याची मान्यता नाही; तर्क, योग, मुद्रा यांचे ज्ञान व अनुभव नाही, अशांसाठी आपण मराठीतून ही ग्रंथरचना केली' असे मुकुंदराज वर्णन करतात. अर्थात ज्ञानदेव-एकनाथ इ. कवींच्या उद्‌गाराशी मुकुंदराजांची भूमिका सुसंगतच आहे. 'वेद आपल्या परीने ज्ञानाच्या बाबतीत संपन्न आहेत, परंतु वेदांसारखे कृपणदेखील जगात कोणी नाही, कारण वेदांचा उपयोग फक्त तीनच वर्णांसाठी आहे. इतर स्त्रीशूद्रादिक प्राण्यांना भवसागरातून उद्धरून नेण्यास वेदांचा काहीही उपयोग नाही. मी मात्र संसाराच्या चव्हाट्यावर मोक्षसुखाचे अन्नछत्र घातले आहे' अशी भूमिका ज्ञानदेवांनी घेतली आहे. संतांच्या कृपाळूपणाचा हा वारसा मुकुंदराजाकडूनच मराठीत आला आहे. संत एकनाथ यांनीदेखील भागवत टीकेत हीच भूमिका घेतली आहे.

**परब्रह्मरस :** 'शृंगार, वीर, करुण इ. नऊ रस जेथे अतिविरस होतात, असा जो एकमेव परब्रह्मरस' त्याचा आस्वाद घेण्याचा आग्रह मुकुंदराजांनी धरला आहे. त्यास त्यांनी 'ब्रह्मरस' म्हटले आहे. 'नवरसापेक्षा हा परब्रह्मरस श्रेष्ठ आहे. म्हणून त्याचेच ग्रहण करावे' अशी भूमिका कवीने मांडली आहे. नवरसांपेक्षा परब्रह्मरसास महत्त्व देणाऱ्या कवीच्या काव्यात कुठली काव्यात्मकता असणार, अशी शंका निर्माण होणे स्वाभाविक आहे. कारण परब्रह्मरस म्हणजे परमात्म्याच्या, ईश्वराच्या साक्षात्काराचा अनुभव होय. हा अनुभव म्हणजे श्रेष्ठ कोटीचा आनंद आहे आणि या आनंदाचे सेवन नवरसापेक्षा श्रेष्ठ आहे असे केवळ मुकुंदराजांनाच वाटते असे नाही, ज्ञानदेवादींनीदेखील ब्रह्मरसाची अशीच तरफदारी केली आहे. 'श्रीकृष्णाने अर्जुनासाठी ब्रह्मरसाचे भोजन तयार केले आणि आयत्या वेळी आम्ही त्या वेळी 'पाहुणे' म्हणून हजर झालो, अशी भूमिका ज्ञानदेवांनी मांडली आहे. रसपूर्ण कवितेपेक्षाही ज्ञानदेवांना परतत्त्वाचा स्पर्श अधिक महत्त्वाचा वाटतो ही गोष्ट प्रसिद्ध आहे. काव्यानंदापेक्षा परमानंदाचे ज्ञानदेवांना जास्त आकर्षण वाटते. 'चंद्रकळेशी स्पर्धा करणाऱ्या अक्षराची निर्मिती करणाऱ्या' महानुभाव कवी नरेंद्रासही श्रीकृष्ण चरित्राचे गुणगायन करून ब्रह्मसुखाची प्राप्ती करून घेणे महत्त्वाचे वाटत असते. (नरेंद्रकृत 'रुक्मिणीस्वयंवर', ओवी ४५), संत एकनाथांनी तर आपल्या कवितेस रसाळ, ब्रह्मरस फळांची 'कवितावाडीच' म्हटले

आहे. या सर्व उदाहरणांवरून हे स्पष्ट होते की, प्राचीन कवींनी (मुकुंदराज, नरेंद्र, ज्ञानदेव इ.) रसपूर्ण काव्याची निर्मिती केली असली, तरी त्यांना मनोमन परब्रह्मप्राप्तीची ओढ वाटत होती. मराठी साहित्यात अशा जाणिवेची एक पायवाट मुकुंदराजांनी प्रथम निर्माण केली, हेच वरील चर्चेवरून सिद्ध होते. 'विवेकसिंधु' या ग्रंथाचा फार मोठा भाग वेदान्त चर्चेने व्यापला आहे. पण याचा अर्थ मुकुंदराजांच्या ठिकाणी सौंदर्यदृष्टीचा अभाव होता असे नाही. मुकुंदराज केवळ निरूपणकारच नव्हते, तर हळव्या मनाचे सौंदर्यदृष्टी असलेले चिंतनशील कवी होते.

**गुरुशिष्य-संबंधातील जिव्हाळा :** मुकुंदराज असोत किंवा ज्ञानदेव असोत, त्यांच्या ठिकाणी गुरूबद्दलचा अमर्याद प्रेमभाव अस्तित्वात होता. गुरू आणि शिष्य यांच्यातील प्रेमळ वातावरण 'ज्ञानेश्वरी', 'विवेकसिंधू" या ग्रंथांत सारख्याच प्रमाणात आढळते. शिष्याची आर्त अवस्था, ब्रह्मरसाने तृप्त होऊनदेखील निर्माण झालेली अस्वस्थता आणि त्यानंतरची परमसुखाची अनावर हाव ज्ञानेश्वरीत दिसते. उत्सुकतेच्या सागरात बुडणारा अर्जुन, 'आर्तीच्या निढळाचा घाम पुसून टाक' अशी श्रीकृष्णास विनंती करणारा अर्जुन, आपल्या आवडत्या अर्जुनासाठी कारुण्यरसाची पर्जन्यवृष्टी करणारा श्रीकृष्ण, 'मला मराठीतून विवेक सांगावा' अशी विनंती करणारा अर्जुन, किंवा कृष्णाच्या संभाषणाने विरघळत चाललेला अर्जुन अशी कृष्णार्जुनाची कितीतरी रूपे ज्ञानदेवांनी रेखाटली आहेत. नेमक्या याच वातावरणाची आठवण व्हावी अशी स्थळे मुकुंदराजांच्या काव्यात आढळतात. 'विवेकसिंधू' हा ग्रंथ म्हणजे गुरुशिष्याचा संवादच होय. येथे गुरुवाक्यदीपाच्या प्रकाशात शिष्याचा संशयरूपी अंधार दूर झाला आहे. 'संसाररूपी सागरात बुडालेला, तापत्रय वडवानळाने पोळून निघालेला आणि संसारसागरातील कामक्रोधादी जलचरांनी लचके तोडल्यामुळे विव्हळत असलेल्या' शिष्याचे एक शब्दचित्रच मुकुंदराजांनी पूर्वार्धाच्या पहिल्या प्रकरणाच्या ९० व ९१ व्या ओवीत रेखाटले आहे. 'विवेकसिंधू' नंतर पुढे मराठी कवितेत संसारतापाने पोळलेल्या अनेक संतांनी संसारावर सागराचे, तापत्रयावर अग्नीचे किंवा कामक्रोधावर जलचराचे रूपक केलेले आढळेल. उदा. संत नामदेवांनी पांडुरंगाकडे करुणा भाकताना 'तापत्रय अग्नीची जळतसे शेगडी ओहोळोनी कोरडी झाली काया ।' (ना. गा. १४८४) किंवा 'कामक्रोधादि जलचरी । कासाविस झालो भारी । व्याकुळ होय चिंता लहरी । दुःखे भारी दाटलो । (ना. गा. १४१) अशा शब्दांत आपले तीव्र दुःख व्यक्त केले आहे. 'विवेक सिंधूतील शिष्यदेखील 'संसाररूपी सूर्याच्या मध्यान्ह वेळेला तापत्रयाच्या वणव्याने त्रासून गेलेला असतो.' (विवेकसिंधू पू. १-९३) श्रीगुरूकडे 'कृपारूपी मेघाची आणि शांत करणाऱ्या शीतल ज्ञानजलाची अपेक्षा करतो.' ज्ञानदेवांचा अर्जुनदेखील 'ग्रीष्मकाळात वणव्यांनी एखादा पर्वतराज पेटावा तसा दुःखाने जर्जर झालेला असतो आणि ते पाहून श्री[illegible]ष्णरूपी सुनील

महामेघ सहजपणे कृपामृतरूपी शीतल पाण्याची वृष्टी करतो.' अगदी हीच भावावस्था 'विवेकसिंधू'तील पहिल्या प्रकरणात मुकुंदराजांनी चित्रित केली आहे. 'गुरूने कृपा करताच शिष्याच्या ठिकाणी कंप, स्वेद इ. अष्टसात्त्विकभाव जागृत झाले. त्यास संसाराचे पूर्ण विस्मरण झाले. एखाद्या भिकाऱ्यास साम्राज्य मिळावे तशी स्थिती शिष्यास प्राप्त झाली. गुरुकृपारूपी मेघ ओळताच शिष्यरूपी सरितेस :

*तव आनंदाचा पुरू । शिष्य सरिते*
*आला थोरू । अविवेक पव्हणारू ।*
*बुडौनि जाये ॥ (वि. सिं. पू.– १-१००)*

संत एकनाथांनीदेखील नेमक्या याच रूपकातून गुरुकृपेचे वर्णन केले आहे. (एकनाथी भागवत ११-७) 'संसारसागरात पोहण्यात पटाईत असा अविवेक, पण शिष्यरूपी सरितेला महापूर येताच अविवेक बुडून गेला, अशी सुंदर कोटी मुकुंदराजांनी वरील प्रतिमेत केली आहे. खरोखरच गुरुकृपेने झालेल्या ज्ञानामुळे अविवेक नष्ट होतो. जोपर्यंत ज्ञान होत नाही तोपर्यंत अज्ञानाचे राज्य चालते. ज्ञानाचा म्हणजे आनंदाचा महापूर येताच त्या महापुरात अविवेक राहीलच कसा? त्या आनंदरूपी जळात अहंकाररूपी वृक्ष उन्मळून पडला. त्या वृक्षावर असलेले तृष्णारूपी पक्षिणीचे घरटे मोडून पडले. इंद्रियांचा गाव बुडाला' अशा रूपकजन्य प्रतिमा मुकुंदराजांच्या काव्यात आढळतात. हे केवळ रूपकच नाही, तर गुरुकृपेने प्राप्त झालेली स्वानंदस्थिती कवी स्वानुभवातून वर्णन करतो.

'इंद्रियाचा गाव' ही कल्पनातर पुढे संतकवितेत अनेक संदर्भात स्थिर झालेली दिसेल. उदा. 'इंद्रियग्राम' (ज्ञानेश्वरी ६-४३२)

*'गाव मारिला पाचांनी*
*पंचविस जाहाले धनी*
*आपुलाले गुंतले व्यसनी.*
*गेले विसरूनी धन्याशी की जी मायबाप ॥' (ए. गा. ३८८७)*

अशा शब्दांत एकनाथांनी शरीर व इंद्रियरूपी गावातील अंदाधुंद कारभाराचे वर्णन एका भारूडात केले आहे.

'गुरुकृपेने प्राप्त झालेली स्वानुभूती हीच कुणी स्त्री असून त्या सुंदर स्त्रीने सुखाच्या शय्येवर पहुडलेल्या शिष्यास आलिंगन दिले आहे. तिच्या अंगस्पर्शाने इंद्रियाचे व विषयसुखाचे डोहाळे नष्ट झाले.' (वि. सिं. पू. १-१०२-१०३)' ही मुकुंदराजांची कल्पना नुसतीच नावीन्यपूर्ण नाही, तर रमणीय आहे. शृंगाराचा कोमल स्पर्श लाभलेली ही कल्पना मुकुंदराजांच्या रसिकतेची व सौंदर्यदृष्टीची जाणीव करून देते. स्वानुभूती हीच कुणी सुंदर स्त्री आणि तिच्याशी तद्रूप झालेले शिष्याचे अंतःकरण, मन, बुद्धी, चित्त यांवर शय्यासुखाचे, स्पर्शसुखाचे रूपक अतिशय बहारीचे आहे. अशा शृंगारिक रूपकांचा वापर करून

ज्ञानदेवांनी अभंगाच्या रूपाने परमानंदाची गाणी गायिली आहेत. ब्रह्मसुखापुढे स्वर्गसुखदेखील ओवाळून टाकावे असे मुकुंदराजांना वाटते. ज्ञानदेवदेखील हीच अनुभूती वर्णन करताना ब्रह्मसुखापुढे स्वर्गसुख तुच्छ आहे असे वर्णन करतात. थोडक्यात, ज्ञानेश्वरीच्या जन्मखुणा 'विवेकसिंधू'त आढळतात. परमात्मसुखाने लौकिक आणि पारलौकिक सुखाचा विसर पडतो, विषयाकडे धावणारी इंद्रिये थांबतात. ही अनुभूती मुकुंदराजांनी वर्णन करून एक प्रकारे मराठीत परमात्मविषयक जाणिवेची नवी वाट निर्माण केली.

**गुरूचे अनन्यसाधारण महिमान :** गुरुप्रेम हा मुकुंदराजांचा स्थायीभाव आहे. गुरूच्या बाबतीत मुकुंदराजाचे अंतःकरण अतिशय हळवे आहे. 'गुरुकृपेतून उत्तीर्ण होणे शक्य नाही. कारण गुरूने जे दिले ते ब्रह्मसुख अविनाशी असून त्याच्या मोबदल्यात त्यांना देण्यासाठी या जगात काहीही नाही. जे काही आहे ते सर्व नाशिवंत आहे. एकाने प्रसन्न होऊन दुसऱ्यास कल्पतरू दिला, पण दुसऱ्याने त्या मोबदल्यात पहिल्यास हार दिला. पण तो हारदेखील आरशात दिसणारा हार होता. खरोखरच ही उपकाराची फेड होऊ शकेल का? चिंतामणीच्या मोबदल्यात फुटका काचमणी द्यावा त्याप्रमाणे गुरुकृपेतून उत्तीर्ण होणे अशक्य आहे.' (वि. सिं. पू. २-१३ ते १५)

गुरूला कशाचीही उपमा देता येत नाही ही वस्तुस्थिती मुकुंदराज वर्णन करतात, तेव्हा त्यांची वाणी निश्चितच भावपूर्ण बनली. 'गुरूच्या मोठेपणापुढे परीसदेखील ठेंगणा आहे. कारण परीस फार तर लोखंडाचे सोने करतो पण लोखंडाचा परीस करण्याचे सामर्थ्य परिसात नाही. अन्य हीन धातूचे तर सोनेदेखील परिसास करणे शक्य नसते. गुरुकृपा मात्र तशी नाही. गुरुबोधाने शिष्य ब्रह्मस्वरूपच होतो म्हणून गुरूला कोणतीच उपमा देता येत नाही. कल्पतरूची उपमा द्यावी, तर कल्पतरू फक्त कल्पिलेलेच पुरवितो; पण श्रीगुरू कल्पनातीत असे जे परमतत्त्व त्याची प्राप्ती करून देतात' (वि. सिं. पू. १-७४ ते ७७) या ठिकाणी ज्ञानदेवांनी आपल्या गुरूंना 'अकल्पनाख्य कल्पतरो' असे का म्हटले असावे याचा सहजच उलगडा होतो. (ज्ञानेश्वरी १८-१०). गुरूला 'कामधेनू' आणि 'चिंतामणी' याचीदेखील उपमा अपुरीच पडते. कारण दोन्ही केवळ इच्छिलेलेच दान देतात. माय-बापाचीदेखील उपमा संतांना देता येत नाही. कारण माय-बाप जन्माला घालतात. प्रेमाने पालनपोषण करतात पण माया, मोह यांचे बंधन मायबापाकडून सुटू शकत नाही. ते बंधन सद्‌गुरूमुळेच सुटते. गुरुकृपेचे हे महिमान वर्णन करण्याची परंपरा मुकुंदराजांनीच मराठी साहित्यात प्रथम रुजू केली असे म्हणावे लागेल. संत एकनाथांची गुरुभक्ती इतिहासात प्रसिद्ध आहे एकनाथी भागवतातील प्रास्ताविके आणि उपसंहार गुरूच्या रसभरित वर्णनाने नटलेली आहेत. थोडक्यात, मुकुंदराज यांच्या 'विवेकसिंधू'ने एक वाङ्‌मयीन परंपरा निर्माण केली हे वरील चर्चेवरून दिसून येते.

अनुक्रमणिका

**श्रीहरिनाथांचे रसाळ आख्यान :**

मुकुंदराज यांची गुरुपरंपरा पुढीलप्रमाणे विवेकसिंधूत आढळते.

आदिनाथ हरिनाथ-रघुनाथ-मुकुंदराज ('विवेकसिंधू' उत्तरार्ध ११-३४ ते ३७) भगवान शंकरापासून म्हणजेच आदिनाथापासून ही गुरुपरंपरा सुरू झाली. त्यांपैकी श्रीहरिनाथ यांचे रसाळ चरित्र मुकुंदराजांनी कथन केलेआहे. श्रीहरिनाथ म्हणजे प्रत्यक्ष विष्णूचाच अवतार. जीवांच्या उद्धारासाठी पृथ्वीवर अवतरला. पैनगंगेच्या काठी मनोहर अंबानगरीत हरिनाथ प्रगट झाले असे कवी वर्णन करतो. हरिनाथांनी ब्राह्मण कुळात यजुर्वेद शाखेत जन्म घेतला. त्यांचे अंग चाफ्याप्रमाणे गोरे आणि मनोहर होते. विष्णूचाच अवतार असल्यामुळे त्यांच्या ठिकाणी श्रीवत्स चिन्ह दिसत असे, पण ते त्यांनी उजव्या जांघेत लपविले होते. मनुष्य वेषात वावरणाऱ्या त्या अवतारी पुरुषास कोणी ओळखू शकत नव्हते. त्या काळच्या पद्धतीप्रमाणे हरिनाथांच्या वडिलांनी त्यांचे मौंजीबंधन केले. परंतु आश्चर्याची गोष्ट म्हणजे फारसे श्रम न करता हरिनाथांना वेदशास्त्रे सहज अवगत झाली. त्यानंतर त्यांनी काशी येथे भगवान शंकरास प्रसन्न करण्यासाठी फार मोठे अनुष्ठान केले. त्या निमित्ताने हरिनाथांनी एक फार मोठा यज्ञ केला. त्या यज्ञाचे वर्णन करताना कवी लिहितो, 'त्या यज्ञातून निघालेला धूर सर्व आकाशाला व्यापला होता. जणू काही तो धूर श्रीमहादेवाकडे हरिनाथांचा निरोपच घेऊन निघाला होता. त्या यज्ञाच्या धुराचा रंग सावळा आणि काळा असून सर्व आकाशमंडळ त्यामुळे काळेसावळे दिसत होते. नऊ ऋषींच्या समवेत यज्ञ करणारे हरिनाथ जणूकाही नऊ ग्रहांत ज्याप्रमाणे इंद्र शोभावा त्याप्रमाणे शोभत होते.' अशा तऱ्हेने त्या यज्ञाची समाप्ती होऊन पूर्णाहुतीचा समारंभ सुरू झाला. पूर्णाहुतीत जी तुपाची धार टाकली जात होती, त्यामुळे आकाशाला स्पर्श करणारी एक विशाल सोन्याच्या रंगाची ज्वाळा तेथे निर्माण झाली. त्या ज्वाळेचे वर्णन करताना कवी लिहितो की, 'जणू काही त्या ज्वाळेच्या रूपाने ब्रह्मदेवाने प्रचंड आकाशरूपी छत्रीला आधार देण्यासाठी सोन्याची दांडीच टेकवली आहे की काय आहे असे वाटत होते. लवकरच भगवान शंकराचे येथे आगमन होणार या उद्देशाने हे आकाशाचे छत्र ब्रह्मदेवाने उभे केले आहे असे वाटत होते. किंवा ती ज्वाळा म्हणजे जणू काही आकाशाच्या देवळात शिवलिंगाची किंवहुना ज्योतीरूप शिवलिंगाची स्थापनाच केली आहे असे वाटत होते.' अशा एकापेक्षा एक सुंदर उत्प्रेक्षा करून कवीने पूर्णाहुतीच्या ज्वाळेचे प्रत्ययकारी वर्णन केले आहे. यज्ञाने प्रसन्न होणाऱ्या महादेवाच्या आगमनाची चाहूल वरील उत्प्रेक्षेतून सूक्ष्मपणे सूचित झाली आहे. अशा प्रकारच्या उग्र तपश्चर्येनंतर, अनुष्ठानानंतर महादेव हरिनाथांना प्रसन्न झाले. त्यांनी हरिनाथास गाढ आलिंगन दिले. क्षणभर दोघेही आनंदसागरात लीन झाले. जणूकाही सुखाला महासुख भेटले किंवा स्वानुभवास दुसरा स्वानुभवच भेटला. हरिनाथ आणि आदिनाथ म्हणजेच महादेव हे दोघेही

अनुक्रमणिका

आनंदाने स्फुंदू लागले. या प्रसंगी महादेवाच्या तेजाने असा काही परिणाम झाला की, जणू काही वीज कोसळावी, त्याप्रमाणे महादेव प्रकट होताच त्यांचे तेज पाहून तेथील सर्व 'क्रत्विज' मूर्च्छित झाले. तेथे काय घडले आहे कुणालाच कळले नाही. प्रसन्न झालेल्या महादेवांनी हरिनाथाच्या विनंतीवरून त्यांस कैवल्यदान दिले.' अशा प्रकारची हरिनाथांच्या अनुष्ठानाची रसाळ कथा कवीने निवेदन केली आहे. 'विवेकसिंधू' हा मराठीतील आद्यग्रंथ आहे, असे गृहित धरल्यास मराठीतील आख्यान कवितेचे उगमस्थान या ग्रंथात सहजपणे आढळते.

**दृष्टांतातील कथात्मकता :** महात्मा चक्रधर यांनी सुंदर सुंदर दृष्टांत सांगून अवघड विषयदेखील सुबोध व मनोरंजक केले आणि त्यातूनच कोशिराजबासाच्या 'दृष्टांतपाठा'ची निर्मिती झाली. संस्कृत साहित्यशास्त्रात दृष्टांत हा एक प्रसिद्ध अलंकार आहे. अलंकार म्हणून दृष्टांताचा वापर मुकुंदराजांनी आपल्या ग्रंथांत समर्पकपणे अनेक ठिकाणी केला आहे. उदा. एखादा राजा आपल्या अंतःपुरात जेव्हा प्रवेश करतो तेव्हा त्याला कुणीही अडवू शकत नाही. अंतःपुराच्या रक्षणासाठी कोट्यवधी रक्षक असले, तरी ते राजाला प्रतिबंध करू शकत नाहीत. त्याप्रमाणे पूर्ण ज्ञानी व योगी पुरुषास समाधी अवस्थेत केव्हाही प्रवेश करता येतो. तो संसारात राहूनही खऱ्या अर्थाने परमात्मस्वरूपातच निरंतर व्यवहार करतो,' अशा तऱ्हेचे समर्पक दृष्टांत योजून गूढ विषयदेखील सोपा व मनोज्ञ करण्याची मुकुंदराजांची हातोटी दिसून येते. (वि. सिं. उ. ९-७६). परंतु 'विवेकसिंधू'त काही वेळा एखाद्या दृष्टांतात एखाद्या संपूर्ण गोष्टीचा किंवा सामाजिक संदर्भाचा भाग लपलेला असतो.

उदा :

*'कव्हणी येकाची अंतोरी ।*
*मी स्वासीणी हेचि विसरली जरही ॥*
*परिवैधव्य दुःखाचेया सागरी ।*
*केवी बुडे ॥ (वि. सिं. उ. ९-६९)*

वरील ओवीत वरवर पाहता साधा दृष्टांत आहे. समजा कोण्या एखाद्याची बायको आपण सुवासिनी आहोत हे जरी विसरली, तरी परंतु ती वैधव्याच्या दुःखसागरात थोडीच बुडणार आहे ? असे वरील दृष्टांताचे सार सांगता येईल. परंतु ते समाधानकारक वाटत नाही. कारण एखादी स्त्री आपण सुवासिनी आहोत हेच विसरली या संदर्भाचा उलगडा होत नाही. त्यामागे आठशे वर्षांपूर्वीचा सामाजिक संदर्भ दडलेला असतो. पूर्वी श्रमाची कामे करताना सहजच घामागर्द झालेल्या स्थितीत नकळतपणे एखाद्या स्त्रीच्या कपाळीचे कुंकू पुसले जाते, कामाच्या घाईत ते तिच्या लक्षात येत नाही, काम चालूच असते पण एखादा अनोळखी पाहुणा घरी येताच त्या स्त्रीकडे पाहून त्याचा भलताच गैरसमज होतो. कपाळीचे कुंकू पुसले गेल्यामुळे त्या अपरिचित माणसास ती विधवा स्त्री आहे असे वाटते. पण त्या

स्त्रीच्या दृष्टिकोनातून पाहिल्यास तिला वैधव्याच्या दुःखाचा स्पर्शही झालेला नसतो. कवीने वैधव्याच्या दुःखाच्या सागरात बुडण्याशी पाहिलेले साम्यदेखील येथे चिंतनीय आहे. अशा तऱ्हेने हा केवळ दृष्टांत नसून सामाजिक संदर्भ हरवलेली एक दृष्टांतकथाच आहे.

बऱ्याच वेळा 'विवेकसिंधू'तील ओव्या वाचताना त्यात एखादी दृष्टांतकथा लपली आहे, हे आज आपणास क्वचितच लक्षात येते. जसे :

*'ना तरी काशीये तई जो भेटला ।*
*तो इये देशी आजी देखिला ।*
*येतावता काये दोनी जाला ।*
*आपणेयांसी ॥ (वि. सिं. उ. ७-२६)*

जीव हा ब्रह्मस्वरूप आहे, हा सिद्धांत पटवून देण्यासाठी वरील दृष्टांत दिला आहे. जीव म्हणजे परब्रह्माचेच स्वरूप आहे. त्यात आणि परमेश्वरात भेद नाही. पण उपाधीमुळे तो भेद आहे असे वाटते. 'एकदा दोन मित्र काशीला गेले. तेथे त्यांनी देवदत्त यास पालखीत बसून हिंडताना पाहिले. काशीहून दोन्ही मित्र आपल्या गावी परतले आणि एके दिवशी भिकारी अवस्थेत देवदत्त एकास दिसला. अर्थातच काशीत ज्या देवदत्तास पालखीत बसून हिंडताना पाहिले तो देवदत्त हा भिकारी नव्हे, असा संशय त्यांस वाटला. पण दुसऱ्या मित्राने त्यास देवदत्ताचा भिकारीपणा व पालखीचे ऐश्वर्य या दोन्ही उपाधी टाकून देवदत्ताकडे पाहावयास सांगितले. त्यानंतर मात्र काशीत भेटलेला देवदत्त तो हाच देवदत्त आहे असे ज्ञान त्या मित्रास झाले,' अशा प्रकारची एक गोष्ट वरील ओवीत साकळली आहे. आज त्या गोष्टीचे सर्व संदर्भ हरवल्यामुळे त्याचा प्रत्यय होत नाही. पण त्या वेळच्या श्रोत्यांना मात्र हा कथासंदर्भ चटकन लक्षात येत असावा.

वेदान्तात वरील प्रक्रियेस 'भागत्याग लक्षणा' असे म्हणतात. वरील दृष्टांत म्हणजे भागत्यागलक्षणेचे प्रसिद्ध उदाहरण आहे. काही वेळा गूढ आशय सांगण्यासाठी पौराणिक कथासंदर्भाचाही उपयोग मुकुंदराज कुशलतेने करतात. 'राम दंडकारण्यात प्रवास करीत असताना वाटेत त्यांना अनेक ऋषीमुनींचे समुदाय भेटले. वाटेतील वाटसरूंच्या स्त्रियांनी सीतेला विचारले,

"या सर्व ऋषीमुनींत तुझा पती नेमका कोणता आहे ?" तेव्हा सीता लाजली. कारण श्रीरामाकडे बोट दाखवून त्याचा उल्लेख करणे तिला लाजेमुळे शक्य नव्हते आणि मग त्या स्त्रियांनीच प्रत्येकाकडे बोट दाखवून सीतेला विचारण्यास सुरुवात केली. ती प्रत्येक वेळी नकार दाखवी. परंतु प्रत्यक्ष श्रीरामाकडेच त्या स्त्रियांनी बोट दाखवून :

"हा तुझा पती आहे काय ?" असे विचारले तेव्हा मात्र सीतेने नकार दिला नाही आणि ती स्तब्ध व तटस्थ झाली. न बोलताही तिने आपणास काय सांगावयाचे आहे ते सांगितले. (वि. सिं. उ. ७-६३ ते ६९). त्याप्रमाणे उपनिषदे 'नेति नेति' अशा शब्दांत परमेश्वराचे वर्णन

करून मुकी झाली आहेत, असे मुकुंदराज प्रतिपादन करतात.

अशा तऱ्हेने मुकुंदराजदेखील श्रीचक्रधराप्रमाणेच आपला विषय रोचक आणि मनोज्ञ करण्यासाठी दृष्टांतकथांचा किती सुंदर वापर करीत असत, हे वरील उदाहरणावरून दिसून येते.

**चिंतनगर्भ प्रतिमा :** "विवेकसिंधू' विचारप्रधान काव्यग्रंथ आहे. पण कधी कधी त्यातील विचार म्हणजेच विवेक प्रतिमेचे मूर्तरूप धारण करून येतो. मुळातील कोणताही विचार अमूर्त असतो. पण हाच विचार कवितेत व्यक्त होताना काही संवेदनांच्या आकृती घेऊन व्यक्त होतो. त्यात काही भावनाही संलग्न झालेल्या असतात. त्यामुळे त्या विचारास अर्थपूर्णता प्राप्त होते. उदा : ज्ञानाशिवाय परमेश्वराचे स्वरूप आपोआप दिसत नाही. परमेश्वरस्वरूपाचे अज्ञानही ज्ञानामुळेच नाहीसे होते हे सांगताना कवी लिहितो,

*असे अंधारी बुडाला।*
*तेणें दीपू उजळिला।*
*परी दीपे तो देखिला।*
*हे न घडेचि पैं॥ वि. सिं. उ. ७-५३*

एखादा माणूस काळोखात बुडालेला आहे, पण त्याने जर मोठ्या प्रयत्नाने एखादा दिवा प्रज्वलित केला, तर दिव्याने त्याला पाहिले असे कधीच होत नाही. तथापि दिव्याशिवाय त्याला स्वतःलाही स्वतःकडे पाहता आले नसते. दिव्यालादेखील जाणणारा तोच असतो. जणू काही डोळ्यांपुढील अंधार नाहीसा होताच तो स्वतःच स्वतःला पाहतो. ज्ञानाचे स्वरूप आणि कार्य किती सूक्ष्म असते हे वरील प्रतिमेतून जाणवते. काळोखाची संवेदना आणि प्रकाशाची संवेदना या दोन्हींच्या अंतर्विरोधातून अज्ञान आणि ज्ञान याचे अचूक वर्णन कवी या ठिकाणी करतो.

प्रतिमा या भिन्नभिन्न संवेदनांशी निगडित असतात. त्या संवेदनांच्या आकृतींची जाणीव होताच विचार आणि भावना यांनादेखील जिवंत स्वरूप प्राप्त होते. उदा. तत्त्वज्ञानात परमेश्वराचे स्वरूप सत्, चित् आणि आनंद या तीन पदांनी केलेले आढळते. परंतु ही तिन्ही पदे भिन्न भिन्न नसून एकाच परमात्म्याची अनुभूती त्यातून सूचित होते हे सांगताना मुकुंदराजांनी विविध संवेदनांच्या क्षेत्रातील प्रतिमांची योजना केली आहे. (वि. सिं. उ. १०-१३ ते २१) जसे : 'सूर्य म्हणजेच शुद्धता, तेज आणि उष्णता याचा परिपूर्ण अनुभव आहे किंवा चंद्र म्हणजे शुद्धता, प्रकाश आणि शीतलता या तीन गोष्टींचा एकत्रित अनुभव आहे किंवा साखरेत पांढरेपणा, मऊपणा आणि मधुरता हे तिन्ही घटक मिळूनच साखर बनते.' या ठिकाणी रससंवेदनेची एक आकृती कवी उभी करतो, तर सूर्य आणि चंद्र यातून रूपसंवेदनेची आकृती कवी निर्माण करतो. कापूर म्हणजेच पांढरेपणा, मऊपणा आणि सुगंध याचा एकत्रित अनुभव असतो किंवा रत्न म्हटले की, त्याचा कठीणपणा त्यातील सर्व

बाजूंनी फाकणारे किरण आणि तांबडा रंग याची एकत्रित अनुभूती असते किंवा आंबा म्हटले की, त्याचा पिवळा रंग, त्याचा उत्तम सुवास आणि अमृतासारखी गोडी याचा एकत्रित अनुभव आहे किंवा पाचूरत्न म्हणजे हिरवेपणा, कठीणपणा आणि सर्वत्र हिरव्या रंगाचा प्रकाश पसरविणारी आकृती होय किंवा सावळेपणा, सुगंध आणि स्वाद याचा एकत्रित अनुभव तुळशीच्या मंजिरीत येतो किंवा कठीणपणा, काळेपणा आणि सुलक्षण चक्रे यांची एकत्रित अनुभूती म्हणजेच शालीग्राम होय.' थोडक्यात रूप, रस, गंध, स्पर्श संवेदनांवर आधारित अनुभव वाचकांना देऊन कवी आपला विचार प्रत्ययकारी करतो.

'फूल आणि फुलाचा सुगंध' म्हटले तर एकमेकांशी अतूट नाते असते, पण सूक्ष्मपणाने पाहिल्यास फुलाचा सुगंध फुलात असूनही फुलापेक्षा वेगळा असतो' (वि. सिं. २-१९) त्याप्रमाणे अहंकारापेक्षाही आत्मा भिन्न आहे, तो साक्षी आहे, असे कवी लिहितो. याही ठिकाणी आत्मा हा फुलातील सुगंधाप्रमाणेच कसा अव्यक्त असतो, तथापि शरीरातील अहंकारामुळे त्याचे अस्तित्व जाणवते, हा खोल अनुभव कवीने छोट्याशा प्रतिमेतून जाणवून दिला आहे.

'पक्षी आकाशात उडतात परंतु त्यांच्या पंखांनी आकाश मात्र फडफडत नाही. ते निश्चल आणि शांत असते.' (वि. सिं. पू. १-१०८) त्याप्रमाणे परमात्म्याच्या आश्रयाने सर्व इंद्रियांचा व्यवहार चालतो. पण इंद्रियांच्या हालचालींनी आत्म्याचे स्वरूप दूषित होत नाही. ही प्रतिमादेखील विचारगर्भ आहे. तसेच आकाशात उंच उडणाऱ्या पक्ष्याशी शरीरातील इंद्रियांच्या हालचालींचे साम्य चिंतनीय आहे.

'एखाद्या फुलझाडाच्या फांदीला सुगंधी फूल येते. फूल तोडताच फूल फांदीपासून वेगळे होते किंवा फूल नाहीसेही होते; पण त्याचा सुगंध मात्र त्याच्या फांदीभोवती दरवळत असतो' किंवा 'कापराच्या करंडीतील कापूर संपला, तरी त्याचा सुगंध संपत नाही.' (वि. सिं. उ. २-५०-५१) त्याप्रमाणे माणूस जागा झाला, तरी स्वप्नातील दृश्ये त्याच्या डोळ्यांसमोर तरंगत राहतात. जणू काही स्वप्नातला पाहणारा आणि जागेपणी पाहणारा एकच आहे हे लक्षात येते. अशा प्रकारच्या संश्लिष्ट प्रतिमा मुकुंदराजाच्या काव्यात आढळतात. या ठिकाणी फूल आणि फांदी, कापूर आणि कापराची डबी यांच्याशी स्वप्न आणि जागृती यांचा संबंध संश्लेषणात्मक स्वरूपाचा आहे.

**संवेदनानिष्ठ रूपक प्रक्रिया :** बऱ्याच वेळा कवितेत प्रतिमा येतात. त्यातून इंद्रिय संवेदनांचे एक सलग चित्र वाचकाच्या मनात जागृत केले जाते. काही मानसिक संदर्भ त्या प्रतिमेत जोडले जातात आणि प्रतिमा व प्रतिमान यात एक प्रकारचे सेंद्रीय नाते निर्माण होते आणि वाचकाच्या मनात कधीही न जाणवलेला एक अर्थ निर्माण केला जातो, यास 'रूपकप्रक्रिया' असे म्हणतात. उदा. 'विवेकसिंधू'त :

*'आसो हे सुखाचिये सेजारी ।*
*तेथ स्वानुभूती अंतारी ।*
*तिया आलंगिला सुंदरी ।*
*तो योगीराजु ॥ वि. सिं. पू. १-१० २*

वास्तविक श्रृंगार आणि योगानुभव हे दोन अनुभव परस्परविरोधी आहेत. योगात इंद्रिये, मन यांच्यावर नियंत्रण ठेवले जाते, तर संभोगात हे नियंत्रण हरवते असे दोन्ही अनुभव परस्परांशी विरोधी आहेत. पण या अनुभवातील साम्य एका पातळीवर मात्र अतिशय उत्कट असते ते म्हणजे अद्वैत होय. सुंदर स्त्री हीच कुणी येथे कवीची स्वानुभूती आहे. तिला आलिंगन देताच कवीची भेदस्थिती मावळली. सुखाच्या शेजारी स्वानुभूतीरूपी स्त्रीला भोगणारा योगी पुरुष परमात्मसुखाशी एकरूप झाला आहे. या ठिकाणी स्पर्श, रूप, गंध इ. संवेदनांची उत्कट अनुभूती असलेली प्रतिमा योजून कवी आपला अनुभव साकार करतो. वास्तविक योगाची अनुभूती एक अबोध अनुभूती आहे, पण त्या अनुभूतीचे एका शृंगारिक प्रतिमेमुळे किती सुंदर अर्थ निर्माण होतात हे दिसून येते.

'चंद्र' ही तशी पारंपरिक प्रनिमा आहे. चंद्र आणि सागर यांचा संबंधदेखील सांकेतिक स्वरूपाचा आहे. परंतु एखाद्या पारंपरिक प्रतिमेस नवा आशय लाभताच ती प्रतिमादेखील नव्या अर्थाने वाचकाच्या मनात जागृत होते. उदा :

*मग काये बोलिला तो योगींद्रू*
*बा रे तू पूर्णचंद्रू*
*तुवा माझा बोधसमुद्रु*
*कैसा उल्हासिला । वि. सिं. पू २-३४*

या ठिकाणी गुरू आणि शिष्य यांतील प्रेमाचे नाते स्पष्ट करणारा नवा संदर्भ सागर आणि चंद्राच्या प्रतिमेत देऊन कवीने एक सुंदर रूपकप्रक्रिया साधली आहे. आजवर पूर्णचंद्राची प्रतिमा सुंदर स्त्रीच्या वर्णनासाठीच संस्कृत काव्यात आढळते. परंतु येथे ती स्वानुभवसंपन्न शिष्यासाठी योजून कवीने ज्ञानाची संपन्नतादेखील वाचकाच्या मनात साकार केली आहे. असा शिष्य पाहून ज्ञान देण्याच्या बाबतीत भरती आलेल्या सागराचे अंतःकरण लाभलेले गुरू ही कल्पनादेखील नवीन अर्थपूर्णता सूचित करते. संस्कृत साहित्य शास्त्रानुसार येथे केवळ रूपक अलंकार नाही, तर दोन भिन्न प्रकारचे अनुभव येथे संश्लेषित (एकजीव, एकात्म) स्वरूपात व्यक्त झाले आहेत.

**साधर्म्य वैधर्म्य संबंध :** कधी कधी कवी ज्ञानात्मक विसंगती जाणवावी अशा प्रकारचे वैधर्म्य प्रतिमेतून सूचित करतो. पण त्या विसंगतीतूनच आणि वैधर्म्यातूनच एक साधर्म्यदेखील कवी सूचित करतो आणि त्यातून एक अर्थपूर्णता निर्माण होते. उदा. 'कमलतंतूंनी एखादा हत्ती बांधला जावा किंवा एखाद्याने आपल्या मुठीत वायूला पकडून

ठेवावे किंवा सूर्यानेच अंधाराला निर्माण करावे आणि सूर्य झाकला जावा किंवा रत्नखचित खांबाला कीड लागावी किंवा प्रत्यक्ष अग्नीला वळंबा लागावा (वि. सिं. पू. ७-११३ ते ११५) या सर्व कल्पना विसंगत वाटतात. त्यांत एक प्रकारचे वैधर्म्य आहे, तरीपण त्या वैधर्म्य संबंधातूनच कवी एका विशिष्ट सुसगत अर्थाची जाणीव करून देतो. वास्तविक माणसाच्या ठिकाणी असणारा आत्मा स्वयंप्रकाशी आहे, पण अज्ञानामुळे माणसास त्याची जाणीव होत नाही आणि तो भलत्याच दिशेने अंधारात चाचपडतो. या आशयाशी वरील कल्पनांचे सुंदर साधर्म्य कवी निर्माण करतो. वैधर्म्यातूनच साधर्म्य सूचित करण्याची कवीची कुशलता यात आढळते.

काही वेळा विशेषणे, क्रियाविशेषणे यातूनदेखील अनेक अर्थांची व अनेकपदरी जडणघडण 'विवेकसिंधू'त आढळते. उदा :

*मनासी चोरिले । जे ते प्रकाशिजोजी । (वि. सिं. उ. २-२२)*
*अर्धमात्रा व्रह्मरसे । (पू. २-२३)*
*सुखाचा सेजार । (पू. १-१० २)*
*भवार्क मध्यान्ह (वि. सिं. पू. १-९ ३)*
*सखी स्वानुभूतीची (पू. २-१)*
*प्रपंचाची-विणावणी (पू. १-४२)*
*विषयसुखाचे डोहाळे (पू. १-४०)*

वरील अधोरेखित शब्द हे केवळ शब्द नसून सुंदर रूपके ठरतात. वेगवेगळ्या संवेदनांतून कवी अमूर्त आशय मूर्त करण्याचा प्रयत्न करतो.

थोडक्यात, 'विवेकसिंधू' हा काव्याच्या दृष्टीने फारसा सरस ग्रंथ नाही. त्यात केवळ रूक्ष तत्त्वप्रतिपादन आहे, असा जो समीक्षकांचा समज आहे तो पूर्णपणे निराधार आहे हे वरील चर्चेवरून दिसून येईल. तसेच, प्राचीन मराठी कवितेच्या, काव्यविषयक प्रवृत्तींच्या अनेक वाटा 'विवेकसिंधू'ने निर्माण केल्या, असा निष्कर्ष आपणास या चर्चेवरून काढता येतो.

**संदर्भ :**


१. प्राचीन मराठी वाङ्मयाचा इतिहास डॉ. अ. ना. देशपांडे, पृ. २५१

२. महाराष्ट्र संस्कृती– ह. श्री. शेणोलीकर, प्र. न. देशपांडे, पृ. ११५

३. येथून पुढे संदर्भ म्हणून 'विवेकसिंधू', संपादक डॉ. म. वि. गोखले या प्रतीचा वापर केला आहे.



('श्री' नगर कॉलनी, बिदर रस्ता, उदगीर (जि. लातूर) ४१३५१७.)

डॉ. रवींद्र ना. ठाकूर

# दलित साहित्य : काही विचार

दलित साहित्य चळवळ ही महाराष्ट्राच्या सामाजिक-सांस्कृतिक जीवनात उदयास आलेली एक लक्षणीय घटना होय. दलित साहित्याच्या रूपाने एक नवे अनुभवविश्व आपली स्वतंत्र भाषा आणि अभिव्यक्ती पद्धती घेऊन मराठी साहित्यात अवतरले. मराठी साहित्याच्या कक्षा किती व्यापक होऊ शकतात हे दलित साहित्याने दाखवून दिले आहे. एवढेच नव्हे, तर साहित्य निर्मिती आणि एकूणच साहित्यिक व्यवहार ही एक सामाजिक-सांस्कृतिक घटना असते, हे भान दलित साहित्याने आणून दिले आहे. दलित साहित्यामुळे साहित्य आणि समाज यांच्यातील परस्परसंबंधाच्या अभ्यासाच्या दिशा स्पष्ट झाल्या आहेत. या दृष्टीने दलित साहित्याचा अभ्यास व्हावयास हवा आहे.

महाराष्ट्रापाठोपाठ भारताच्या इतर प्रांतांतही दलित साहित्याचे लोण आज पसरले आहे. अनेक नियतकालिकांनी दलित साहित्याची दखल घेतली आहे. दलित साहित्य ही आज शोषित, पीडित समाजाचा उद्‌गार व्यक्त करणारी जाणीव झाली आहे.

दलित साहित्याचा प्रवाह प्रथम महाराष्ट्रात उदित झाला आणि जोमाने बहरला ही वस्तुस्थिती आहे. याचे कारण महाराष्ट्राला डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे जे निकट सान्निध्य लाभले त्यात शोधावे लागते.

डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचे विचार हा दलित साहित्याचा प्रेरणास्रोत आहे. दलित साहित्याचे ते पोषकतत्त्व आहे. दलित साहित्याच्या कृतिशीलतेचा अर्थ लावताना गो. म. कुलकर्णी यांनी फार चांगले विधान केले आहे. ते लिहितात, '. . . मात्र कृतिशीलतेकडे या साहित्याचा कल आहे. या कृतीचे वैचारिक नेतृत्व डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांच्याकडे जाते. हे नेतृत्व सर्वच दलित लेखकांनी निःसंदिग्धपणे स्वीकारले आहे. डॉ. आंबेडकर हे दलित साहित्याला पितृस्थानी आहेत, ते या साहित्याचे वीरनायक आहेत.' (महाराष्ट्र साहित्य पत्रिका, दिवाळी अंक १९८७)

साहित्यनिर्मितीचा व्यवहार अत्यंत व्यामिश्र असतो. त्यात अनेक घटक एकत्र येऊन एकमेकांत गुंफलेले, गुंतलेले असतात. कधी विशिष्ट सामाजिक-राजकीय परिस्थिती विशिष्ट स्वरूपाच्या साहित्यनिर्मितीस कारणीभूत ठरते, तर कधी साहित्यही सामाजिक परिस्थितीस वळण लावण्यास कारणीभूत ठरते. या दृष्टीने दलित साहित्याचा जन्म ही विशिष्ट सामाजिक परिस्थितीची परिणती आहे. आज दलित साहित्य जी भूमिका बजावीत



अनुक्रमणिका

आहे, त्यावरून हे साहित्य पुढील काळात सामाजिक जीवनाला विधायक वळण लावेल यात शंका वाटत नाही. एक व्यक्ती एका मोठ्या सामाजिक दृष्ट्या महत्त्वाच्या ठरलेल्या साहित्यप्रवाहाचे प्रेरणास्थान ठरावी, ही घटनाच अभूतपूर्व आणि अद्वितीय ठरते.

दलित साहित्य ही केवळ वाङ्मयीन चळवळ नाही. ती एक सामाजिक चळवळ आहे. म्हणूनच दलित साहित्याचा अन्वयार्थ लावताना, त्याचे मूल्यमापन करताना समाजशास्त्रीय समीक्षापद्धतीचा अवलंब अटळ ठरतो. उदाहरणार्थ, त्या संदर्भात दलित साहित्यिकाभोवतीचे सामाजिक-सांस्कृतिक वातावरण, भाषा, प्रादेशिकता, उपलब्ध आविष्कारमाध्यमे इत्यादी अनेक घटक विचारात घ्यावे लागतील. मुख्य म्हणजे तो दलित मनाचा-समाजाचा सहजोद्रेक आहे हे लक्षात ठेवले पाहिजे. शतकांपासून दडपून राहिलेला त्याचा दुःखावेग नकार आणि विद्रोहाचे रूप घेऊन सहजस्वाभाविक शब्दांतून आविष्कृत झाला आहे. तो आज तरी आहे त्या स्वरूपात व्यक्त होणे हेच स्वाभाविक ठरते. त्याचे प्रयोजन केवळ आत्माविष्काराचे स्वांतसुखाय नाही. रूढ पद्धतीने या साहित्याचा विचार करणाऱ्या समीक्षकांची मूल्यमापनाची दिशा चुकते आहे असे वाटत राहते ते यामुळेच.

स्वातंत्र्यपूर्व काळापासून दीनदलितांच्या प्रश्नांविषयी आस्था बाळगणारे, त्यांच्या हक्कांसाठी झगडणारे झुंजार नेते म्हणून डॉ. आंबेडकरांना संपूर्ण महाराष्ट्र ओळखत होता. शाहू महाराजांनी म्हटल्याप्रमाणे दलितांना त्यांचा नेता मिळाला होता. डॉ. आंबेडकरांनी केवळ गावकुसाबाहेर राहणाऱ्या दलितांची नव्हे, तर संसार पाठीवर घेऊन भटकणाऱ्या भटक्या-विमुक्तांची, आदिवासी समाजाची दुःखे जाणून घेतली. त्यातूनच त्यांचा त्या समाजासाठी झटण्याचा निर्धार जन्मास आला. याबावत त्यांनी म. फुले यांचे शिष्यत्व स्वीकारले. कबीर, बुद्ध यांचे विचार आत्मसात केले. डॉ. आंबेडकरांच्या सामाजिक, राजकीय कार्यास या जाणिवांचे भक्कम अधिष्ठान होते. त्यांचे लेखन हा त्यांच्या या कार्याचा आनुषंगिक भाग होता. याबाबत त्यांनी आपल्या पूर्वास्पृश्य आणि शोषित-पीडित समाजाच्या उन्नतीसाठी जेवढे परिश्रम घेतले त्याहूनही जास्त परिश्रम त्यांना प्रतिगामी शक्तींशी लढा देण्यासाठी घ्यावे लागले.

डॉ. आंबेडकरांनी 'मूले कुठारः' या न्यायाने प्रथम वर्णाश्रमधर्मप्रणित जातिव्यवस्थेवर हल्ला चढविला. महाडचा सत्याग्रह, मनुस्मृती दहन या घटना दलित मनांवरील पारंपरिकतेची जळमटे झटकून टाकण्यास उपकारक ठरल्या. मंदिरप्रवेश सत्याग्रह हे त्यांनी सवर्ण समाजाला केलेले आवाहन होते, परंतु ते सवर्ण समाजाला पेलले नाही. परिणामी सामाजिक संघर्ष तीव्र झाला. एवढेच नव्हे, तर 'मी हिंदू म्हणून जन्मलो असलो तरी हिंदू म्हणून मरणार नाही', अशी घोषणा करून आंबेडकरांनी आपल्या लाखो अनुयायांसह निरीश्वरवादी आणि समतावादी बौद्ध धर्माचा स्वीकार केला. हिंदू धर्माने हीन ठरविलेल्या समाजस्तराला त्याची म्हणून स्वतंत्र धार्मिक अस्मिता लाभली. सामाजिक समतेच्या

विचारांबाबत् म. फुले यांचा वारसा स्वीकारणाऱ्या डॉ. आंबेडकरांनाही दलित, शोषित, पीडित यांना त्यांचे हक्क मिळाल्याशिवाय राजकीय स्वातंत्र्य मिळू नये असेच वाटत होते. कारण ते सवर्ण समाजाची मनोवृत्ती जाणून होते. दलितांच्या हक्कांचा प्रश्न त्यांना गांधीजींच्या भूतदयावादी दृष्टिकोणाऐवजी मानवी हक्कांच्या पातळीवरून सोडवायचा होता.

परंतु सामाजिक समता जातीजातींत विभागलेल्या भारतीय समाजात इतकी सहजसाध्य नव्हती आणि नाही. डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनाही या गोष्टीचे भान होतेच. म्हणूनच त्यांनी, राजकीय लोकशाहीनंतर आपणास स्वातंत्र्य, समता आणि बंधुता या तत्त्वत्रयीवर आधारित सामाजिक लोकशाही निर्माण केली पाहिजे, अन्यथा महत्प्रयासाने निर्माण केलेले राजकीय लोकशाहीचे मंदिर उद्ध्वस्त झाल्याशिवाय राहणार नाही, असा इशारा दिला आहे.

बाबासाहेब आंबेडकरांना भारतीय समाजाची सर्वंकष पुनर्रचना अभिप्रेत होती. माणूस हेच या पुनर्रचनेचे केंद्र होते. त्यांची सर्वंकष समतावादी भूमिका भारतीय समाज समजावून घेऊ शकला नाही. स्वातंत्र्योत्तर काळातही परिस्थिती बदलली नाही. उलट एक प्रकारचा भ्रमनिरासच वाट्यास आला. १९५६ मध्ये बाबासाहेबांचे महानिर्वाण झाले. परंतु त्यामुळे मानवी हक्कांसाठी सुरू झालेली ही चळवळ थांबली नाही. ती फोफावत राहिली. तिचे साहित्यक्षेत्रातील दृश्य रूप म्हणजे दलित साहित्य चळवळ होय. दलित साहित्याचे स्वरूप लक्षात घेताना आणि त्याचे मूल्यमापन करताना ही पार्श्वभूमी मनात वागविणे आवश्यक आहे.

दलित साहित्याचा प्रवाह स्वातंत्र्योत्तर काळात अधिक गतिमान आणि समृद्ध झालेला दिसत असला, तरी स्वातंत्र्यपूर्व काळातच तो दलित नियतकालिकांच्या माध्यमातून उदयास आलेला होता. जनता, बहिष्कृत भारत, मूकनायक आणि इतर अनेक दलित नियतकालिकांतून कथा, कविता, कादंबरी इत्यादी स्वरूपाचे बहुविध आणि कसदार साहित्य प्रसिद्ध होत होते. खुद्द डॉ. आंबेडकरांच्या वैचारिक निबंधात मनोहर ललितगद्याचे गुणविशेष अवतरले आहेत. ते पाहता त्यांचा समावेश मराठीतील निबंधकारांत केला पाहिजे. आजच्या दलित रंगभूमीची बीजे सत्यशोधकी व आंबेडकरी जलशात आहेत. स्वातंत्र्यपूर्व काळातील दलित साहित्य फारसे पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाले नाही. हा काळच धकाधकीचा आणि प्रत्यक्ष सामाजिक चळवळीचा होता. त्यात ललित साहित्य पुस्तकरूपाने प्रसिद्ध करण्याएवढी उसंत या लेखकांना नव्हती. शिवाय दलित लेखकांची पुस्तके प्रकाशित करणारे प्रकाशकही दुर्मिळच होते.

मूलभूत मानवी हक्क नाकारणाऱ्या व्यवस्थेविरुद्ध विद्रोह, सर्वंकष नकार आणि समताधिष्ठित समाजरचनेचा पुरस्कार हे दलित साहित्याचे प्रयोजन ठरते. डॉ. गंगाधर

पानतावणे यांनी विद्रोह, विज्ञाननिष्ठा आणि विश्वात्मकता ही दलित साहित्याची त्रिमूर्ती मानली आहे. देवदैववाद मान्य नसणे आणि व्यक्तिकेंद्रिततेचा कोश भेदून विश्वात्मकतेकडे झेपावणारी सामाजिक जाणीव जोपासणे या विशेषांकडे डॉ. पानतावणे यांनी आपले लक्ष वेधले आहे. साहित्याची सामाजिक शक्ती बाबासाहेब आंबेडकरांना जाणवली होती. साहित्याने माणूस, त्याचे मन आणि समाज घडविता येतो यावर त्यांचा विश्वास होता. म्हणूनच एकदा बाबासाहेब म्हणाले होते, 'मला इंजिनिअर्स हवेत, डॉक्टर्स हवेत, वकील हवेत आणि सर्वांत जास्त निकड मला साहित्यिकांची आहे. ती उणीव भरून काढण्यासाठी वेळ लागेल, पण धर्मधारणा करण्यासाठी मला साहित्यिकांची अत्यंत जरुरी भासेल.' बाबासाहेबांच्या या अपेक्षेला अनुसरूनच दलित साहित्यिकाने सामाजिक बांधिलकी स्वीकारली आहे. ही बांधिलकी त्याच्या कलाहेतूपासून वेगळी काढता येत नाही.

दलित लेखक मागे वळून पाहतो तेव्हा त्याचा अपमानास्पद भूतकाळ त्याला अस्वस्थ करतो. पंखांत भविष्याकडे झेपावण्याचे बळ आले असले तरी भूतकाळाचे ओझे तो सहजासहजी फेकून देऊ शकत नाही. अपमानाचा डंख आणि स्वाभिमानाची उफाळती ज्वाला यांच्या एकात्म रसायनातून दलित आत्मकथने जन्मली. आत्माविष्कार हाच दलित कवितेचा निर्मितिहेतू, परंतु प्रयोजन मात्र तेवढेच नाही. दलित जीवनवास्तवाचा वेध घेण्यासाठी आणि नव्या अस्मिता जागृतीसाठी दलित कथा-कादंबरी लिहिली गेली. गो. म. कुलकर्णी लिहितात त्याप्रमाणे समाजप्रबोधनाच्या आणि परिवर्तनाच्या संदर्भात भारतीय समाजाचे मानसिक परिवर्तन घडवून आणणे, त्यास साह्यभूत होणे ही या साहित्याची मूळ प्रतिज्ञा आहे. (म. साहित्य पत्रिका दिवाळी अंक १९८७ पृ. १२) म्हणूनच दलित साहित्याचे स्वरूप समजावून घेण्यासाठी समाजशास्त्रीय समीक्षा पद्धतीचा अवलंब झाला पाहिजे आणि प्रयोजन लक्षात येण्यासाठी आंबेडकरी विचारधारा परिचित करून घेतली पाहिजे.

आज एकूण मराठी साहित्य व्यवहारावर मध्यमवर्गीय जाणिवांचा पगडा आहे. त्या जाणिवांचा स्पष्टास्पष्ट प्रभाव दलित साहित्यावरही पडला आहे. ते अपरिहार्यही आहे. वाङ्मय व्यवहाराच्या कक्षा समाजाच्या सर्व स्तरांपर्यंत पोचत जातील तसतसे हे दोष दूर होत जातील.

आज दलित साहित्याला ललित साहित्य आणि समाजशास्त्राचे संदर्भ साहित्य असे दुहेरी परिमाण लाभले आहे. दलित साहित्यातील आवर्ताबाबत टीका झाली आहे. परंतु हा दोष केवळ दलित साहित्यातच नाही, तर जिला आपण मध्यवर्ती मराठी साहित्यधारा मानतो तिच्यातही मोठ्या प्रमाणात आहे. खरे म्हणजे अजून कितीतरी जातीजमातींचे जीवनानुभव व्यक्त व्हावयाचे आहेत. हे घडत जाईल तसतसे हे आवर्त दूर होत जाईल. परंतु मराठी समीक्षक त्या दृष्टीने विचार करीत नाहीत. उलट उपरोक्त आक्षेप घेणारा समीक्षक आपण किती मार्मिक दोषदिग्दर्शन करीत आहोत याचे कृतक समाधान मिळवू पाहतो.

यावाबत काही जबावदारी समीक्षकांवर आहे, तशी ती दलित लेखकांवरही आहे. दलित लेखकाने केवळ अनुभवाच्या समृद्धीवर आणि अस्सलपणावर थांबू नये. त्याने आंबेडकरी विचारधारेचा सूक्ष्म अभ्यास करून आपले समृद्ध लेखकीय व्यक्तिमत्त्व घडविले पाहिजे. खरी तळमळ असेल तर साहित्यगुण मागुते येतील. ते आणावे लागणार नाहीत. खुद्द बाबासाहेब आंबेडकरांच्या लेखनात वाङ्मयीन गुणवत्ता सहजपणे अवतरली आहे. या दृष्टीने दलित साहित्यिकाने त्याच्या साहित्याचे बारकाईने परिशीलन केले पाहिजे. तरच त्याच्या साहित्याला वैचारिक वजन लाभेल व खरे आत्मभानही सापडेल.

(मराठी विभाग, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर.)

शुभांगी कुंदा रामचंद्र

# 'विशाखा'तील प्रेमकविता : मूल्यविचार

'विशाखा'तील प्रेमकविता, असे म्हटले म्हणजे, 'पृथ्वीचे प्रेमगीत' आणि 'स्वप्नाची समाप्ती' या दोन प्रेमकविता लगेचच डोळ्यांसमोर येतात. या दोन कवितांविषयी न बोलल्यास 'विशाखा' विषयी बोलणे पूर्ण होत नाही. अर्थातच 'विशाखा'तील प्रेमकवितांचा विचार करताना या दोन कवितांचा विचार करणे अपरिहार्य आहेच; पण त्यापेक्षाही प्रेमकवितांतून व्यक्त होणारा कुसुमाग्रजांचा प्रेमाकडे पाहण्याचा दृष्टिकोण किंवा मूल्यभाव साक्षेपाने पण अचूकपणे सांगणाऱ्या अशा या कविता आहेत. या कवितांत दिसून येणारा मूल्यभाव कवीचा आहे. कारण तो मूल्यभाव, कवितांतून बोलविणारे व्यक्तिमत्त्व कवीचे आहे. कवितेच्या भाषेबद्दल बोलताना प्रा. गंगाधर पाटील म्हणतात, "कवितेत एक 'वक्ता' असतो, 'मी' असतो. या 'बोलणाऱ्या' वक्त्यामागे 'लिहिणारा' कवी असतो. कवी हा कवितागत 'मी'चा 'निर्माता' असतो. कवी त्या 'मी'चा बोलविता धनी असतो. कवी कवितागत 'मी'शी कधी 'कलात्मक अंतर' राखून, तर कधी एकरूप होऊन कल्पकतेने अनुभव घेत असतो. कवितागत 'मी' हा 'तू' ला उद्देशून काहीएक सांगत असतो. या कवितागत 'तू' मागे श्रोता असतो आणि कवी हा काव्यगत 'मी'द्वारे 'तू' मागील श्रोत्याशी अप्रत्यक्षपणे संबंध साधीत असतो." (समीक्षेची नवी रूपे-- गंगाधर पाटील, पृ. १९ )

प्रेमकवितांतून स्त्री व पुरुषाच्या प्रेमभावाकडे पाहण्याचा कवीचा मूल्यभाव स्पष्ट व्हावा म्हणून वरील दोन कवितांच्या बरोबर आणखी आठ कवितांचीही निवड केली आहे. यांपैकी प्रथमतः स्त्रीसापेक्ष प्रेमभावना व्यक्त करणाऱ्या 'प्रतीक्षा', 'आश्वासन', 'प्रीतीविण', 'शेवटचे पान' आणि 'पृथ्वीचे प्रेमगीत' या कवितांचा विचार करू. त्यानंतर पुरुषसापेक्ष प्रेमभावना व्यक्त करणाऱ्या कवितांचा म्हणजे 'आस', 'तू उंच गडी राहसि,' 'निर्माल्य', 'कुतूहल' आणि 'स्वप्नाची समाप्ती' या कवितांचा विचार करू. त्यानंतर या लेखाच्या उत्तरार्धात स्त्रीसापेक्ष व पुरुषसापेक्ष प्रेमभावना व्यक्त करणाऱ्या कवितांत दिसून येणाऱ्या मूल्यविचाराची तुलना करून हाती काय येते ते पाहायचे असे योजिले आहे.

खरे तर एखादी भावकविता पाहताना भाववृत्तीची अभिव्यक्ती महत्त्वाची. पण एकाच कवीच्या एकाच विषयांवर असणाऱ्या कवितांमध्ये भाववृत्तीच्या अभिव्यक्तीमागे काही मूलभाव आहे का हे पाहणे एवढाच मर्यादित हेतू येथे दृष्टीसमोर ठेवला आहे. डॉ. सुधीर रसाळ म्हणतात, "कवीच्या अनेक जाणिवा मिळून त्याची समग्र संवेदनप्रकृती निर्माण होते. कवीच्या

समग्र काव्याला ही संवेदनप्रकृती अंतःस्थपणे जोडीत असते. विशिष्ट कवीची प्रत्येक कविता एक परिपूर्ण रचना असूनही ती त्याच्या अन्य रचनांशी म्हणजेच कवितांशी जोडलेली असते. म्हणून त्याची एखादी कविता समजावून घेताना त्याच्या अन्य कविताही आपणांस मदत करीत असतात." याच दृष्टीने इथे प्रेमकवितांचा विचार करायचे असे ठरविले आहे.

'प्रतीक्षा' या कवितेत प्रीतीने जखमी होऊन प्रियकराची 'प्रतीक्षा' करणारी स्त्री आपले मन मोकळे करून स्वतःचे शांत, स्वतंत्र जगणे प्रेमबोधेमुळे कसे प्रदीप्त झाले आहे, ते सांगत आहे. ती म्हणते की—

*"मी सुखात असता मऊ परांच्यावरी*
*या संगमरवरी शीतल सौधान्तरी*
*का चूड फेकली सर्व वैभवावरी*
*विझवाया हा वणवा राया, येशील का लवकरी ?*
*ना तरी उतरिन मी पायरी !"*

विरहव्यथेमुळे तिच्या मनाला होणारा दाह या कवितेतून व्यक्त झाला आहे. आता हा वणवा विझवायचा असेल तर त्या 'राजा' ने तिच्याकडे लवकर येणे निकडीचे आहे. म्हणून ती आपला निग्रहच व्यक्त करते, 'जर तो लवकर आला नाही, तर मीच पायरी उतरीन.' प्रतिष्ठेची, लोकरीतीची कोणतीही पायरी उतरण्यास ही स्त्री सिद्ध झाली आहे. त्याच्या प्रेमापोटी मीलनोत्सुक झालेले तिचे मन उत्कटतेने व्यक्त झालेले दिसून येते. त्याची प्राप्ती हेच तिचे सर्वस्व आहे. या तीव्र भावनेमुळे कोणतेही धाडस जनरीतीची पर्वा न करता करण्याची तिची मानसिक तयारीही दिसून येते.

'आश्वासन' या कवितेतील स्त्री व्यावहारिक काळजी करणाऱ्या आपल्या 'राजा' ला निश्चिंत होण्यास सांगते आहे. या तिच्या सांगण्यामागे तिला स्वतःच्या प्रीतीच्या वाटणाऱ्या विश्वासाचे पाठबळ आहे. म्हणूनच ती, त्या आधारावर त्याने निश्चिंत व्हावे असे सांगते आहे. प्रीतीचे भांडार भरलेले असताना त्याने धनादी चिंता वाहाव्यात, असे तिला वाटत नाही. ती त्याला आश्वासन देते की—

*"तू ऐस गडी वा पड शाळेच्या कोनी*
*तू नीज परांवर वा पर्णांवर रानी*
*फुलरास फुलो वा फुलो निखारा चरणी*
*तू राजा आणिक तुझी प्रिया मी राणी !"*

त्याच्या भौतिक परिस्थितीपेक्षा तिच्या जीवनात त्याची प्रीतीच तिला जीवनसर्वस्व वाटते. तो कुठेही, कसाही राहणार असला तरी सुख किंवा दुःख दोहोंतही त्याला साथ देण्याची तिची तयारी आहे. त्याचे प्रेम, त्याच्याशी मीलन हेच तिला स्वतःच्या आयुष्याचे इतिकर्तव्य वाटते. म्हणूनच त्याच्याबरोबरच्या मीलनानंतर येणारी कोणतीही दुःखे सहन

करण्याचे आश्वासन ती त्याला ठामपणे देते आहे.

'प्रीतीविण' कवितेतील स्त्री प्रीतीच्या सफलतेची आकांक्षा बाळगून आहे. प्रीतीविण स्थितीत मोठमोठी सुखेसुद्धा सुखदायी न वाटता उलट तापदायी कशी वाटतात हे ती सांगते. एकूण जीवनच प्रीतीमुळे आणि प्रीतीविना कसे दोन टोकांचे होते, हे सांगताना ती म्हणते–

*"प्रीतीत फुले जीवन, प्रीतीत सुखाशा,*
*प्रीतीवीण दावानल ग्रासेल भवाला !"*

त्याच्या सहवासात पूर्ण निश्चिंतपणे जगता येईल याबाबत तिला पुरेपूर विश्वास आहे.

*"वक्षावर विश्रान्त तुझ्या होइल माथा*
*बाहूंत तुझ्या रक्षक लाभेल दुशाला !"*

अर्थातच स्वतःच्या प्रेमावर ठाम विश्वास असल्यामुळे त्या विश्वासाच्या बळावर त्याने प्रेम प्रवासात साथ द्यावी असे ती म्हणते आहे. या स्त्रीला त्याच्यावरील प्रेमाच्या पूर्तीचीच एक आस आहे, असे दिसते.

'शेवटचे पान' या कवितेतील स्त्री प्रेमात काही थोडा काळ घालवून नंतर जाऊ इच्छिणाऱ्या 'प्रवाशा'ची परोपरीने आळवणी करते आहे.

*"क्षणभर येउन क्षणभर राहुन*
*क्षणभर हासुन क्षणभर पाहुन*
*क्षणात जासी चार युगांचा घाव उरी घालून*
*प्रवासी, पहा जरा परतून"*

तिला त्याचा सहवास हवा आहे. पण तो तर काही क्षणांसाठी येऊन जाणारा 'प्रवासी' आहे. पण या काही क्षणांतच त्याच्या प्रेमाने ती मनोमन विद्ध होऊन हर प्रकारे समजावून ती त्याला रोखण्याचा प्रयत्न करते आहे. 'कशी साहू रे धुंद रात ही बाहेरून आतून' असे मोकळेपणाने विचारणारी ही स्त्री भारतीय संस्कृतीतील पतिव्रता वगैरे आहे की नाही ? शरीराच्या आकांक्षा जरी ती धीटपणे व्यक्त करीत असली, तरी ते शरीर केवळ 'त्याच प्रवाशा'ची आस बाळगून आहे हेही ती सांगते. त्याची परोपरीने विनवणी करताना ती 'उन्नत माझे ऊर उशाला घोष तुझा ज्यातून' असे म्हणते. प्रवासातील एकटेपणाची जाणीव त्याला करून देऊन, शरीर-उपभोगाचे मोहक सुख दाखवून त्याला जाण्यापासून परावृत्त करण्याचा ती प्रयत्न करते. तरीही त्याचा निर्णय बदलला नसावा. म्हणून अखेरीस ती त्याला, त्याचा प्रवास सुखदायी होण्यासाठी 'बाग मोहरो तव वाटेवर' अशी सदिच्छाही देते आणि 'माग घेत तव चंद्र पुनेचा येवो गगनातून' असे स्वतःचे समाधानही करून घेते. तो जाणारच असला तरीही तिची प्रेमनिष्ठा अढळ आहे. त्याच्यापायी झालेला हृदयाचा रेशमी गुंता तुटून शेवट होऊ दे, अशी इच्छा ती अखेरीला व्यक्त करते. त्याचे तिच्याजवळ असणे म्हणजेच जीवन; कमाल सुख असलेले जीवन अशी तिची भावना आहे.

उत्कट, एकनिष्ठ प्रेमभावना व्यक्त करणारी 'विशाखा'मधील अत्यंत प्रसिद्ध अशी कविता म्हणजे 'पृथ्वीचे प्रेमगीत'. पृथ्वी व सूर्य या प्रतीकांतून या कवितेत उत्कट, भव्य प्रीतभावना व्यक्त झाली आहे. पृथ्वी– सूर्य व सूर्यमालेतील ग्रह, उपग्रह, तारे इत्यादी घटक यांच्यातील वास्तव तोल सांभाळून त्याला उदात्त प्रेमाची जोड देऊन कवीने हे काव्यशिल्प कोरले आहे. यातील पृथ्वी युगानुयुगे सूर्याच्या प्रीतीची आस बाळगून आहे. सूर्यावरच्या या प्रेमात त्याच्याशी मीलनाची वाट पाहण्यात नव्हाळीतले तारुण्य संपून गेले आहे. तरीही प्रीतभावना अबाधित आहेच. प्रतीक्षेच्या या काळात सूर्यमालेतील शुक्र, मंगळ, ध्रुवादी ग्रहताऱ्यांनी पृथ्वीला स्वतःकडे आकर्षून घेण्याचा परोपरीने प्रयत्न चालवलेला आहे. पण पृथ्वीचा निर्धार ठाम आहे. क्षुद्र व्यक्तीवरोबरच्या शृंगारापेक्षा किंवा मीलनापेक्षा सूर्याची दूरताच सहन करण्याचा निग्रह करून ती युगानुयुगे त्याचे दूरत्व सहन करीत प्रेम करीतच राहते. या प्रेमभावनेमुळे शारीर पातळीवरच्या मीलनाची तिला ओढ आहे.

*"गमे की तुझ्या रुद्र रूपात जावे*
*मिळोनी गळा घालुनीया गळा*
*तुझ्या लाल ओठातील आग प्यावी*
*मिठीने तुझ्या तीव्र व्हाव्या कळा !"*

ही शारीर मीलनाची आकांक्षा धरताना त्या आकांक्षेची पूर्ती होऊ शकणार नाही, हे तिच्या ध्यानात आले आहे. म्हणून ती सूर्याचे मोठेपण व त्याच्या तुलनेत स्वतःचे क्षुद्र स्थान सांगून सूर्याच्या पायापाशी असलेल्या आपल्या स्थानाचेच आपल्याला भूषण आहे, असे ती म्हणते–

*"अमर्याद मित्रा तुझी थोरवी अन्*
*मला ज्ञात मी एक धूलीकण*
*अलंकारण्याला परी पाय तूझे*
*धुळीचेच आहे मला भूषण !"*

या कवितेतील स्वनिर्णयाशी पृथ्वी अचल आहे. एकदा मनाने वरलेल्या सूर्याशी काहीही झाले, अगदी तो अप्राप्य असला तरी पृथ्वीची त्याच्यावरील प्रेमनिष्ठा अभंग राहते.

यानंतर कुसुमाग्रजांच्या प्रेमकवितेतील पुरुषसापेक्ष कवितांतील प्रेमभावना कोणत्या स्वरूपाची आहे ते पाहू.

'आस' या कवितेतला तो तिची प्रेमविलासातून मुक्त करण्यासाठी आळवणी करीत आहे. तिच्याबरोबर विलासात राहताना त्याला तिच्याबरोबरच्या शारीर, मानसिक वगैरे प्रेमात क्षणभर जीवनाची सार्थकता वाटते खरी; पण मनोमन मात्र त्याचा आक्रोश चालू आहे. तो आक्रोशच प्रत्येक कडव्याच्या शेवटच्या चरणातून व्यक्त होतो आहे. 'करि मुक्त विहंगम हा रमणी !' हे त्याचे पालुपद आहे. खरे तर तिच्या सोबतीचे त्याला आकर्षण आहे, पण त्याचबरोबर बाह्य जगाचीही ओढ आहे. म्हणून तो म्हणतो–

*"नकोस पसरू मोहक बाहू*
*मृदुल बंध हे कुठवर साहू*
*नभ-नाविक मी कुठवर राहू*
*या आकुंचित जगी गुदमरुनी*
*करि मुक्त विहंगम हा रमणी ॥"*

तिचे मोहक बाहू किंवा तिच्या प्रीतीचे बंध त्याला लोभ लावणारे आहेत. तिचा संग बांधून ठेवणारा असला तरी बाह्य जगाची ओढही आहेच. म्हणून तिच्याबरोबर राहण्यात काही त्याची जीवनाकांक्षा परिपूर्ण होऊ शकत नाही.

'तू उंच गडी राहसि' या कवितेतला तो, तिच्या जगण्यातील व स्वतःच्या जगण्यातील विरोधी तपशील सांगून वास्तवाच्या प्रखरतेत प्रीतीतला उत्साह सरून जाईल अशी जाणीव तिला करून देताना म्हणतो–

*"स्वप्नांसह जाईल सखे, रात्र सरोनी,*
*येता रवि माथ्यावर संपेल उभारी"*

मीलनाची रात्र स्वप्नवत सुखाची झाली तरी दिवसाचे कठोर वास्तव न विसरता, तो ते वास्तव गंभीरपणे तिच्या ध्यानात आणवून देत आहे. अर्थातच अखेरीला तिच्याशी मीलन होण्यापेक्षा ती तिच्या स्थानीच योग्य आहे असे तो म्हणतो–

*"तू हंस निवासास तुझ्या योग्य हिमाद्री*
*साहेल कसे जीवित या रूक्ष पठारी !"*

शारीर मीलनाबरोबर सहजीवनातील आनंदापेक्षा नंतर पदोपदी भेडसावणारी व्यावहारिक जगाची जाणीव तो तिला येथे समंजसपणे करून देत आहे.

'निर्माल्य'मधील नायक गतकाळातील तिच्या सहवासातील मधुर आठवणींनी व्याकुळ झाला आहे. या आठवणींमध्ये तिच्या सुरेख चेहऱ्याची आणि भावपूर्ण डोळ्यांची आठवण आहे. ती असेपर्यंत आयुष्यात सुखांचा वसंत होता. पुष्कळ धुंद सुखे आयुष्याच्या मार्गात फुललेली होती. पण जीवनातून तिच्या निघून जाण्याने आयुष्य निर्माल्यासारखे गंधहीन झाले आहे, असे आर्ततेने तो म्हणतो आहे.

*"आता गेलिस तू– वसन्तहि सखे, गेला तुझ्या संगती,*
*पुष्पांतिल उडून गंध उरले निर्माल्य हे भोवती !"*

या कवितेतील पुरुष स्त्रीच्या भूतकाळातील आठवणींनी अत्यंत व्याकुळ झाला आहे.

'कुतुहल' या कवितेतील तो रात्रीच्या वेळी हिरवळीवर निवांतपणे बसला असताना गतकाळातील तिच्याविषयीच्या अनेक आठवणी त्याच्या मनात जाग्या होतात. तिच्याबरोबर विकसत गेलेले प्रेमजीवन आणि नंतर तिने घेतलेली माघार, याची तीव्र जाणीव त्याच्या मनाला होते. आज त्या आठवणी असल्या तरी त्या आठवणींबरोबर व्याकुळता, राग किंवा

अनुराग असा कोणताही भाव नाही, असे तो म्हणतो—

*"आज नसे ती व्याकुळता, ना राग, न अनुराग*
*विझून गेली कधीच, जी तू फुलविलीस आग*
*मात्र कुतुहल केवळ वाटे वळताना पाउले*
*किती जणांवर उधळलीस वा उधळशील तू फुले !"*

त्याच्या मनात राग-द्वेषाची तीव्र भावना आज नाही असे तो म्हणत असला, तरी तिच्या माघारी फिरण्याने तो कमालीचा दुखावला गेला आहे. म्हणून अशा किती जणांना तू दुखविलेस किंवा दुखवणार आहेस असे औत्सुक्य आपल्या मनात असल्याचे तो सांगतो आहे.

शेवटी आता 'स्वप्नाची समाप्ती' या सुप्रसिद्ध कवितेचा विचार करू. पहाटेच्या धीरगंभीर वातावरणाची दखल घेत या कवितेतला सखा आपल्या सखीला समजावतो आहे. थोड्या वेळातच जग गजवजू लागण्यापूर्वी त्याला तिची समजावणी करायची आहे. तो म्हणतो आहे की ध्येय, प्रेम, आशा यांचा स्थिर राहण्याचा स्वभावच नसताना आपण त्यांना उराशी बाळगून जपतो. पण ध्येयाची, प्रेमाची किंवा आशेची पूर्ती होण्याची स्वप्ने पाहण्यात काहीच अर्थ नाही. हे स्वप्न वा वेड एका रात्रीपुरतेच होते असे आपण समजू. दिवसाच्या प्रकाशात आपले एकत्र असणे लोकांच्या नजरेत आले तर आपण अपराधी ठरू. अशा गोष्टींची जाणीव तो तिला करून देत आहे. एकूण या सहजीवनाच्या सुखातून बाहेर येऊन दिवसांचे दूत घेऊन येत असलेल्या दिवसाच्या इतर कर्तव्यांना सामोरे जाताना तिच्यापासून दूर जावे लागत आहे, यासाठी तिची मानसिक तयारी हा सखा करतो आहे. पहाट संपून दिवसाचे आगमन होत असलेल्या सृष्टीतील बदलांचे रम्य चित्र कवीने या कवितेत रेखाटले असल्यामुळे या सख्याच्या सांगण्याला अधिक उत्कटता प्राप्त झाली आहे. या कवितेत पुनरावृत्त होणाऱ्या कडव्यातून कवितेचे मर्म प्रभावीपणे व्यक्त होते.

*"काढ सखे, गळ्यातील*
*तुझे चांदण्याचे हात*
*क्षितिजाच्या पलीकडे*
*उभे दिवसाचे दूत."*

केवळ प्रीती एवढेच काही या सख्याचे विश्व नाही. इतर अनेक कर्तव्ये पार पाडण्यासाठी सखीच्या रम्य, आकर्षक सहवासापासून त्याला दूर व्हावे लागत आहे. इतर कर्तव्यांचे भान असल्यामुळे या सख्याला सखीच्या सहवासाच्या सुखापासून दूर व्हावयाचे आहे.

कुसुमाग्रजांच्या आतापर्यंत पाहिलेल्या कवितांच्या आधारे 'विशाखा'तील प्रेम-कवितेतील प्रेमभावनेमागे कोणता मूल्यविचार आहे ते आता पाहू. कुसुमाग्रजांच्या बहुतांशी प्रेमकवितांतील स्त्री व पुरुष दोघेही एकनिष्ठा हे मूल्य जपतात असे दिसते. आपण

पाहिलेल्या पुरुषसापेक्ष प्रेमकवितांतील पुरुषांना स्त्रीपासून दूर जावेसे वाटले, तरी स्त्रीविषयक निष्ठा बदलल्यामुळे ते दूर होतात असे नाही. स्त्रीसापेक्ष प्रेमकवितांतील स्त्रिया तर पुरुषाशी निष्ठा अबाधितपणे राखतात असे दिसते. नुसत्या निष्ठाच राखतात असे नाही, तर पुरुषावरील प्रेम, त्याच्याशी सहजीवन यालाच जीवनसर्वस्व मानतात, असे दिसते.

या प्रेमकवितांपैकी स्त्रीसापेक्ष अशा ज्या कविता आहेत त्यांतील स्त्री ही पुरुषावरील आपल्या प्रेमासाठी वाटेल तो त्याग, कष्ट सहन करण्यास सिद्ध झालेली अशी आहे. मनात एकदा प्रीतभावना उमलली की त्या प्रीतीदेवतेची मनोमन आळवणी करणारी, हरतऱ्हेने त्याच्या प्राप्तीची, मीलनाची आस बाळगणारी, एकनिष्ठ अशी ही स्त्री आहे. समजा तो सखा जर कोणत्या काळजीने व्यग्र असेल तर त्याच्या सर्व समस्यांवर आपले प्रेम हेच उतारा आहे, असे समजणारी अर्थात प्रीती म्हणजे समग्र जीवन आहे असे मानणारी ही स्त्री आहे. मीलनाच्या आनंदासाठी शरीर-मनाच्या एकनिष्ठेने त्याची कितीही काळ वाट पाहणारी आहे. प्रीतभावनेव्यतिरिक्त जगण्यातील सार्थकता वाटण्याची इतर काही स्थाने या स्त्रीमनात आहेत, असे स्त्रीसापेक्ष प्रेमकवितांतून व्यक्त होताना दिसत नाही. याउलट पुरुषसापेक्ष प्रेमभावना व्यक्त करणाऱ्या ज्या कविता आहेत, त्यांतील बहुतेक कवितांतील पुरुषांची सार्थ जगण्याची कल्पना स्त्रीचे प्रेम, तिचा सहवास एवढीच मर्यादित नाही. तिच्या सहवासात जरी मन रममाण होत असले तरी त्याला ते प्रेमाचे विश्व 'आकुंचित जगा'सारखे वाटते. त्यात त्या पुरुषाचा जीव रमतो, पण गुदमरतो. बाहेरची अनेक क्षेत्रे त्याला खुणावीत राहतात.

प्रीतीतील मीलनाच्या उत्कटतेपेक्षा आजपर्यंतची तिची राहणी आणि आपली राहणी यांच्या तुलनेमुळे समंजस विचार करणारा नायकही एका कवितेत दिसतो. तिच्या व स्वतःच्या भौतिक परिस्थितीत अंतर असल्यामुळे मीलनानंतर तिला सहन कराव्या लागणाऱ्या व्यवहारातील अनेक तडजोडींची कल्पना येऊन मीलनापासून दूर राहू इच्छिणारा असा हा समजूतदार प्रियकर आहे. आपण दोघांनीही श्रम करून काही अंशी कष्टमय परंतु सफल प्रीतीच्या समाधानात जगू, असे काही हा प्रियकर तिला सांगत नाही. त्याला तिचे आकर्षण असले तरी तिच्या आजवरच्या सवयींतील भौतिक सुखे स्वतःच्या आवाक्यातील नसल्यामुळे 'तू हंस निवासास तुझ्या योग्य हिमाद्री' असे तो म्हणतो. याउलट स्त्रीसापेक्ष कवितेतील स्त्री मात्र त्याच्या भौतिक परिस्थितीबाबत कोणतीही पर्वा न करता मीलनोत्सुक असलेली दिसते.

> *"तू ऐस गडी वा पड शाळेच्या कोनी*
> *तू नीज परांवर वा पर्णांवर रानी"*

तो कितीही कंगाल असला तरी प्रीतीच्या मीलनातून त्या 'राजा'ची 'राणी' बनण्यातून तिला उभ्या आयुष्यासाठी जणू सम्राज्ञीपद मिळणार आहे, अशी भावना ती व्यक्त करताना दिसते.

'शेवटचे पान' मधील स्त्री, प्रवाशाला राहण्यासाठी परोपरांने विनविते. पण जेव्हा तो जाणारच हे तिला समजून चुकते, तेव्हा ती त्याला पुढील प्रवासासाठी सदिच्छा देते. एवढेच नव्हे, तर प्रत्यक्ष सहवास नसला तरी त्याच्याशी नाते राखण्याचा तिचा प्रयत्न दिसतो. याउलट 'कुतुहल'मध्ये प्रेमातून तिने माघार घेण्यामागचे कोणतेही कारण व्यक्त होत नाही. पुरुषप्रधान व्यवस्थेत जसे 'पती' या नात्याच्या पुरुषाशी असलेल्या स्त्रीच्या बऱ्यावाईट संबंधांवरून तिच्या चारित्र्याचे मोजमाप केले जाते तसा हा प्रकार असावा की काय अशी शंका येते. तिला प्रेमाचा खेळ खेळण्याचा जणू नादच असावा, असा भाव हा पुरुष तिच्या निघून जाण्याने अत्यंत दुखावला गेल्यामुळे तर करीत नाही ना? 'स्वप्नाची समाप्ती', 'आस' याही पुरुषसापेक्ष प्रेमकविता. 'स्वप्नाची समाप्ती'मधील सखा स्वतःच्या अन्य कर्तव्यभावनांमुळे स्त्रीप्रेमापासून दूर जाऊ इच्छितो. किंवा 'आस'मधील पुरुष, स्त्रीप्रेमाचे जग 'आकुंचित' म्हणून मुक्त होऊ इच्छितो; तेव्हा त्यामागील बाह्य जगातील कर्तव्ये वा आव्हाने पेलू इच्छिणारे ते पुरुष असल्यामुळे, त्या-त्या कारणांच्या मुलाम्यामुळे त्या पुरुषांचे हेतू उदात्त वगैरे ठरतात. 'कुतुहल' हीसुद्धा पुरुषसापेक्षच कविता. परंतु त्यातील स्त्रीने भूतकाळात प्रेमजीवनातून जी माघार घेतली त्याला कोणत्याही कारणाचा मुलामा नसल्यामुळे ती त्या स्त्रीने केलेली प्रतारणा ठरते, किंवा त्या स्त्रीला प्रतारणेची असलेली सवयच असा भाव हा पुरुष व्यक्त करतो. प्रेमकविता नसूनही स्त्रीप्रेमाचे उल्लेख आलेल्या कवितांतून हे जास्त स्पष्टपणे दिसून येते. 'क्रांतीचा जयजयकार'मध्ये राजबंदी सहजगत्या 'बांधु न शकले प्रीतीचे वा कीर्तीचे धागे' असे म्हणतात, तेव्हा त्यामागील देशप्रेमाची उदात्त भावना स्पष्ट होत असल्यामुळे त्यांच्या त्या वागण्यामुळे त्यांच्या व्यक्तिमत्त्वातील कणखरपणाला उणेपणा न आणता उलट तो कणखरपण दुणावतो. 'कोलंबसाचे गर्वगीत'मध्ये 'मार्ग आमुचा रोधू शकती ना धन, ना दारा। घराची वा वितभर कारा' हे कोलंबसाचे भाव त्याच्या ध्येयासक्तीच्या साधनेतील कणखरपणा सिद्ध करून ध्येयवेड्या कोलंबसाची प्रतिमा उजळतात. एकूण पाहता, स्त्रीसापेक्ष कवितेतील स्त्री पुरुषावरील प्रेमाला (प्रीतभावनेला) जीवनात सर्वाधिक महत्त्व देते. पुरुषसापेक्ष कवितेत स्त्रीप्रेमाचा पुरुषाच्या जीवनात लोभ वा आकर्षण आहे, पण सार्थ जीवनाच्या पुरुषाच्या कल्पनेत स्त्रीप्रेमाला (प्रीतभावनेला) सर्वाधिक महत्त्व नाही. पुरुषसापेक्ष 'कुतुहल'सारख्या कवितेतून क्वचित असेही दिसते की स्त्रीच्या प्रेमजीवनातून माघार घेण्याचा संबंध स्त्रीच्या चारित्र्याशी जोडून पुरुष दुःख व्यक्त करतो. स्त्रीसापेक्ष कवितेत स्त्री मात्र पुरुषाने दूर जाऊ नये म्हणून त्याच्या विनवण्या करते. पण तरीही त्याचे मनःपरिवर्तन झाले नाही, तर त्याला दोष न देता सदिच्छाच देते. सारांश, 'विशाखा'तील स्त्रीसापेक्ष प्रेमकविता आणि पुरुषसापेक्ष प्रेमकवितांमध्ये प्रेमविषयक मूल्यांमध्ये भिन्नता दिसून येते.

'पृथ्वीचे प्रेमगीत' आणि 'स्वप्नाची समाप्ती' या नावाजल्या गेलेल्या प्रेमकवितांमागे

अनुक्रमणिका

असलेल्या प्रेमविषयक मूल्यविचारामध्येसुद्धा हा दुहेरीपणा स्पष्ट दिसतो. 'पृथ्वीचे प्रेमगीत' या कवितेत स्त्रीसापेक्ष प्रेमभावना व्यक्त होते. पातिव्रत्य कल्पनेत सती, साध्वी समजल्या जाणाऱ्या स्त्रीच्या रूपातील पृथ्वी सूर्याला एकदा मनाने वरल्यानंतर; वास्तवात न येऊ शकणाऱ्या सूर्याबरोबरच्या मीलनाची प्रतीक्षा करणे काही सोडून देत नाही. ती सूर्याच्या न संपणाऱ्या प्रतीक्षेतच स्वतःच्या प्रेमपूर्तीचे आणि एकूणच जगण्याचे समाधान मिळविते. याउलट 'स्वप्नाची समाप्ती'मधील सख्याचे सखीशी मीलन होणे शक्य आहे. तिच्याबरोबर जगणे त्याला शक्य असले तरी स्त्रीप्रेमापेक्षा इतर कर्तव्यांना त्याच्या जीवनात महत्त्वाचे स्थान आहे. जगण्याची अर्थपूर्णता केवळ स्त्रीप्रेमात वा मीलनात नाही, असे तो सहजपणे प्रतिपादन करतो. असा विचार पुरुषसापेक्ष प्रेमकवितेतच व्यक्त झालेला दिसतो, हेही लक्षणीय आहे.

कुसुमाग्रजांच्या पुरुषसापेक्ष प्रेमभावना व्यक्त करणाऱ्या बहुतांशी कवितांतून स्त्रीप्रेमाबरोबरच अन्य क्षेत्रांतील कर्तृत्व म्हणजे पुरुषाचे अर्थपूर्ण जगणे असे चित्र उभे राहते. मात्र स्त्रीसापेक्ष प्रेमकवितेतील स्त्रीने पुरुषाच्या प्रेमाव्यतिरिक्त स्वतःच्या कर्तृत्वाला अन्य काही अवसर आहे, असा विचार करून पुरुषावरील प्रेमाला कधी कमी महत्त्व किंवा दुय्यम स्थान दिले आहे असे दिसत नाही. स्त्रीसापेक्ष प्रेमकवितेतील स्त्रीचे अर्थपूर्ण जगणे पुरुषप्रेमाशी सीमित झालेले आहे असे चित्र उभे राहते. येथील व्यवस्थेत स्त्रीची आणि पुरुषाची प्रेमभावनेकडे पाहण्यातील भिन्नता कशामुळे निर्माण झाली त्याचा थोड्या विस्ताराने विचार करणे उचित ठरेल.

पुरुषप्रधान व्यवस्थेत पुरुषासाठी वेगळ्या आणि स्त्रीसाठी वेगळ्या मूल्यकल्पना दिसून येतात. थोडे मागे जाऊन 'पतिव्रता' ही कल्पना कशी रुजली आणि 'पत्नीव्रत' अशी कल्पना सर्वमान्य का झाली नाही, याचा विचार करताना मनूकडे वळावे लागेल. असे दिसते की मनूने वस्तुतः

*"अन्योन्यस्याव्यभीचारो भवेदामरणान्तिकः ।*
*एष धर्मः समासेन ज्ञेयः स्त्रीपुंसयोः परः ॥*

**अर्थ–** स्त्री-पुरुषांनी परस्परांशी आमरण अव्यभिचारी वृत्तीने वागावे, हा स्त्री-पुरुषांचा श्रेष्ठ धर्म जाणावा असे सांगितले असले तरी मनूनेच पुनर्विवाहाबाबत प्रत्यक्ष व्यवहारात दुहेरी धोरण अवलंबिले. पत्नीच्या निधनानंतर पुरुषांना पुनर्विवाहाची संधी व पतीच्या निधनानंतर स्त्रीच्या पुनर्विवाहाचा मात्र त्याने निषेध केला. त्यामुळे स्त्रियांकडून जशी पातिव्रत्याची अपेक्षा धरली गेली तशी पत्नीव्रताची अपेक्षा पुरुषांकडून धरली गेली नाही. (भारतीय संस्कृतिकोश– खंड पाचवा, पृ. ३७५) साहजिकच यातून पुरुषप्रधान व्यवस्थेत दिसून येणाऱ्या दुटप्पी नीतिमूल्यांचा जन्म झाला असावा. या व्यवस्थेत जगणाऱ्या स्त्रीच्या आदर्श-कल्पनेत पतिप्रेम, पतिनिष्ठा वगैरे गोष्टींना केवळ अग्रक्रमच मिळाला असे नव्हे; तर स्त्रीजीवनाची सार्थकताच मुळी तिचे तिच्या पतीशी असलेले संबंध किंवा निष्ठा याआधारे



अनुक्रमणिका

मोजली जाऊ लागली. पुरुषांच्या जीवनात मात्र स्त्रीवरील प्रेमाला, या व्यवस्थेत अग्रक्रमाचे स्थान मिळण्याचे कारणच नव्हते. कालपरत्वे पुरुषांच्या कर्तृत्व गाजविण्याच्या कल्पना बदलल्या. मोक्ष-परमार्थाची जागा सामाजिक वा शैक्षणिक वा राजकीय वा आर्थिक वा अन्य क्षेत्रांतील कर्तृत्वाने घेतली. या नवीन क्षेत्रातील कर्तृत्वाशी पुरुषांच्या अर्थपूर्ण जगण्याची कल्पना संलग्न झाली. स्त्रीच्या संदर्भात मात्र तिच्या अर्थपूर्ण जगण्याचे मापन करण्यासाठी तिचे पतिप्रेम, निष्ठा, संसार, मुले यांच्यासाठी तिच्याकडून होणारा त्याग व सेवा या परिमाणांचा उपयोग झाला व अजूनही याच परिमाणांचा पगडा बहुतांशी प्रमाणात दिसून येतो. स्त्री व पुरुष यांच्या कर्तृत्वाच्या कल्पनाच भिन्न समजल्या गेल्यामुळे जगण्याच्या मूल्यनिकषांमध्येसुद्धा भिन्नता किंवा दुहेरीपणा निर्माण झाला. पुरुषप्रधान व्यवस्थेतील स्त्री-पुरुषांच्या मूल्यकल्पनांविषयीच्या धोरणात स्त्रीच्या किंवा पुरुषाच्या सहज, स्वाभाविक धारणाच वेगवेगळ्या असतात, असे समजले जाऊ लागले. नैसर्गिकदृष्ट्या स्त्री व पुरुष यांच्यात लिंगभिन्नता असते. पण लिंगनिगडित भावांमध्ये दिसून येणारी भिन्नता मात्र मूल वाढताना कुटुंबात, समाजात निर्माण होते; हे लक्षात न घेता स्त्रीमध्ये सेवा, त्याग, पतिनिष्ठा यातून सार्थकता इत्यादी कल्पना उपजतच असतात, त्या लिंगनिगडित असतात आणि पुरुषाच्या कर्तृत्वासाठी केवळ स्त्रीप्रेम पुरेसे नसते, त्याला वेगवेगळ्या क्षेत्रांत पराक्रम गाजविण्याचे उपजतच आकर्षण असते, कणखरपणा वगैरे असतो वगैरे समजुती रूढ झाल्या. पुरुषप्रधान व्यवस्थेत मुलगी किंवा मुलगा वाढवताना याच कल्पनांचे संस्कार अवतीभवती होत राहतात. साहजिकच अशाच मूल्यकल्पना कळत-नकळत, प्रत्यक्ष-अप्रत्यक्षपणे स्वीकारून प्रचलित काळातीलही वाढलेल्या स्त्रियांची मानसिकता फारशी बदललेली दिसत नाही. यामुळे याच रूढ मानसिकतेची उदाहरणे/दाखले वरील प्रकारच्या समजुतींच्या मंडनासाठी आधार म्हणून दिली जातात. बहुतांशी स्त्रियांची मानसिकता अजूनही पुरुषप्रधान व्यवस्थेतील स्त्रीप्रमाणेच असल्यामुळे तिच्या या मानसिकतेमागील संस्कारादी, कळत-नकळतच्या घडणीतून घडलेल्या मानसिकतेचा भाग अजूनही पुरेसा विचारात घेतला जात नाही. त्यामुळे तिचे रूढ चौकटीतील जगणे-वागणे, तिच्या निष्ठा, प्रेमादी बाबतीतील तिच्या जाणिवा या स्त्रीसुलभ (लिंगनिगडित) समजल्या जातात. या रूढ वास्तवाचे प्रतिबिंब साहित्यातूनही दिसून येते.

परमार्थप्रवणता असलेल्या प्राचीन साहित्यात स्त्रीला 'मोक्षमार्गातील धोंड' समजण्याचा भाग आलेला आहेच. मोक्षमार्गातील संन्यस्त आचरणाच्या कर्मकांडाचे अवडंबर आणि पुरुषाच्या नैसर्गिक शरीरवासना या दोन गोष्टीच मुळात परस्परविरोधी. स्वाभाविकच पुरुषाला मोक्षमार्गापर्यंत पोहोचणे अवघडच होत होते. परंतु या वास्तव परिस्थितीबाबत किंवा पुरुषांच्यामध्ये असलेल्या संयमाच्या अभावाबद्दल न बोलता स्त्रीचा मोहस्थान म्हणून प्राचीन मराठी साहित्यात अनेकदा उल्लेख आलेला दिसतो. अगदी

महानुभावीय वाङ्मयापासून 'स्त्री भणिजे मत्त द्रव्याचा रावो गा' किंवा 'स्त्री दर्शनमात्रेंचि माजवी' अशी सूत्रे प्रसिद्ध आहेत.

प्राचीन साहित्याप्रमाणे अर्वाचीन, आधुनिक साहित्यात स्त्रीला सरळसरळ 'परमार्थमार्गातील धोंड' असे समजले जात आहे, असे दिसून येत नाही. तरीही तिच्या स्वतंत्र व्यक्तिमत्त्वाचा म्हणून जो विचार होताना दिसतो तो बऱ्याचदा पुरुषप्रधान व्यवस्थेतील मूल्यविचारानुसार होताना दिसतो. आधुनिक साहित्यात सामाजिक, राजकीय, व्यक्तिवादी वगैरे जाणिवा व्यक्त करणारे साहित्य काही प्रमाणात दिसून येते. पण तरीही अशा साहित्यातून दिसणारी स्त्री विचार-विकारासहितची स्त्री– माणूस म्हणून खूपच कमी वेळा दिसते. स्त्रीवादी लेखिकांच्या लेखनातून अलीकडे मात्र स्त्रीचे विचार– विकारासहितचे माणूसपण प्रांजळपणे व्यक्त होताना दिसते. मराठीतील बहुसंख्य साहित्यकृतींमध्ये स्त्री– पुरुषसंबंधामागील मूल्यविचार जुनाच राहताना दिसतो; फरक होतो तो केवळ भौतिक पातळीवर वदललेल्या काही तपशिलांचा.

गेल्या शतकात इंग्रजी अमदानीत इंग्रजी शिक्षणाला येथे प्रारंभ झाला. त्यातून समता, व्यक्तिस्वातंत्र्यादी मूल्यकल्पनांचा परिचय येथील सुशिक्षितांना होऊ लागला. त्यामुळे जात आणि लिंग या भेदांवर आधारलेल्या विषमतेचे स्वरूप सुशिक्षितांच्या लक्षात येऊ लागले. म. फुले, लोकहितवादी, विष्णुशास्त्री पंडित, आगरकर, महर्षी कर्वे असे अनेक सुधारक विचार व कृतीच्या माध्यमातून स्त्री व शूद्र यांच्यासाठी झगडू लागले. साधारणतः त्यांच्याच समकालीन ह. ना. आपटे यांच्यासारख्या लेखकाने लेखनाच्या माध्यमातून दुःखाच्या चक्रव्यूहात अडकलेल्या तत्कालीन ब्राह्मण स्त्रीचे चित्र प्रभावीपणे रेखाटले. वरेरकर, वा. म. जोशी, विभावरी शिरूरकर या त्यानंतरच्या काळातील लेखकांच्या साहित्यातून स्त्रियांच्या समस्यांचे केवळ चित्रण न येता त्याचबरोबरीने काही वेळा संभाव्य उत्तरांची समीकरणे मांडली जाऊ लागली. उदा. विभावरी शिरूरकरांनी 'हिंदोळ्यावर' या कादंबरीचा जो शेवट केला होता, त्याची चर्चा करताना घटस्फोटाच्या कायद्याविषयीचा मुद्दा विचारात घेतला गेला. ही कादंबरी सन १९३४ मध्ये प्रकाशित झालेली होती. त्यानंतर स्वातंत्र्य मिळाल्यावर डॉ. बाबासाहेब आंबेडकरांनी हिंदू कोड बिलाद्वारे घटस्फोटादी सुधारणांना कायद्याचा आधार देण्याचा प्रयत्न केला. हिंदू कोड बिल संपूर्णतः जरी संमत झाले नाही, तरी त्यातील घटस्फोट, वारसा हक्क अशा काही तरतुदींना तरी कायद्याचे पाठबळ मिळाले. दरम्यानच्या काळात घटस्फोटासारख्या घटनेकडे नैतिक अपराधाच्या दृष्टीने पाहणे काही अंशाने कमी झाले. बऱ्याच वेळा असेही दिसून येऊ लागले की, 'विशिष्ट परिस्थिती'त घटस्फोट कसा अपरिहार्य आहे वगैरे चित्रणाचा सहृदयतेने विचार केला जाऊ लागला. हरिभाऊंच्या कादंबरीलेखनात विभावरीबाईंच्या 'हिंदोळ्यावर'प्रमाणे स्त्रीसमस्यांना दिशा दाखविणारी संभाव्य उत्तरे जरी दिसून आली नाही, तरी तत्कालीन स्त्रीच्या विविध काचांचे, तिच्यावरील

अनेकविध निर्बंधांचे वास्तव पातळीवरील दर्शन त्यांच्या कादंबरीतून आले होते. आधुनिक दृष्टीमुळे येथील व्यवस्थेने, स्त्रीची चहुबाजूंनी केलेली कोंडी त्यांनी सहृदयतेने पाहिली असावी. एकूण पाहता काही लेखक नव्या जाणिवेमुळे समकालीन वास्तवाचे अत्यंत प्रभावी दर्शन घडवितात, तर काही नव्या जाणिवेमुळे स्वतःच्या काळाच्या मर्यादेबाहेर पडण्याचा बऱ्याच अंशी प्रयत्न करून भविष्याचा वेध घेतात. अर्थात गद्यवाङ्मय प्रकारांमध्ये विचारांच्या अभिव्यक्तीला कवितेपेक्षा खूपच जास्त अवसर मिळू शकतो हेही खरे. मराठीतील गद्य वाङ्मयप्रकारांमध्ये काळाबरोबर किंवा काळाच्या पुढे जाऊन केलेला विचार काही प्रमाणात आलेला दिसतो.

आधुनिक काव्याच्या प्रारंभीच्याच काळातील गोविंदाग्रजांसारखे कवी आपल्या प्रेमकवितांतून स्त्रीप्रेमाला जीवनाचे साध्यच मानून काव्यनिर्मिती करताना दिसतात. माधव ज्युलियन यांनीही आपल्या प्रेमकवितांतून स्त्रीप्रेमाला जीवनात सर्वांत महत्त्वाचे स्थान देणारा नायक उभा केला. स्त्रीप्रेमाचा असा साध्यरूपात विचार करणारा नायक 'विशाखा'तील प्रेमकवितांतून आपल्याला भेटत नाही. मात्र त्याच वेळी स्त्रीसापेक्ष प्रेमभावना व्यक्त करणाऱ्या सर्व कवितांतील स्त्री मात्र साध्यरूपात पुरुषप्रेमाचा विचार करताना दिसून येते. या कवितांचा काळ सन १९४२ पूर्वी साधारण ९-१० वर्षांचा असे मानले (१९३३ ते १९३९) तर स्वातंत्र्यचळवळीच्या धामधुमीच्या त्या कालखंडात शांतपणे केवळ प्रेम करणारा नायक 'विशाखा'तील प्रेमकवितेत न येणेच शक्य असावे. पण असे जर गृहित धरले तर म. गांधीजींनी राजकीय चळवळीत स्त्रियांचाही क्रियाशील सहभाग मिळविला होता. तर मग पुरुषप्रेमाला गौणत्व देणारी एकही स्त्री या प्रेमकवितांतून का भेटू नये ? कारण डॉ. रसाळ म्हणतात– "कुठलाही कवी त्याच्या संस्कृतीकडून परंपरेने आलेल्या संवेदनप्रकृतीपेक्षा आमूलाग्र नवी अशी संवेदनप्रकृती प्राप्त करून घेऊ शकत नाही. त्याच्या संवेदनप्रकृतीचे स्वातंत्र्य त्याला त्या संस्कृतीच्या चौकटीतच उपभोगायला मिळत असते. अर्थात ही चौकट अधिकाधिक प्रमाणात मोडण्याचा प्रयत्न तो करीत असतो.'' (डॉ. सुधीर रसाळ– 'कविता आणि प्रतिमा,' पृ.८१ )

डॉ. रसाळ यांचे कवीच्या संवेदनप्रकृतीबाबतचे वरील म्हणणे कुसुमाग्रजांच्या प्रेमकवितांमागील मूल्यभावांचा विचार करू लागलो, म्हणजे चांगलेच प्रत्ययाला येते. कुसुमाग्रजांच्या 'विशाखा'तील अन्य कवितांप्रमाणे प्रेमकविताही, कविता म्हणून अतिशय प्रभावी आहेत यात मुळीच शंका नाही. मात्र त्या प्रेमकविता पुरुषप्रधान व्यवस्थेतील मूल्यविचारात घोटाळताना दिसून येतात. अर्थात कुसुमाग्रजांनी हे जाणीवपूर्वक केले असेल असे म्हणावयाचे नाही. पण 'विशाखा'तील प्रेमकवितेत पुरुषप्रधान व्यवस्थेतील मूल्ये दिसून येतात, हे नाकारता येत नाही.

(शुभांगी गोरे, कन्नड वनिता समाज, श्री व्ह्यू अपार्टमेंट, प्रभादेवी, मुंबई ४०० ०२५.)



अनुक्रमणिका

डॉ. आनंद पाटील

# नव्या भाषांतर युगाची चाहूल : इण्डो-ब्रिटिश सांस्कृतिक लघुउद्योग

अव्वल ब्रिटिश कालखंडात भारतीय साहित्यात इंग्रजीतून प्रमुख भारतीय भाषांत पाश्चात्त्य ग्रंथ भाषांतर/रूपांतर/वाङ्मयचौर्य करण्याच्या लहान-मोठ्या लाटा आल्या. त्यांनी तथाकथित प्रबोधन वसाहतीकरण झालेल्या वाङ्मय संस्कृतीच्या पृष्ठभागावर घडवले. दीडशे वर्षांच्या गुलामीनंतर गोऱ्यांचे वाङ्मय प्रकार अरवाचा तंबू वळकावून बसले. परके वाङ्मय प्रकारच 'आपले' समजण्याची किमया वसाहतीत कालांतराने नेहमीच घडते. प्रबल परकीय वाङ्मय प्रकार दुबळ्या होत चाललेल्या देशी वाङ्मय प्रकारांना हद्पार करतात. तेव्हा स्वातंत्र्योत्तर काळात पूर्ववसाहतीत प्रतिकाराचे सौंदर्यशास्त्र वाढीस लागून देशी वाङ्मय प्रकारांच्या पुनरुज्जीवनाच्या शक्यता बळावतात. गंगा उलटी वाहणे वसाहतवाद्यांना गैरसोयीचे असते. तेव्हा असे प्रवाह जागतिक/वैश्विक उच्च एकतेच्या (higher unity) नावाखाली पोटात सामावून घेत सांस्कृतिक व्यापारावर वर्चस्व टिकवण्याचे मार्ग वर्चस्ववादी वाङ्मय-संस्कृती रक्षक शोधत असतात. त्याचाच एक भाग म्हणून 'पहिल्या जगात' अलीकडे आफ्रिकन, लॅटिन अमेरिकन, भारतीय वगैरे पूर्ववसाहतीतील भाषांमधील साहित्य इंग्रजीत भाषांतरित करण्याचे उपक्रम सुरू झाले आहेत. 'पहिल्या जगात' स्वत्व हरवलेल्या, संदर्भहीन होत चाललेल्या वाङ्मय प्रकारांना संजीवनी मिळण्यासाठीही पूर्ववसाहतीत उरल्यासुरल्या आदिम शक्तीच्या स्रोतातून मिळण्याच्या शक्यता पाश्चात्त्यांना जाणवत असाव्यात. आता थेट मार्गाने राजरोसपणे लयलूट करणे आधुनिक जगात– विशेषतः 'तिसऱ्या जगात' शक्य होत नाही. दूरवरून नियंत्रण (Remote control) करण्याची नवी शक्तिकेंद्रे अशा वेळी निर्माण करावी लागतात. स्व-संस्कृतीपासून तुटलेले किंवा अलग पडण्याची शक्यता असलेले 'दलाल' (agents) वर्चस्ववादी नेहमीच सांस्कृतिक उलाढालीसाठी (banking) शोधत असतात. तेव्हा अनेक धोके संभवतात. असे उलट सुलट विचार गेल्या एप्रिलमध्ये मद्रास येथे भरलेल्या पाच दिवसांच्या परिपदेस गेलो असता सारखे छळत राहिले.

ब्रिटिश कौन्सिल व दै. 'हिंदू' यांच्या सौजन्याने ही इंग्रजी भाषांतरावरील दुसरी परिषद मद्रास येथे ५-९ 'एप्रिल' ९४ रोजी पार पडली. तिला दोन ब्रिटिश व पंचवीस भारतीय

भाषांतरकार-लेखक-प्रकाशकांनी हजेरी लावली. मात्र या परिषदेचे नियोजन केवळ एका महिन्यात केल्यामुळे सुसूत्रतेचा अभाव जाणवला. गेल्या वर्षी राष्ट्रीय पातळीवर इंग्रजी भाषांतरे करणाऱ्यांना व्यासपीठ मिळण्यासाठी दिल्लीत पहिली परिषद भरली होती. वाङ्मयीन भाषांतराद्वारे सांस्कृतिक आदानप्रदान दोन राष्ट्रांत व्हावे हा तिचा प्रमुख उद्देश होता. त्या परिषदेत सादर झालेले शोधनिबंध-अनुभव कथन पुस्तक रूपाने छापण्याची योजना वर्षभरात यशस्वी झाली नव्हती. मद्रासच्या मेळाव्यात लेखक व त्याच्या ग्रंथांच्या भाषांतरकाराला एकत्र आणून चर्चा घडवण्याचा उपक्रम शक्य झाला नाही. अपुऱ्या वेळात संपूर्ण शोधनिबंध/व्याख्यान-अनुभवकथनाचा खर्डा तयार करणे शक्य नसल्यास टाचणांच्या आधारे बोलावे आणि तेथील चर्चेनंतर अंतिम सुधारित शोधनिबंध यथावकाश तयार करण्याची सवलत होती. त्यामुळे चार-पाच अपवाद वगळता कुणाचेच शोधनिबंध पूर्णरूपात उपस्थितांना अवलोकनासाठी उपलब्ध झाले नाहीत. एक-दोन पानांचे सारांशही सहा-सात अभ्यासकांनीच सादर केले. मात्र प्रत्येकाच्या सादरीकरणाची ध्वनिमुद्रित फीत भेट देण्यात आली. तिच्या आधारे संबंधितांनी निबंधाचा अंतिम खर्डा तयार करायचा आहे. त्यांचे संकलन प्रसिद्ध करण्याचा संकल्प आहे. मात्र विमान प्रवासभाडे, उच्च दर्जाच्या वातानुकूलित हॉटेलात उतरायची व्यवस्था, प्रासंगिक खर्चासाठी दररोज शंभर रुपयांची बिदागी, 'कॉकटेल' वगैरेसाठीच ही परिषद चांगली स्मरणात राहील! मद्रास शहरात कॉन्नेमरा हॉटेल, वायडब्लूसीए इन्टरनॅशनल गेस्टहाऊस व ब्रिटिश कौन्सिलच्या सभागृहात अशी त्रिस्थळी यात्राही अविस्मरणीय. भेट मिळालेल्या बॅगा छान, पण पेन साधे.

परिषदेचा उद्घाटन सोहळा शुद्ध भारतीय पद्धतीने दीप (समई) प्रज्वलित करून पार पडला. त्यासाठी श्री. अरुणाचलम् या उद्योगपतींना पाचारण करण्यात आले होते. सुदैवाने त्यांनी निरर्थक भाषण झोडले नाही. ब्रिटिश कौन्सिलच्या मद्रास शाखेचे भाषा विभाग प्रमुख रॉबर्ट बेलर्मिन यांनी स्वागत छान केले. या गृहस्थाचा उत्साह उदंड होता; पण संयोजक म्हणून शिस्तीचा अभाव होता. दक्षिण-उत्तर वादात त्यांचे सॅन्डविच झालेले. या भारतीयाची तारेवरची कसरत उल्लेखनीय वाटली. त्यांचे सरकारी मनोहर शेनॉय यांचे सौजन्य व कार्यतत्परता लक्षात राहिली. आर्थर एन. सॅन्डरसन (कौन्सिलचे पहिले सेक्रेटरी) यांनी ब्रिटिश कौन्सिलने पार पाडलेल्या भाषांतर क्षेत्रातील उपक्रमांचा आढावा थोडक्यात घेतला. नंतर ते फक्त कॉकटेल पार्टीच्या वेळी एकदाच दिसले. लंडन विद्यापीठातील तरुण प्राध्यापक डॉ. रूपर्ट स्नेल या हिंदीत डॉक्टरेट मिळवलेल्या तज्ज्ञाला खास निमंत्रित करण्यात आले होते. भारतीय भाषेवर प्रभुत्व संपादन केलेल्या गोऱ्याबद्दल काळ्यांना नेहमीच अनावश्यक उत्सुकता असते. **गारंबीचा बापू** इंग्रजी भाषांतरित करणाऱ्या ईयान रेसाईडचा हा उत्तराधिकारी. तो चार दिवस सर्व सत्रात वेळेवर हजर राही. पाचव्या दिवशी मात्र गड्याने समारोपाच्या भाषणाची जबाबदारी टाळून का दांडी मारली कोण जाणे? या

तरुणाचा आत्मविश्वास, विनोद बुद्धी व प्रसंगावधान पहिल्याच भाषणात जाणवले. त्याने ब्रिटिश दृष्टिकोनातून 'इंग्रजी भाषांतरे' या विषयावर स्वानुभव कथन केले. पेंग्विन प्रकाशनाने एक भाषांतर स्वीकारले नाही. त्यावर याचे भाष्य, 'तो पक्षी उडालाच नाही!' इंग्रजीचे 'लिंक लँग्वेज' म्हणून माहात्म्य गोरे नाही तर दुसरे कोण सांगणार? पण जगाच्या पाठीवरून 'शुद्ध' इंग्रजी नष्ट व्हायची वेळ आली, तर फक्त भारतीयच ती 'शुद्ध' स्वरूपात टिकवून ठेवतील, या ब्रिटिशांच्या विश्वासाला केरळीय डॉ. के. एम. जॉर्ज यांच्या उद्घाटनाच्या भाषणाने मुळीच तडा जाऊ दिला नाही. पाण्याच्या बाटलीत ठेवलेले रंगीत पेय वारंवार चाखत हा दिल्लीच्या साहित्य अकादमीचा माजी सेक्रेटरी सव्वा तास बरेच बोलला. ब्याऐंशीव्या वर्षी हा 'तरुण' फार तरतरीत राहिलाय. त्याने स्वतःचा जन्म इस्टरच्या सणाला झाल्याचे सांगून जन्मतारीख हरवण्यावर किरकोळ विनोद केला. भारतीय दृष्टिकोनातून इंग्रजी भाषांतराचा आढावा घेण्याऐवजी स्वकर्तृत्व कथनावरच भर दिला. शिवाय वयाच्या चौथ्या वर्षापूर्तीपासून इंग्रजी शिकणारेच चांगले भाषांतरकार होऊ शकतील असा निर्वाळा दिला. इंग्रजीच्या साम्राज्याचे गोडवे गात, हिंदीला चिमटे काढत, मल्याळमची थोडी भलामण करीत साहित्य अकादमीच्या अनुदानावर फोफावलेल्या उपक्रमांची बरीच माहिती दिली. जागतिक वाङ्मयाच्या ज्ञानकोषात संस्कृतला ४ पाने व भारतीय भाषांना फक्त ५ पाने एवढी जागा मिळालीय. त्यात कन्नड व काश्मिरी अशा अनेक साहित्यांना स्थान नाही. ब्रिटिश ज्ञानकोशांनी असाच अन्याय केला आहे. त्यात आर. के. नारायणना मानाचे स्थान आहे, पण प्रेमचंदांना कुठलेच पान नाही. म्हणून आपण **कम्पॅरटिव्ह इंडियन लिटरेचर** आणि **मास्टरपीसेस ऑफ इंडियन लिटरेचर** इंग्रजीत संपादित केल्याचे समर्थन त्यांनी केले. (अर्थात यातील पहिल्या संकलनाचे शीर्षक फसवे आहे. तौलनिक साहित्याभ्यासाशी त्याचा काडीचा संबंध नाही. जॉर्जचे इंग्रजी ग्रंथ संकलन म्हणून ठीक आहेत.) ए. के. रामानुजनच्या मदतीने पार पाडलेल्या भाषांतराच्या उपक्रमांची माहिती उपयुक्त होती. 'ॲडिक्वेट' भाषांतर ही जॉर्जची संकल्पना व्यवहार्य वाटते. भारतीय भाषांतील वाङ्मयाच्या इंग्रजी भाषांतरांची सखोल समीक्षा, आढावा, मूल्यमापन असे स्वतंत्र शिबिर घेण्याची सूचना त्यांनी केली. काही नव्या भाषांतराच्या कामात ब्रिटिशांचे सहकार्य घ्यावे. संयुक्त भाषांतर उद्योग वाढीस लागावा अशा सदिच्छा त्यांनी व्यक्त केल्या आणि अगदीच शब्द तोंडातून फुटेना तेव्हा ते बोलायचे थांबले.

या उद्घाटन सोहळ्यानंतर चहापान हे ओघाने आलेच.

पुनश्च वायडब्लुसीए (यंग वुईमेन्स ख्रिश्चन असो.) च्या आंतरराष्ट्रीय हॉटेलकडे स्थलांतर. तेथील खोलीत वातानुकूलित यंत्रणा व ध्वनिमुद्रण यंत्रणेत वितुष्ट आले. मद्रासच्या पेटत्या उन्हाळ्यात दिल्ली विद्यापीठातील सफारीवाल्या डॉ. हरीश त्रिवेदीला घामाच्या धारा लागल्या. आठ वर्षे इंग्लंडमध्ये वास्तव्य घडल्यामुळे आणि दिल्लीच्या उच्च

वर्तुळात शिरकाव झाल्यामुळे हा स्कॉलर जरा ताठ्यातच वावरत होता. त्याने प्रारंभी दक्षिणेतल्या हिंदी विरोधकांना चिमटे काढीत जॉर्जचे आहेर परत केले. 'सामुदायिक भाषांतर : एक प्रयोग व अनुभव' या विषयावर दीर्घ रिपोर्ट सादर केला. २० भाषांतरकारांनी एकाच हिंदी कवितेची इंग्रजी भाषांतरे केली. एकत्र बसून त्यांची चर्चा केली. त्यात परकीय भाषांतरकाराच्या उपस्थितीच्या फायद्या-तोट्यांचा ऊहापोह झाला. या कार्यशाळेला स्वतः कवी हजर होता. त्याने एका भाषांतरकाराला सल्ला दिला. 'आप अपने कवी न होने की घमंड न कीजिए। आप बस अनुवाद करते जाईए।' (मला माधव मनोहरांनी ललितच्या एका अंकात **'अग्ली डक्‌लिंग'** च्या मराठी भाषांतराची सांगितलेली चित्तरकथा आठवली. त्यातून ग. दि. यांचे 'एका तळ्यात' कमळासारखे गीत उगवले. पण ते उद्योग व्यक्तिगत पातळीवर घडले) हिंदीवाल्यांची ही कार्यशाळा दीर्घकाळ चालली. पण उर्दूवाल्यांनी अल्पवेळात एक कथासंग्रह भाषांतरित करून टाकला. काव्य भाषांतराच्या अनुभवाचे कथन भारतातील इंग्रजी भाषेच्या स्वरूपावर घसरले. आपले वृत्तपत्रीय इंग्रजी एकोणिसाव्या शतकातील आहे. इंग्रजी शिक्षण समकालीन नाही. त्यामुळे एका इंग्रजीतून दुसऱ्या इंग्रजीकडे असा भाषांतरकाराचा प्रवास सुरू होतो. गोंधळ वाढतो, वगैरे मुद्दे हरीशने तपशिलाने मांडले. पण त्याच्या निबंधाच्या प्रती उपलब्ध नसल्याने संपूर्ण सारांश इथे देणे शक्य नाही. हरीशने **इंडियन लिटरेचर** मध्ये नामवर सिंग यांच्या 'भारतीय मनाचे निर्वसाहतीकरण' या भाषणाचे इंग्रजी भाषांतर प्रसिद्ध केले होते. त्यावर माझी दीर्घ प्रतिक्रिया प्रसिद्ध झालेली. या संदर्भात भारतीयांच्या इंग्रजी स्वीकार-नकारातील द्वंद्व-धरसोड (ambivalencc) स्पष्ट होऊ लागला. अध्यक्षस्थानी रूपर्ट स्नेल असल्याने चर्चा हिंदीवाल्यांत घोळत राहिली. मला मुंबईच्या एका सुप्रतिष्ठ प्राध्यापकाचे अलीकडचे विधान आठवले. 'महाराष्ट्रात इंग्रजी-चांगले इंग्रजी- लिहिणारे फक्त दोन मुंबईकर आहेत. मराठी वाङ्मय इंग्रजीत भाषांतर करायला महाराष्ट्रात इंग्रजी कुणाला येतेय सांगा?' या त्यांच्या प्रश्नाचे मला हसू आले होते. त्यांनी उल्लेखिलेल्या त्या दोन मुंबईकरांना 'इंग्रजी'-आजचे इंग्रजी-येते यावर माझा विश्वास नाही. 'करेक्ट इंग्रजी' हा विषारी गंड (poisonous complex) वसाहत काळातच मराठी मनात मुरला आहे. नववसाहत काळात संस्कृतिअंतर्गत सत्तास्पर्धेसाठी तो पद्धतशीरपणे वाढवला जातो. याचे प्रत्यंतर या परिषदेतही पदोपदी येऊ लागले. दर्जेदार लंचच्या वेळी चालणाऱ्या चर्चातही हे भेदाभेद लपत नव्हते, अगदी जातीभेदही.

त्रिवेंद्रमच्या डॉ. बी. चंद्रिका यांच्या निबंधाचे शीर्षक– 'आपली (अ) विश्वासू : शब्दशः विरुद्ध वाङ्मयीन भाषांतराकडे एक दृष्टिक्षेप' बाईंच्या इतकेच आकर्षक होते. भाषांतरकाराने कोणाशी प्रामाणिक राहावे? लेखक, त्याची कलाकृती, की ती वाचणारे वाचक यांच्यापैकी कोणाशी? त्यात बहुभाषी-एकभाषी अशी वर्गवारी आहे. ती परकेपण

(otherness) वाढवते. भाषांतरकाराला अनंत अडचणींचा विचार करून मुख्य संहितेआड लपलेली उपसंहिता (Subtext) विचारात घ्यावी लागते. बाईंनी स्वतः भाषांतरित केलेल्या एका पोवाड्याचे उदाहरण दिले. तुलनेसाठी त्यांनी त्याच पोवाड्याच्या कमला दास व त्यांच्या मातुश्रीने केलेले शब्दशः भाषांतर निवडले होते. पोवाड्यात परंपरेचे ऐतिहासिक संदर्भ, चालीरीती वगैरे घटक भाषांतराला प्रतिकार करतात. त्याची वृत्ते इंग्रजीत उतरवणे अशक्यच. मग वृत्तबद्धता टाळून पोवाडा भाषांतरित करणे शक्य आहे का ? शिवाय संहितेशी द्रोह करण्याचे स्वातंत्र्य भाषांतरकाराने किती प्रमाणात घ्यायचे वगैरे बऱ्याच प्रश्नांचा उलगडा बाईंनी सुंदर शैलीत फार चांगला केला. त्यांनी अनेक भाषांतरे केली आहेत. मात्र माझ्या मनात पोवाड्याच्या मूळ संहितेपेक्षा प्रयोग संहितेची चिन्हमीमांसा तयार झाली. तो नमुना मराठी वीररसपूर्ण पोवाड्याचा होता. उलट बाई इंग्रजी वळणाच्या. द्वंद्व, प्रेम, पलायन, शृंगार वगैरे बाबींनी ठासून भरलेल्या पोवाड्याबद्दल बोलत होत्या. प्रयोग संहितेविषयी कुणीच मुद्दे उपस्थित करत नव्हते. माझा प्रश्न भाषांतरकाराने प्रयोग-संहिता विचारात घ्यावी की नको हा होता. बाई गोंधळल्या. दाक्षिणात्य तज्ज्ञही उखडले, 'तुमचा नेमका प्रश्न काय ?' तेव्हा डॉ. मिलिंद मालशे माझ्या मदतीला धावले. मराठी पोवाडा साग्रसंगीत सादर करणे शक्य नव्हते. बरीच माहिती पुरवल्यावर चंद्रिकाबाईंनी खुलासा केला की, त्या मल्याळम् पोवाड्याचा प्रयोग त्यांच्या पाहण्यात नाही. वाचन किंवा पठण एवढ्याच शक्यता होत्या. डफावरची थाप नि सुरत्यांची जीऽ जीऽ मल्याळममध्ये पूर्ण गैरहजर ! (माझ्या पेपरवर भाष्य करून बाईंनी दुसऱ्याच दिवशी वचपा काढला, 'तुझा पेपर दोन केंद्रांत विभागल्याने मुख्य प्रतिपादन उठावदार होत नाही.' 'आपण संपूर्ण निबंध वाचलाय का ?' 'नाही' या कबुलीवर मी हसलो. या नायर समाजातील विदुषीशी गट्टी जमली. तिने माझ्या 'फुगड्या' कथेचे मल्ल्याळम भाषांतर इंग्रजीद्वारे करण्याचे काम उत्स्फूर्तपणे सुरू केले, हे एक परिषदेचे फलित.)

मद्रास विद्यापीठातील डॉ. सी. टी. इंद्रा या इटुकल्या बाईंनी 'वाचनीय व लेखनीय भाषांतर' या विषयावर अनुभवकथन केले. निबंधाचा पहिला भाग त्यांनी भाषांतराच्या सैद्धांतिक चर्चेसाठी खर्ची घातला होता. दुसऱ्या भागात मुथास्वामी या तमीळ लेखकाच्या एका कथेच्या इंग्रजी भाषांतराचे उदाहरण दिले होते. भाषांतरातील लेखकाचा सहभाग तपासण्यासाठी हे उदाहरण बोलके होते. बाईंनी कथा अनेक वेळा वाचून तिचा अर्थ लावणाऱ्या समाजाचा विचार केला होता. भाषांतराला प्रतिकार करणाऱ्या घटकांवर चिंतन केले होते. अशा अनेक समस्या सोडवताना लेखकाचा सल्ला घेतला होता. भाषांतराचे तीन-चार वेळा संस्करण केले होते. अनेक पर्यायांतून योग्य त्या निवडीने मसुदा जुळवला होता. त्यांचे कष्ट आणि भाषांतरनिष्ठा त्यांच्या निवेदनातून स्पष्ट होत होती. पण 'पोस्ट मॉडर्न' व 'इंटरटेक्श्च्युयालिटी' या शब्दांचा अतिसैल वापर त्या करत होत्या. तेव्हा त्या

कथेत पूर्व संहितेची कोणत्या प्रकारची अंतर्गतता आढळते याचा खुलासा मी विचारला. तशी संहितांतर्गतता नसल्याची प्रांजळ कबुली त्यांनी दिली. या पेपरवरची चर्चा छान रंगली. पै. मुमताज रहिमतपुरे सारखीच इंद्राबाईंची मूर्ती. त्यांच्याबरोबर एक दलित विद्यार्थी नियमित हजर होता. तो अधून मधून काही प्रश्न विचारीत असे. बाई संस्कृत भाषा व वाङ्मयाच्या अभिमानी. दलितांची भाषा वेगळी. वैचारिक मतभेद असूनही या जोडीचा जिव्हाळा मनावर ठसला. त्या विद्यार्थ्याला माझा मद्रासमधील 'पायलट' नेमून बाई चहाच्या वेळी मला म्हणाल्या, "मघाशी बरोबर पकडलंस. आंतर संहितेतही अंतर असतं. प्रभावापेक्षा ते नातं कसं वेगळं हे चांगलं स्पष्ट केलंस....' सकाळी नऊपासून दुपारी पाचपर्यंत पिट्टा पडला होता. 'पायलट' अझागरासनला बरोबर घेऊन साडी कार्निव्हलकडे पळालो.

दुसऱ्या दिवशी साडेनऊ वाजता मूळ नियोजनात बदल करून के. एम. जॉर्ज यांचे भाषण मिलिंद मालशे यांच्या अध्यक्षतेखाली घुसडण्यात आले. 'ग्लोबल व्हिलेज' मध्ये कुठलीही भाषा आज आदान-प्रदानाशिवाय आधुनिक राहू शकत नाही, अलिप्त राहून तिला आधुनिक रूप प्राप्त होणे अशक्य आहे. आपल्या घटनेने मान्य केलेल्या १८ तर साहित्य अकादमीच्या यादीतील १९ भाषांपैकी हिंदी ही लिंक लँग्वेज म्हणून अजून प्रबळ व्हायची आहे. आपल्या भाषांतील ग्रंथांची इंग्रजी भाषांतरे 'उथळ' असतात, वगैरे निरीक्षणं नोंदवत जॉर्जने इंग्रजी महात्माख्यान चालू ठेवले. भाषांतराची सैद्धांतिक चर्चा करण्यापेक्षा प्रत्यक्ष भाषांतराचे काम करण्याचा आग्रह धरला. त्यावर सखोल चर्चा करून निरनिराळ्या वाङ्मयप्रकारांचे भाषांतरित प्रातिनिधिक संग्रह सिद्ध करणे जास्त फायद्याचे ठरेल. उत्कृष्ट भारतीय साहित्याचे साडेपाचशे नमुने निवडून त्यांचे भाषांतरित खंड ते प्रसिद्ध करीत आहेत. अशा निवडक ग्रंथांची भाषांतरे ज्यांनी इंग्रजी भाषा मातृभाषा म्हणून घडवलीय त्यांनीच करावी, हा त्यांचा दुराग्रह कायम होता. त्यावर वाद घालायला संधी नव्हती.

रामानुजन यांच्या सहकार्याने जॉर्जने केलेल्या काव्याच्या भाषांतरांचा दर्जा चांगला उतरला. लेखकांनीच भाषांतरात सहभागी होणे जास्त उपयोगी ठरते, असा त्यांचा अनुभव होता. १९५६ मध्ये जॉर्ज साहित्य अकादमींचा सचिव असताना घडलेला किस्सा : सुब्राह्मण्यम् भारतीच्या कवितांच्या हिंदी भाषांतराचा संग्रह कवी दिनकर यांच्याकडे तपासायला देण्यात आला. तो वाचून दिनकर प्रांजळपणे म्हणाले, "सुब्रह्मण्यम भारती हे एक थोर लेखक आहेत हा भ्रम टिकवायचा असेल, तर हे भाषांतर छापू नका." हिंदीत ही अवस्था असेल, तर इंग्रजी भाषांतरांची अवस्था काय असेल? भाषांतरकाराच्या परकायाप्रवेशाचे उत्तम उदाहरण म्हणून त्यांनी रामानुजनने इंग्रजीत भाषांतरित केलेल्या 'ट्रान्समायग्रेशन ऑफ ॲन इंचवर्म' चे उद्‌बोधक उदाहरण सांगितले. एकूण म्हातारपणी माणसाला बोलण्याचा मोह आवरत नाही हेच खरे.

डॉ. स्नेलचे विहारीलालच्या '**सतसई**'च्या भाषांतराचे प्रात्यक्षिक फार प्रभावी ठरले.

कारण चक्रमुद्रित उतारे सर्वांना देण्यात आले होते. 'मिडियम, मेसेज अॅन्ड मॅमरी मोंटन्स' असे त्याचे आकर्षक शीर्षक होते. बिहारीच्या सतराव्या शतकातील ब्रज भाषेतील **सतसही**च्या इंग्रजी भाषांतराचे स्नेलचे काम चालू आहे. पाश्चात्त्य वाचकाला त्याच्या रचनेच्या सौंदर्याशी फारसे घेणे नसते. भाषिक, धार्मिक व सांस्कृतिक अडथळे पार करीत ते भाषांतर दर्जेदार करण्यासाठी स्नेल खूप परिश्रम घेत असल्याचे जाणवले. दोहे इंग्रजी वृत्तछंदात संक्रांत करणे हे मुळात कठीण काम. ब्रायन्ट व हावले यांनी केलेल्या त्याच ग्रंथाच्या भाषांतरातील उतारे त्याने तुलनेसाठी निवडल्याने स्नेल प्रयोगशाळेत प्रात्यक्षिकच घेत असल्यासारखे वाटले. शिवाय मध्ययुगीन हिंदी संहितेशी टकरा घेत तिचे इंग्रजीकरण करणारा गोरा शुद्ध हिंदीत बोलताना ऐकणे हा दुर्मिळ योग होता ना. (ब्रिटिशांना इंग्रजी बोलणाऱ्या भारतीयांबद्दल तेवढे नवल का बरे वाटत नाही ? दिलीप चित्रे किंवा भालचंद्र नेमाडे यांना मत विचारायला हवे.)

कलकत्त्याच्या जाधवपूर विद्यापीठातील अरूपकुमार रूद्र यांचा 'भाषांतर : भाषांशी खेळ' हा विषय फारच कंटाळवाणा ठरला. एक तर हा बंगाली बाबू तुरकाटीसारखा आणि त्याचा आवाज तेवढाच बारीक होता. संथपणे ते भाषांतराचे अनुभव सांगू लागले. त्यात 'खेळा' चे चैतन्य नव्हते. चट्टोपाध्यायांच्या **शेष प्रश्न** च्या इंग्रजी भाषांतराचे काही उतारे त्यांनी वाचून दाखविले. नंतर त्यांनी सत्यजित रे यांच्या **पाथेर पांचाली**च्या फ्रेंच व इंग्रजी अवतारांचा आधार घेतला. टागोरांच्या मदतीशिवाय बंगाली बोलूच शकणार नाही. अध्यक्षस्थान भूषवणाऱ्या ब्रिटिश कौन्सिलच्या मुंबई विभागातील अधिकारी रजनी बहलानीही जांभया देण्याइतक्या कंटाळल्या. पण त्यांनी भाषांतरातील भाषाशैलीच्या समस्येकडे लक्ष वेधून चर्चा सावरली. या ठेंगण्या बहलानीबाईंचे भाषाशास्त्र हे खास आवडीचे क्षेत्र आहे. बोलणे मिष्ठास तसेच ठाशीव. खिलाडू वृत्ती लक्षणीय.

डॉ. मिलिंद मालशे या मुंबईकराच्या भाषणाचा विषय 'काव्याचे भाषांतर : चिह्नमीमांसा अभ्यासपद्धती' हा होता. त्यांनी रॉबर्ट फ्रॉस्टच्या 'द रोड नॉट टेकन' चे स्मरण करीत भाषांतर म्हणजे अर्थमीमांसा-आकलन कसे असते याचे कुसुमाग्रजांच्या राजमुकुटमधील 'शुभ अमंगल' या कोरसच्या उदाहरणाने स्पष्ट केले. नंतर त्यांनी विंदा करंदीकरांनी स्वतः इंग्रजीत भाषांतरित केलेल्या 'पोएम्स ऑफ विन्दा' मधील अनेक कवितांचे प्रभावी वाचन केले. त्यातील 'स्तन्य सूक्ता'ला उपस्थितांनी जोरात दाद दिली. मात्र काव्य सादरीकरणात अडकल्याने चिह्नमीमांसा बाजूला पडली. एकूण इंग्रजीतून मराठीत व मराठीतून इंग्रजीत झालेल्या भाषांतरांच्या चर्चेला तोंड फुटल्यामुळे माझी वाट मोकळी झाली. पुढचा पेपर हैद्राबादच्या डॉ. सुधाकर मराठे यांचा होता. आम्ही तिघेच मराठी भाषक. तसे गुजरातमधील अंजना देसाई व गणेश देवी मराठी भाषकच म्हणा. पण पश्चिम विभागातून गेलेले आम्ही दोघेच. सगळेजण वेगवेगळ्या राज्यांत

विभागलेले.

'आव्हान आणि कर्तव्य : भारतीय प्रादेशिक साहित्याचे भाषांतर' या विषयावर मराठे यांनी एक टिपण/ टाचण सादर केले. त्याच्या प्रती नंतर वाटण्यात आल्या. स्वतःचे भाषांतराचे अनुभव कथन करण्यातील त्यांचा प्रांजळपणा मनाला स्पर्शून जाणारा होता. दलित व ग्रामीण साहित्याचे भाषांतर इंग्रजीत होण्याची गरज व त्याचे महत्व प्रतिपादन करीत त्यांनी जणू उपेक्षितांची कैफियतच मांडली. बोली भाषेतील वाङ्मय भाषांतरित करण्यासाठी नवे भारतीय इंग्रजी घडवण्याचा आग्रह त्यांनी धरला. मी त्यांचे अभिनंदन करून जॉन अगार्ड या लॅटिन अमेरिकन कवीने 'ऑक्सफर्ड डॉन' ला उद्देशून लिहिलेल्या कवितेतील ओळी अंदाजे जुळवून ऐकवल्या,

*'ऑक्सफर्ड डॉन*
*रिमेंबर धिस*
*यू गेव्ह अस इंग्लिस*
*बट इट इज अवर ॲक्स*
*वुई वुईल ब्रेक युवर सिंटॅक्स...*

ब्रिटिश कौन्सिलच्या सौजन्याचा हा गैरफायदाच आहे, असे अनेक प्रतिनिधींना वाटले असावे. तसे अनेकांच्या चेहऱ्यावरून मला वाटले. पण प्रतिकाराचे सौंदर्यशास्त्र (Poetics of resistance) गोरे मुखवटे काळ्या कातडीवर न पांघरता मी संधी मिळेल तेव्हा पुढे रेटले. ते अनेकांना रुचले नाही असे लवकरच लक्षात आले. कारण अनेक विद्वान मला दलितच समजू लागले! तेव्हा नेमाडे लंडन विद्यापीठातील गोऱ्या माहेबाशी भांडल्याचा त्यांच्या 'आत्मचरित्र' कवितेतील उल्लेख आकळला. बरेच दूरीकरण झालेल्या विद्वानांच्या कळपात उगीच एकटे एकटे वाटू लागले. दया पवारांचा 'गावचा ओढा बरा होता' आठवली... मात्र मराठ्यांच्या निबंधाच्या निमित्ताने भारतीय भाषांत ग्रामीण व दलित साहित्याचे नवे प्रवाह जोमाने दाखल होत असल्याची माहिती मिळाली. कर्नाटकात तर साहित्य संस्था उपेक्षितांनी वळकावल्या पण आता ते मुख्य प्रवाहात सामील झाल्याचा सुखद अहवालच वनमालाने सादर केला. अर्थात हे साहित्य इंग्रजीत भाषांतरित कोण व केव्हा करणार हा प्रश्न उरलाच. भुजंग मेश्रामच्या 'उल्गुलान' चे मराठ्यांनी इंग्रजी केलेले भाषांतर दीर्घकाळ मनात रेंगाळत राहिले. ही चाहूल आशादायक होती.

भरपूर जेवणानंतर शोधनिबंध सादर करण्याचा नंबर माझा होता. त्याच्या आवश्यक तेवढ्या फोटोप्रती वेळेवर उपलब्ध करून देण्याची दक्षता अध्यक्षा सौ. शुक्ला मित्रा (ब्रिटिश कौन्सिल अधिकारी कलकत्ता विभाग) यांनी घेतली होती. वीस पानांच्या निबंधाची प्रत हातात पडताच तंजावर विद्यापीठातील डॉ. पी. रंगासामी उद्गारला, "तुझा पेपर थरकाप उडवणारा आहे! परिषदेत पूर्ण लिखित निबंध उपलब्ध झाला तो तुझाच!!...' सौ. मित्रा

यांनी माझा परिचय चांगला करून दिल्याने धीर आला. स्वतःचा प्रबंध इंग्रजीतून मराठीत भाषांतरीत/ स्वैर रूपांतरित करण्याचा अल्प अनुभव वगळता मला भाषांतराचा अनुभव नव्हता. शिवाय भाषांतराच्या राखीव कुरणात बड्या पाळीव प्राण्यांनी माझ्या प्रवेशाला बऱ्याच वेळा अटकाव केला होता. तेव्हा संशोधनाचा तुटपुंजा अनुभव व एका कथेच्या इंग्रजी, फ्रेंच व हिंदीत अन्य भाषांतरकारांनी केलेल्या भाषांतराआधारे मी 'भाषांतरकार/ भाषांतरांच्या शोधात एक लेखक' हा शोध निबंध तयार केला होता. त्याच्या पहिल्या भागात महादेवशास्त्री कोल्हटकरांचे **अथेल्लो नाटक** (१८६७) व नारायण वापूजी कानिटकरांच्या **शशिकला आणि रत्नपाळ** (१८८२) या नाटकांची ऐतिहासिक संदर्भात तुलना होती. तिचा भर वसाहतकालीन भाषांतरकार व वाचकांची ओळख पटवण्यावर होता. दोहोंच्या वाङ्मयीन प्रभुत्वावर आणि रंगभूमीच्या अवस्थेवर नाट्य रूपांतराच्या खेळत्या (playable) संहितांचे भवितव्य अवलंबून असते. सबब रंगमंचावर मूर्तस्वरूपात स्वीकारल्या जाणाऱ्या नाटकाच्या संहितांची अनेक अवस्थांतरे संभवतात. त्यांच्या प्रयोगांच्या स्वागताचा अभ्यास (reception study) भारतात अजून आलेला नाही. नाटकाच्या भाषांतरांच्या समस्या अन्य वाङ्मय प्रकारांच्या भाषांतरापेक्षा वेगळ्या आहेत, हा मुद्दा अधिक स्पष्ट करण्यासाठी मी माझ्याच 'फुगड्या' या कथेच्या इंग्रजी, फ्रेंच व हिंदी भाषांतरातील साम्य-भेद निबंधाच्या दुसऱ्या भागात स्पष्ट केले.

मूळ निबंध न वाचता फक्त सारांश सांगितला. फ्रेंच भाषांतरात पुण्यातील उच्चभ्रू भाषांतरकर्तीस ग्रामीण भाषेतील 'कारभारी, मालक' हे शब्द पत्नी नवऱ्यासाठी का वापरते, या रूढीचे गम्य कळले नाही. त्यामुळे संपूर्ण कथेत 'मास्टर-स्लेव्ह' असा घोळ पति-पत्नीच्या नात्यात झाला. 'आतडं तुटणं' या वाक्यप्रचाराला इंग्रजी-फ्रेंचमध्ये पर्याय मिळणे कठीण. या त्रुटी बरोबर असल्याचा निर्वाळा दिल्लीच्या जे. एन. यू मधील प्रा. एन. कमलाने दिला. फ्रेंच भाषांतर तिने वाचले होते. मात्र हिंदी भाषांतर फार दर्जेदार झालेय. तो भाषांतरकार खेड्यातील आहे. शिवाय ग्रामीण मराठी साठ टक्के ग्रामीण हिंदीशी जवळची आहे. दोहोंत खूप साम्य आहे. प्रामाणित भाषा इंग्रजीच्या प्रभावाने एकमेकींपासून किती दूर गेल्यात हा वेगळ्या चर्चेचा विषय ठरला. भाषांतरकाराचेच नियंत्रण करणाऱ्या घटकांचा ऊहापोह गैरसोईचा वाटला असावा. आता बी. चंद्रिका मल्याळममध्ये कशी 'फुगड्या' घालते बघू. लेखकाचे वाङ्मयीन नशीब केवळ भाषांतरकारावरच अवलंबून असते हे चूक असल्याचा माझा दावा संपूर्ण निबंध ओळीने वाचला नसल्याने पटायला जरा जड गेला. त्यामुळे त्यातील एकाच भागाचे सुलभीकरण करण्याच्या सूचना काही प्रतिनिधींनी केल्या. भाषांतरांचा तौलनिक अभ्यास ही शाखा रुजायला बराच काळ वाट पाहावी लागणार असे दिसते.

श्री. नीलम सर्वमणी या तमीळ तरुणाचे तमीळ नाटकांची इंग्रजी भाषांतरे करण्याचे

अनुभव बोलके होते. त्याने केलेली दोन नाटकांची भाषांतरे प्रकाशकाने तिसऱ्याच्या नावावर छापली. एका संपादकाने असाच डल्ला मारला. तमीळ भाषा न कळणाऱ्यांना संबंधित उताऱ्यांच्या इंग्रजी अवतारावरच समाधान मानावे लागत होते. पण हे बऱ्याच प्रतिनिधींच्या बाबत घडणे अटळ होते. मात्र सर्वमणीची कळकळ अंतर्यामी भिडणारी होती.

७ एप्रिल. मॅकमिलन प्रकाशनाच्या अधिकारी सौ. मिनी कृष्णन व वासंती संकरनारायनन यांनी मल्ल्याळम् मधील **बहिष्कृत** या नंबुद्रीब्राह्मण कुटुंबाच्या जीवनावरील वास्तववादी कादंबरीच्या इंग्रजी भाषांतरातील उतारे प्रभावीपणे सादर केले. ही कादंबरी इंग्रजीत लवकरच प्रकाशित होत आहे. अनंतमूर्तींच्या **संस्कार**प्रमाणेच ती गाजेल. तिचे भाषांतर बी. चंद्रिकाने केले आहे. भारताच्या भिन्न प्रदेशात किती वेगळ्या प्रकारचे भयानक वास्तव ललित साहित्यात प्रतिबिंबित होत आहे याची पुरेशी जाणीव नसल्याची खंत वाटू लागली. आमचे लक्ष युरोप-अमेरिकेतील वाङ्मयावरच खिळून राहते. शेजारच्या राज्यात काय चाललेय हे कळायला आज तरी इंग्रजीचाच आधार घेणे अटळ आहे. परिषदेत सौ. एन कमलाचा अपवाद वगळता सगळे प्रतिनिधी इंग्रजीचे अध्यापकच होते. त्यात स्त्रियांची संख्या तुल्यबळ होती. त्यामुळे बराच समतोल साधला गेला. सी. टी. इंद्रा व उमा नारायन यांनी तमीळ कादंबरीतील उतारे असेच सादर केले. त्यात ब्राह्मण स्त्री दलिताशी विवाह करते या विषयीची मांडणी मार्क्सवादी दृष्टीने केलेली होती. तिचे तंत्र उत्तराधुनिक असल्याचा दावा इंद्राने केला. उत्तराधुनिकता मराठीत नाही म्हणतात.

बडोद्याचे डॉ. गणेश देवी यांना अलीकडेच इंग्रजी समीक्षेसाठी साहित्य अकादमीचा पुरस्कार मिळाल्यामुळे त्यांच्याबद्दल बरीच उत्सुकता होती. कोल्हापूरच्या शिवाजी विद्यापीठात पीएच. डी. पर्यंत पदव्या मिळवणाऱ्या या समकालीनाने पताका फडकवल्यामुळे मला त्याचा जरा जास्तच अभिमान वाटत होता. आपल्या माणसाची 'वाढ' कौतुकाने बघण्याचा तो एक वेगळा अनुभव होता. त्याचे एक खास जाहीर व्याख्यान नंतर होणार होते. 'भाषांतराचे इतिहासशास्त्र' या विषयावर निबंध न वाचता गणेशने उभं राहून शांतपणे भाषण दिले. त्याचे इंग्रजी उच्चार अकारण कृत्रिम नव्हते याचे मला समाधान वाटले. विचारातील सुस्पष्टता, सखोल चिंतन व मुद्द्यांची सोदाहरण रेखीव मांडणी ही त्याची वैशिष्ट्ये प्रथमच मनावर ठसली. भारतात भाषांतरांचाच इतिहास आजवर कुणी लिहिलेला नाही. मात्र भारतीय संस्कृतीचा गाभा भाषांतराचा आहे. हा विरोधाभास दूर करण्यासाठी या पठ्ठ्याने भाषांतराच्या इतिहास लेखनाचा प्रचंड प्रकल्प हाती घेतला आहे. पाच खंडांत भारतीय भाषांतराचे सिद्धांत, इतिहास व उपयोजन या अंगाने रूपरेषा आखली आहे. तीच त्याने नम्रपणे थोडक्यात मांडली. भाषांतरेच कधी कधी मूळ कलाकृतीपेक्षा चांगली वाटतात. मराठी भाषांतरापेक्षा बंगाली भाषांतरे बरी असतात. भाषांतर कुठल्याही

संस्कृतीत स्वतःसाठी जागा निर्माण करते. भारतात भाषांतरांची सूची उपलब्ध नाही. या कामासाठी पाश्चात्त्य नमुने कामाचे नाहीत. कालखंडीय कप्पे भाषांतरे नाकारतात. पाश्चात्त्य वाङ्मयेतिहासात व्यक्तिवाद बोकाळल्याने लेखकमाहात्म्य/ स्तोम आढळते. भाषांतरकार परिशिष्टात ढकलले जातात. भाषांतरातूनच भारतीय वाङ्मयात नव्या परंपरा सुरू झाल्यात वगैरे मार्मिक निरीक्षणे, खुसखुशीत विनोद यामुळे देवींचे भाषण रंगत गेले. त्याचा समग्र सारांश द्यायला वेगळा निबंध लिहावा लागेल.

भालचंद्र नेमाड्यांच्या बंडखोर विचारांची बीजे गणेशच्या विवेचनातून निवडून काढणे शक्य होते. देशीवादी मांडणीची बैठक स्पष्ट होती. फरक एवढाच की, देवी हे नेमाड्यांच्या खांद्यावर बसल्याने दूरचे पाहत आहेत असे वाटले. नेमाडे उग्र-आदिम, तर 'देवी' शांत. त्यांना डिवचून भडकवण्यासाठी मी खोचक प्रश्न विचारला, "आपला हा संकल्पित इतिहास 'वरून खाली' की, 'खालून वर' लिहिलेला असेल?" "तो आतून (From within) आलेला असेल," या त्यांच्या उत्तरावर हशा पिकला. अरबिंदोवरची त्याची पीएच. डी. इथे मदतीला धावली. पण गड्याने 'खालून वर' इतिहास घडवणाऱ्या पठड्यांचा परामर्ष अल्प वेळात समाधानकारकरीत्या घेतला. 'तो आला, त्याने पाहिले आणि जिंकले' अशी जादू घडली. त्याची खरी कसोटी पुढेच होती. पण कुठलाही तोरा नि बिरुदे न मिरवता तो चर्चात खेळकरपणे सहभागी होत होता, हे विशेष.

तंजावरच्या डॉ. पी. रंगासामींचा निबंध काव्याच्या भाषांतराच्या समस्येवर होता. पण हा पहाडी गडी प्रारंभी इंग्रजी नाटकांच्या तमीळ अवतारावर घसरला. पीएच. डी. चा प्रबंध या विषयावर सिद्ध केल्याचा हा परिणाम होता. कारण माझ्या निबंधावर त्याने अतिसामान्य प्रश्न उपस्थित केले होते. शेक्सपिअरच्या नाटकाच्या 'प्राम्प्ट कॉपीज' भाषांतर, अनुकरण, वाङ्मयचौर्य व प्रभाव या संकल्पनांच्या भेदाभेदांची मांडणी सुस्पष्टपणे भारत पातळीवर कुणीच केली नसल्याचे लक्षात आले होते. रंगासामी (Rangasamy) ने अनेक तमीळ ग्रंथांची इंग्रजी भाषांतरे केलीत. एका भाषांतराआधारे दुसऱ्या भाषेत रूपांतर असेही अनेक प्रकार घडतात. रशियन ग्रंथांची इंग्रजी भाषांतरे भारतीय भाषांतरकार वापरतात ना? भारतीय भाषातील भाषांतरे मुळापासून तीनदा दुरावलेल्या आधारावर बेतलेली असली, तरी चालतील असा विचारही बळावत चालला आहे. अकादमीचे पुरस्कारही मिळतात. रंगासामीने भाषांतरातील शैली, रचना, सांस्कृतिक घटक, भाषिक रचना वगैरे बंधनांचे विवेचन अनेक उदाहरणे घेऊन केले. त्यांचा गडगडाटी आवाज आणि आग्रही प्रतिपादनामुळे अधूमधून रसभंग झाला. एन. कमला यांनी फ्रेंचमध्ये भाषांतर अध्यापनातील अडचणी व उपायांचे विवेचन चांगले केले. कवयित्री डॉ. सुकृता कुमार यांचे भाषांतराच्या काव्यशास्त्रावरील भाषण प्रभावी ठरले.

सायंकाळी रूपर्ट स्नेलचे जाहीर व्याख्यान ब्रिटिश कौन्सिलच्या सभागृहात होते. त्याने

पूर्वी विवेचन केलेल्या स्वतःच्या भाषातर प्रकल्पाचाच पुढचा भाग सांगितला. व्याख्यान सर्वांसाठी खुले असल्याने नवे काळे-गोरे चेहरे बरेच होते. तुफान गर्दी वगैरे नव्हती. एका उत्साही मद्रासीने त्याला विचारले, "तुम्ही हिंदी कुठे शिकला ?" त्याने तात्काळ उत्तर दिले, "इंग्लंडमध्ये." त्या खडूस बाईने दुसरा खोडा टाकला. "या हिंदी पुस्तकातील उताऱ्याचे इंग्रजी भाषांतर करा." हे पुस्तक तसेच ठेवून स्नेलने गोगलगाईसारखी मूळ चाकोरी पकडली ! विहारीच्या **सत्तसईच्या** चर्चेतच तो गुंतून पडला. अधून मधून भाषांतरांची सैद्धांतिक चर्चा तौलनिक दृष्टीने करत राहिला. त्याचे व्याख्यान छान रंगले. पण त्याने त्या हिंदी पुस्तकातील उताऱ्यांचे भाषांतर का केले नाही ? हिंदीचे त्याचे ज्ञान सांस्कृतिक राजकारणापुरते म्हणावे, तर त्याच्या नावावर भाषांतराचे अनेक प्रकल्प आहेत. ते काही असले, तरी भारतीय जसे इंग्रजीचे गुलाम बनतात तितक्या प्रमाणात स्नेलसारखे युरोपियन भारतीय भाषात सदैव विचार करत असतील असे वाटत नाही. अपवाद थोडे असतील, ते असोत. सायंकाळच्या कॉकटेलने रूपर्टच्या भाषणाची चव वाढवली हे खरेच.

८ एप्रिल. उत्कल विद्यापीठातील डॉ. गणेश्वर मिश्रा हे उडियातील नामवंत लेखक व भाषांतरकार. संस्कृतीचे भाषांतर करण्यातील समस्या व उपाय सुचवण्यासाठी त्यांनी लीला रे ने केलेल्या के. सी पाणीग्रहींच्या **माटीरमनुस** (१९३१) च्या इंग्रजी अवताराचे उदाहरण निवडले. **गोरा** च्या बंगाली व इंग्रजी अवतारांचाही उल्लेख केला. एकाच संहितेच्या अनेक इंग्रजी भाषांतरांचा तौलनिक विचार किती महत्त्वाचा आहे हे लक्षात येऊ लागले. चर्चा चांगली रंगली. भाषांतरांच्या मूल्यमापनाच्या कसोट्यांचा विचार डोकावला. त्यासाठी वेगळे शिबिर भरवण्याची गरज जाणवली. काही मुद्द्यांची पुनरुक्ती फार झाली.

उरलेला संपूर्ण दिवस मद्रासमधील तमीळ/मल्ल्याळम सिनेमांना इंग्रजी उपशीर्षके-मजकूर तयार करून देणाऱ्या वासंती संकरनारायनन या महिलेच्या उपक्रमासाठी राखून ठेवल्याचा पश्चात्ताप करण्याची वेळ संयोजकांवर आली. प्रादेशिक भाषांतील सिनेमांना परदेशात मागणी वाढत आहे. त्यांच्यासाठी इंग्रजीत भाषांतरित केलेला मजकूर पुरवण्याचा उद्योग वाढण्याच्या शक्यता आहेत. पर्यायाने इंग्रजीच्या प्रसारालाही त्याचा हातभार लागेल. हा व्यापारी हेतू ठेवून हा उपक्रम आखला होता. पण त्याला सिनेतज्ज्ञांची मदत मिळाली नाही. अखेर ही आघाडी लढवताना वासंतीची दमछाक झाली. तिचा निबंधही सामान्य दर्जाची माहिती पुरवणारा होता. तो संपूर्ण वाचून तिने 'बोअर' केले. सिनेमातील भाषांतरित उपमजकुरांमुळे रसभंग होतो. सुंदर पात्रांच्या कमरेखालच्या भागाचे दर्शन घडत नाही ! इंग्रजी भाषांतर टाकाऊ असते, अशा अनेक तक्रारी पुढे आल्या. वासंतीने संकट ओळखून अडीच तासांचा मल्ल्याळम सिनेमा दाखवला. त्यातल्या सब टायटलशिवायदेखील तो चांगला कळला असता. त्यानंतर एक डॉक्युमेंटरी दाखवायला सुरुवात होताच अनेक प्रतिनिधी अंधाराचा फायदा घेऊन अदृश्य झाले. या उपक्रमाला

अध्यक्ष नसल्याने कसलेच नियंत्रण राहिले नाही.

सायंकाळी कॉन्नेमरा हॉटेलच्या सुंदर हॉलमध्ये डॉ. गणेश देवींचे 'तिट्यावर अडकलेली भारतीय समीक्षा' या विषयावर जाहीर व्याख्यान होते. निवडक श्रोत्यांनी गर्दी केली होती. देवींनी नेहमीच्या शैलीत मान तिरकी करून शून्यात बघत प्रारंभीच थोडा उपरोधी सूर लावला : १९५ विद्यापीठांत आज आपण वाङ्मय शिकवतो. हजारो विद्वान या कामात गुंतलेत. कित्येक भाषांत ललित लेखन घडतेय. नाना वाङ्मय प्रकार हाताळले जात आहेत. पण समीक्षा क्षेत्रात मात्र आपण चाचपडत आहोत. सव्वादोन कोटी रुपये शिक्षणावर खर्च होतोय. पण निश्चित समीक्षा कानून आम्ही बनवू शकत नाही. देशाबाहेरून कोठून तरी येणाऱ्या आयत्या सिद्धांतावर गुजराण चाललीय. ही असहायता अनुकंपनीय आहे.

पाहा आनंदकुमार स्वामी नि मर्ढेकर पश्चिमेकडेच वळलेत. ही दुसऱ्यावर केलेली पोकळ टीका नाही. मी वाङ्मयच शिकवतो. पण आमचे समीक्षा विचाराला योगदान काय? मौलिक भारतीय समीक्षा आहे का? आमची अवस्था गांडीव गळालेल्या अर्जुनासारखी झालीय. डेरीडा, फूको नि हार्टमन काय म्हणतात; नव्या सिद्धांतांचे परके रथी-महारथी काय सांगतात त्याचीच पोपटपंची चाललीय. उलट वसाहतवादी काळात मागे वळून भरतमुनी, दंडी वगैरे संस्कृत पंडितांच्या रससिद्धांताकडे वळण्याची ओढ प्रबळ होती. पण आज त्यांचा विसर पडलाय. मोठी दरी निर्माण झालीय. इंग्रजी शिक्षणाचा हा परिणाम असल्याचे सांगितले जाते. पण हे खोटे आहे.

अकराव्या शतकात संस्कृतचा वापर थांबला. पण नव्या भाषांचा उदय झाला. आठव्या शतकापासून कन्नड, मल्ल्याळम्, तेलगुसारख्या भाषा घडत होत्या. हे सातत्य तुटलेले नाही. एरवी भारतीयांचे इंग्रजी लेखन हे साहित्य ठरले असते. केवळ पुस्तके वाङ्मय घडवत नाहीत. तुकारामासारखा थोर कवी मराठीत झाला, पण समीक्षा का निर्माण झाली नाही? संस्कृतचे निर्जीव अनुकरण होत राहिले. त्यात मध्ययुगात भक्तिरसाची भर पडली. पण मध्ययुगात महत्त्वाच्या समीक्षा सिद्धांतांची भर पडली नाही. तरीपण अक्षर ग्रंथ निर्माण झाले. संस्कृतमधील सिद्धांत नष्ट झाले नाहीत. अकराव्या शतकातील अभिनवगुप्त, सतराव्या शतकातील जगन्नाथ पंडित वगैरेंनी ते परंपरासातत्य टिकविले. ललित साहित्याची भाषा म्हणून संस्कृतचा वापर थंडावला. शरीराला न पेलणारे खिसे गळून पडतात तशा भाषाही मृत होतात. हे निसर्गनियमाने घडते.

नंतर ब्रिटिश आले. आपण त्यांना फार दोष देऊ नये. आपल्या अपयशाचा विचार प्रथम करावा. ब्रिटनमध्येच तेव्हा विलक्षण परिस्थिती होती. मजुरांचे उठाव होत होते. इंग्रजी शिक्षणाची पाळेमुळे वेगळी आहेत. 'नेटीव्हज' ना सुधारण्याचे, सुसंस्कृत करण्याचे त्यांचे स्वयंघोषित मिशन शोषणासाठीच होते. पण त्यांनी संस्कृत पुन्हा शोधून काढली. त्यामुळे भाषाशास्त्राचा उदय झाला. तौलनिक साहित्य आकार घेऊ लागले. विल्यम जोन्सने

भारताच्या उज्ज्वल भूतकाळाचे गोडवे गायले; ऱ्हासाबद्दल खेद व्यक्त केला. ज्ञानाला सत्तेच्या पाठबळाशिवाय किंमत नसते. त्याला राजकीय पाठिंबा लागतो, तेव्हाच पाणिनी उदयाला येतो. चांगले बोलतो तो विद्वान, अशी एक व्याख्या त्याने दिली आहे. समाजाने निवडक लोकांना सत्तास्थानी राहण्याची मान्यता दिलेली असते. उदा. जोतिषशास्त्र फोफावले, पण अकराव्या शतकानंतर संस्कृतला अवकळा प्राप्त झाली. इंग्रजी साहित्य श्रेष्ठ ठरण्याची कारणे ब्रिटिशांच्या राजकीय धोरणात लपलेली आहेत. साहित्यात श्रेष्ठ अथवा टाकावू असे काही नसते. मुलांची गाणी त्यांना श्रेष्ठच वाटतात. मूर्खांची गाणी मूर्खांच्या प्रांतात श्रेष्ठच असतात. इंग्रजी वाङ्मय प्रकार श्रेष्ठ हा विश्वास दृढ झाला. त्या नमुन्यांकडे आपण अजून वळत असतो. अपराधी भावना पछाडते. अलीकडे फ्रान्स व अमेरिकेची भर त्यात पडली आहे. मुंग्यासारख्या रांगा लागतात त्यांच्या अनुकरणासाठी. आमचा विद्यार्थी स्वतंत्रपणे विचारच करू शकत नाही. कारण उसन्या सिद्धांतावरच तो पोसलेला असतो. उपऱ्या वाङ्मय संस्कृतीतून कसली समीक्षा वाढणार ?

मराठी वाङ्मयात दलित व ग्रामीण साहित्य उत्कृष्ट आहे. कुठल्याही पाश्चात्त्य सिद्धांताच्या आधाराने त्याची समीक्षा करणे शक्य होणार नाही. लक्ष्मण गायकवाडचा **'उचल्या'** तील प्रामाणिक चोर मला राजकीय दरोडेखोरांपेक्षा श्रेष्ठ वाटतो. हे नवे अनुभव व नव्या भाषा नवी आव्हाने देत येत आहेत. अधिकृत यादीत २१ भाषा असतील; पण अन्य ८५ भाषांत लेखन होत आहे. आदिवासी बहुभाषक होत आहेत. जगात या वाङ्मयीन अवस्थेला तुलना सापडत नाही. आपल्या संस्कृतीतील ज्या बाबी मरत आहेत त्यांना आपल्या मरणाने मरू द्या. ज्ञानेश्वराने बंडखोरी केली तशी आता घडू द्या. संस्कृत अथवा बाहेरचे सिद्धांत आणून फारसा उपयोग नाही. समीक्षा वैश्विक (universal) आहे हा युक्तिवाद फसवा आहे. देशांच्या मर्यादा ओलांडून मानवतावादी भूमिका स्वीकारण्याचा विचार आकर्षक आहे. पण चिरंतन सत्याप्रमाणे सिद्धांताचा शोध लागत नसतो. त्यांचा शोधबोध ऐतिहासिक संदर्भातच होतो. तुकाराम वा भर्तृहरीच्या लेखनामुळेही ते पूर्णपणे घडत नसतात. हॅरॉल्ड ब्लूमचे प्रभावाचे सौंदर्यशास्त्र इंग्रजी रोमॅन्टिक कवींच्या काव्यामुळे उदयास आले. डेरिडाच्या तत्त्वज्ञानाची मुळे फ्रेंच मातीत खोलवर रुजलेली आहेत, हे विसरता कामा नये. ते इथे कसे टिकणार ?

नेटिव्हिजम (nativism) हा शब्द मला आवडत नाही. कारण तो अमेरिकन चावटपणातून आला आहे. त्यापेक्षा 'देशीवाद' चांगला वाटतो. देशात अनेक घटक येतात. भारतीय संगीतात त्या अनेक परंपरा आढळतात. १९ व्या शतकात राष्ट्रवादाबरोबर ब्राह्मणीझम वाढला. त्याआधी मध्ययुगात पर्शियन परंपरा येऊन मिसळल्या. ब्रिटिशांच्या आगमनाबरोबर भद्रलोक अथवा बाबूंची चलती सुरू झाली. त्या सावळ्या गोंधळात देशी परंपरांचाच विसर पडला. देशीवाद म्हणजे तरी काय ? स्वतःच्या परंपरांची चांगली जाणीव,

आपले अस्तित्व कशाशी निगडित आहे याचे भान असणे म्हणजे देशीवाद. ते नसेल, तर बांडगुळे वाढतात. समीक्षेचा उपरा उद्योग फोफावतो. अशा कैचीत भारतीय समीक्षा सापडली आहे. तिला स्वतःचा रस्ता शोधावा लागेल. आज गोंधळून ती तिठ्यावर उभी आहे.

देवींवर अनेक प्रश्नांचा वर्षाव झाला. वेगळे मुद्दे स्वीकारत, काही विनोदी पद्धतीने उडवून लावत गड्याने फड जिंकला. विचारात आक्रमकता नव्हती, पण आग्रही प्रतिपादन होते. स्वतःचा सिद्धांत रेटण्याचा दुराग्रह नव्हता. माझ्याजवळ पत्ता आहे, पण त्या पत्त्यावर पोहोचण्याचा मार्ग दाखवा, ही नम्र भूमिका सोईची वाटते. अर्थात मूर्तिभंजनाचा आवेश नसल्याने तिचे स्वागत प्रस्थापित व्यवस्थेत व्हायला अडचण नाही. हाच नेमका फरक नेमाडे व देवी यांच्या प्रतिपादनात आढळतो. पहिल्याने मळलेल्या वाटेवरून अजून खूप पुढे जायचे आहे.

९ एप्रिल. रूपर्ट स्नेल गैरहजर असल्याने आयत्या वेळी बंगलोर विद्यापीठाच्या डॉ. वनमाला विश्वनाथा या विदुषीचे भाषांतर अनुभव कथन ठेवण्यात आले. ब्राह्मण कुटुंबातून आपण कन्नडबरोबर तेलगू कसे शिकलो वगैरे माहिती त्यांनी पुरवली. (या परिषदेतही जात लपत नव्हती हे वारंवार लक्षात आले. अर्थात 'साडेतीन टक्के' ऐवजी इथे ८३% एवढे प्रमाण वाढले होते. तेथे गंगाधर गाडगीळ हवे होते. कारण साहित्य अकादमीच्या भाषांतर लघुउद्योग रोजगार हमी केंद्राने संधी दिल्यामुळे आपण भाषांतराकडे वळल्याचे बहुसंख्य विद्वानांनी कौतुकाने नमूद केले. ब्रिटिश कौन्सिलचे धोरण परंपरेला साजेसेच होते. कारण अलबुकर्कने गोव्यातून १५१० साली पोर्तुगालच्या राजाला पत्राने कळवले होते. . . 'मी शेतमजूर व ब्राह्मण वगळून सर्वांची कत्तल करण्याची कठोर आज्ञा सैनिकांना केली आहे. .) वनमालाबाईंनी कर्नाटकात कानडीचे महत्त्व ओळखून देशीपणा जपला. प्रथम कानडीत पीएच. डी. मिळवून इंग्रजी विभागात अध्यापन करू लागल्या. ही फसवणूक त्यांनी जाहीर केली. साहित्य अकादमीने त्यांना कथा भाषांतराचे काम दिले वगैरे तपशील हसत खेळत पुरवला. बाई तशा बिनधास्त. त्यामुळे चर्चा बरी रंगली. कर्नाटक साहित्य अकादमीचे अध्यक्ष बलगू रामप्पा दलित ग्रूपचे असून दलित व ग्रामीण साहित्य जोमदार असल्याचे सांगितले. मात्र केंद्रस्थानी ब्राह्मणी साहित्य असल्याचेही त्यांनी स्पष्ट केले. एकूण भारतात सर्वत्र पळसाला पाने तीनच.

समारोपात सोईच्या प्रतिनिधींना एकत्र बसवून झालेल्या उपक्रमांचा आढावा व भविष्यकालीन परिषदेच्या नियोजनाच्या संदर्भात सूचना नोंदवण्यात आल्या. त्यातील नेहमीचा परस्परपूजेचा भाग वगळला, तरी भाषांतरकारांची संघटना बळकट करण्याचा विचार महत्त्वाचा होता. चारशे पानांची मराठी भाषांतरांची सूची तयार केली, पण प्रकाशक मिळत नसल्याची खंत सुधाकर मराठ्यांनी नोंदवली. सहकारी तत्त्वावर प्रकाशने करण्याची

योजना मांडली. कुणी भाषांतराचा अभ्यासक्रम पदवीपूर्व वर्गात शिकवण्याचा आग्रह धरला, तर भाषांतरकारांची डिरेक्टरी तयार करायला कुणी सांगितले. अशा बऱ्याच सूचना हवेत विरल्या. देवींनी मात्र सुनावले, 'अशी सेमिनार्स ब्रिटिश कौन्सिलने मुळीच भरवू नयेत. निदान एकदा बोलावलेल्या प्रतिनिधींना पुन्हा बोलावू नये. हा पैसा वाचवून भाषांतरित ग्रंथासाठी खास ग्रंथालय उभारायला मदत करावी. चर्चा चऱ्हाटासारखी वाढत चालल्याचे लक्षात येताच रॉबर्टने प्रत्येकाला एक छापील प्रश्नावली व सर्वांच्या पत्त्यांची यादी दिली. प्रश्नावली ब्रिटिश शिस्तीनुसार झालेल्या उपक्रमाचे मूल्यमापन व पुढील नियोजनाचे स्वरूप निश्चित करण्याशी निगडित होती. ती प्रतिनिधींनी भरून द्यायची होती. दुपारचे जेवण वाट पाहत होते. औपचारिक निरोपाला फाटा देण्यात आला. तट्ट जेवून प्रतिनिधी विमान/ रेल्वे पकडायला पळू लागले.

या परिषदेचे फलित काय ? व्यक्तिगत पातळीवर विचार करता फायदे बरेच. इंडियन एअरलाईनचा प्रवास, चार नव्या ओळखी, निमंत्रणांची नोंदणी, व्यावसायिक संबंध संवर्धन वगैरे वगैरे. लेखक चांगला भाषांतरकार असावा ही जाणीव झाली. भारतीय पातळीवरील वाङ्मयीन प्रवाहांचा तौलनिक विचार करण्याची ओढ लागली. या निमित्ताने एक शोधनिबंध लिहून झाला. स्वतःच्या कथेच्या भाषांतरातील त्रुटी जाणवल्या. भाषांतर लेखकाचेही प्रबोधन घडवते. ग्रामीण व दलित साहित्याचे भाषांतर करायला त्या वर्गातील लोक तयार होणे गरजेचे आहे. भारतीय वसाहतवादाच्या भिंती मोडणारे भाषांतरकार तयार व्हायला काही शतके जावी लागतील.

भारतीय भाषांतरकार तयार करण्यासाठी ब्रिटिश कौन्सिलने लाखो रुपये का खर्च करावेत ? नव्या भाषांतर युगाची चाहूल त्यांच्या उपक्रमातून लागावी ही वसाहतवादी इतिहासाची पुनरावृत्ती तर नव्हे ? मुक्त अर्थव्यवस्थेत ही लाट देशी भाषातील साहित्य गिळंकृत तर करणार नाही ? या लाटेत झाडे मोडणार, लव्हाळे वाढणार. तेव्हा 'आपुल्या जातीचा' भाषांतरकार लेखकाला भेटेल का ? त्याची ओळख कशी पटणार ? भारतीय भाषांतील साहित्याचे इंग्रजीकरण ही पाश्चात्यीकरणाची पुढची पायरी तर ठरणार नाही ? त्यात भारतीयत्व आणि मराठीपण किती व कसे टिकणार ? असे अनेक प्रश्न सतावू लागले. एकीकडे विक्रम शेठ आणि दुसऱ्या टोकाला 'उचल्या' आणि 'उपरे'. **'सेलेबल बॉय'** च्या जोडीला **सेज तुकाराम** पेंग्विनच्या चोचीत लोंबकळताना दिसतात. नव्या भाषांतर युगाची चाहूल अशी अस्वस्थ करणारी आहे. भविष्यात काय दडलेय कुणी सांगावे ?

(ए-१, स्टाफ क्वॉर्टर्स, गोवा विद्यापीठ, ४०३२०३.)

डॉ. प्रल्हाद अ. कुलकर्णी

# मॉमची ज्युलिआ : स्वत्वाचा शोधप्रवास

विल्यम सॉमरसेट मॉम (१८७४-१९६५) म्हणजे विसाव्या शतकातील एक समर्थ साहित्यिक. साहित्याच्या विविध प्रकारांत स्वैर संचार करून कादंबरी लेखनात रमलेला मॉम आपल्या समर्थ लेखनशैलीने कादंबरी प्रकाराला एक वेगळा आशय देऊन जातो.. त्याच्या थिएटर या कादंबरीतदेखील याचे प्रत्यंतर पाहावयास मिळते.

मॉमची थिएटर वाचताना एक झपाटलेल्या व्यक्तिमत्त्वाचा जीवनपट समोर उलगडत जाताना दिसतो. मॉमची ही कादंबरी रंगभूमीवर सतत प्रकाशझोतात राहिलेल्या आणि नावलौकिक मिळविलेल्या स्त्री कलाकाराची कथा मांडत जाते. या कादंबरीतील इतर प्रमुख व्यक्तिरेखा म्हणजे मायकेल गोसेलिन-हा स्वतः रंगभूमीवरचा कलाकार, देखणा आणि ज्युलिआचा पती; टॉमस फेनेल-नाटकाची आवड असणारा, लाजाळू हाच ज्याचा गुण व्हावा, ज्युलिआचा प्रियकर; लॉर्ड चार्लस् टॅमर्ले– मध्यम वयाचा, प्रसंगी आपल्या पत्नीचा त्याग करून ज्युलिआवर मनापासून प्रेम करणारा, तिला आनंदात पाहणारा आणि तिच्या नकारांतदेखील समाधान मानणारा ज्युलिआचा मित्र; डॉली-वयस्कर. नाट्यक्षेत्राची आवड असणारी, ज्युलिआवर प्रेम करणारी, मायकेलला सिडॉन्स थिएटर चालविण्यास घेण्यास आर्थिक मदत देणारी स्त्री; रॉजर-ज्युलिआचा मुलगा. या साऱ्यांच्या माध्यमांतून कादंबरीची कथा विस्तारत जाते आणि ज्युलिआ लँवर्टच्या व्यक्तिमत्त्वाचे अनेक पदर उलगडत जातात.

ज्युलिआ लहानपणापासूनच सेंट मालो (St. Malo) येथील आपल्या मावशीकडे राहत असते. इथे ती फ्रेंच भाषेवर प्रभुत्व मिळविते. लहान वयातच तिचा एका रंगभूमीवरील स्त्री कलाकाराशी परिचय घडतो. ही वयस्कर कलाकार ज्युलिआला आपल्या रंगभूमीवरील अनुभवांचे कथन करते आणि तिला नाट्यक्षेत्रातले पहिले धडेच देते. वयाच्या सोळाव्यां वर्षी ती 'The Royal Academy of Dramatic Art' या संस्थेत दाखल होते आणि येथील सर्व मान-सन्मान, पारितोषिके प्राप्त करून घेते आणि ती हळूहळू रंगभूमीवर पदार्पण करते. जिमी लँगटन या नाट्य निर्मात्याला ज्युलिआचा शोध लागतो. तो तिच्या कलागुणांचे कौतुक करून ती एक समर्थ कलाकार असल्याचे तिला सांगतो. तिचा अनुभव आणि अभिनय पाहून तो म्हणतो, 'The face of an actress must show every thought that passes through the mind'. [१]

ज्युलिआ यामुळे सुखावते. वर्षातून किमान वीस एक भूमिका तिला देण्याचे तो

सांगतो आणि मिडलपूल येथील जिमी लँगटनच्या थिएटरसाठी तो तिच्याशी तीन वर्षांचा करार करतो. इथेच मायकेल गोसेलिन या सुंदर, तरुण कलाकाराशी तिची गाठ पडते. 'Ghosts' या नाटकात ती दोघेही भूमिका करत असतात आणि त्याच्याबद्दल तिला वाटणाऱ्या आकर्षणाचे प्रेमात रूपांतर होते. ज्युलिआ त्याच्या सौंदर्याचे मनसोक्त कौतुक करत असली, तरी मायकेल हा पूर्ण वास्तव जाणणारा आहे. आजचे सौंदर्य उद्या टिकणार नाही याची पूर्ण जाणीव त्याला आहे. म्हणूनच एखाद्या नाट्यगृहाचे व्यवस्थापन आपल्याला मिळावे असे त्याला वाटते. त्यामुळेच जेव्हा एक अमेरिकन नाट्यनिर्माता त्याला आपल्याकडे येण्याचे आमंत्रण देतो तेव्हा तो त्याचा त्वरित स्वीकार करतो. पैसा हा त्याचा देव आहे. पैसा साठविण्याकडे त्याचा कल आहे. आपल्यापासून दोन वर्षांसाठी तो दूर जातोय याचे ज्युलिआला मनस्वी वाईट वाटते. मायकेल एक वर्षाने परत येतो. त्याने परत जिमी लँगटनच्या मिडलपूल येथील नाट्यगृहात यावे असे ज्युलिआला वाटत नाही. ती मायकेलबरोबर कुठेही जायला तयार असते. पुढे युद्ध सुरू झाल्यावर मायकेल लष्करात सामील होतो आणि ज्युलिआने रंगभूमीवर काम करून खूप पैसा मिळवावा असे तो तिला सांगतो. त्याच्या अनुपस्थितीत डॉली तिला आधार देते आणि पुढे मायकेलच्या नाट्यगृहाच्या व्यवस्थापनाचे स्वप्न साकार करण्यात ती त्याला मदत करते.

ज्युलिआ मायकेलच्या आईच्या आमंत्रणाचा स्वीकार करून चेल्टनहॅम येथे जाते. तिथल्या वातावरणाशी ती मिसळून जाते. मायकेल तिला मागणी घालतो आणि नंतर लग्नही होते. युद्धाच्या रणधुमाळीत मायकेल गुंतलेला असतानाचा इकडे रंगभूमीवर ज्युलिआ आता एक समर्थ कलाकार म्हणून नावारूपाला येते आणि कदाचित यामुळेच असेल; पण मायकेलबद्दल ती आता उदास राहू लागते. तो युद्धाहून परत आल्यावरदेखील ती उदासच राहते.

तिच्या जीवनात लॉर्ड चार्लस् टॅमरले म्हणजे प्लेटॉनिक प्रेमाचे एक प्रतीकच ठरतो. त्याच्या पत्नीमुळेच तो प्रथम ज्युलिआच्या सहवासात येतो आणि हा सहवास नंतर चार्लस्‌च्या पत्नीला दूर ढकलतो. ज्युलिआशी एकनिष्ठ राहिलेला चार्लस्‌सारखा दुसरा कोणीही नाही. परंतु ज्युलिआने त्याला कधीच मनापासून स्वीकारलेले नाही. पण तरीही ती आनंदी राहावी, तिचा सहवास लाभावा म्हणून हा लॉर्ड सतत प्रयत्नशील असतो आणि आयुष्याच्या एका वळणावर ज्युलिआ जेव्हा मनाने उद्ध्वस्त होते तेव्हा मात्र तिला लॉर्डस्‌चीच प्रामुख्याने आठवण होते. कदाचित लॉर्ड चार्लस् हा, 'He was everything to her, her friend, her adviser, her confidant the man she could rely on in emergency or go to for comfort in any disappointment.' [२]

ज्युलिआच्या जीवनात आणखी एक वादळ येते आणि या चक्री वादळात तिच्या जीवनाचे सारे संदर्भच बदलून जातात. ती पार कोलमडून पडते. टॉमस फेनेल हे वादळ

घेऊन येतो आणि ज्युलिआच्या जीवनाचा सारा रंगच बदलतो. मायकेलच्या अकौंट्स ऑफिसमधील सामान्य कारकून, थोडा लाजाळू वाटणारा आणि ज्युलिआची नाटके बघणारा हा तरुण. ती ऑफिसमध्ये प्रथम त्याला पाहते आणि नंतर तो तिच्या जीवनाचा एक अविभाज्य भाग बनतो. त्याच्या सहवासात ती सारेच विसरते. शारीरिक सुखापासून तो त्याच्या सहवासातील सर्व आनंद ती मुक्तपणाने लुटत जाते. टॉमस सतत जवळ राहावा म्हणून आपला फ्लॅट त्याला राहण्यासाठी द्यावा असे ठरविते. त्याच्या असलेल्या कर्जाची तिला माहिती असते आणि ते ती फेडण्यासाठी मदत करते. त्याला जणू ती विकतच घेते. सुट्टीसाठी आलेल्या रॉजरबरोबर राहण्यासाठी टॉमसला बोलवावे अशी इच्छा जेव्हा मायकेल व्यक्त करतो, तेव्हा मनातून तिला खूप आनंद झालेला असतो. या निमित्ताने टॉमस सतत आपल्या सहवासात राहील असे तिला वाटते; पण रॉजरला टॉमसचीच मैत्री भुलवून जाते. एकत्र खेळणे, मजा करणे यांत गुंतून पडल्यामुळे टॉमसचे ज्युलिआबद्दलचे आकर्षण कमी होत जाते. रॉजर आणि टॉमस आता जोन आणि जिल या दोन सुंदर मुलींच्या मध्ये गुंततात. याची कल्पना रॉजरकडून ज्युलिआला येते, तेव्हा ती पूर्णपणे उद्ध्वस्त होत जाते.

ॲव्हिस क्रायटन या मुलीबद्दल रॉजर आणि टॉमस दोघेही तिला बोलतात. रंगभूमीवर काम करणारी ती एक उदयोन्मुख कलाकार असते. ज्युलिआसारख्या यशस्वी कलाकाराचे मार्गदर्शन लाभावे अशी तिची इच्छा असते. मायकेलच्या सिडॉन्स थिएटरमध्ये काम मिळावे असे तिला वाटत असते. तिच्यात टॉमस गुंतल्याचे पाहून ज्युलिआ बेचैन होते. कारण तो तिच्या जीवनातले सर्वस्व असतो. टॉमसमुळे ॲव्हिसला भेटण्याचे ती मान्य करते, नाहीतर तो नाराज होईल आणि अशी भीती तिला वाटत असते. पण त्याच वेळी ज्युलिआला वाटते की, ॲव्हिस टॉमसला फसवते आहे. त्याचा वापर करून ती सिडॉन्स थिएटरमध्ये प्रवेश मिळविणार आणि शेवटी टॉमसला दूर लोटणार. पण ती टॉमसला हे सारे सांगू शकत नाही. फक्त ती त्याला त्यांच्या शारीरिक संबंधासंबंधी जेव्हा विचारते तेव्हा टॉमस म्हणतो की, ॲव्हिस त्यातली नाही. मी तिचा आदर करतो. यामुळे तर ज्युलिआला अधिकच वाईट वाटते. पण आपली वेदना ती व्यक्त करू शकत नाही. आपल्या मनःशांतीसाठी ती आईकडे जाण्याचे ठरविते. तिला रोज लॉर्ड चार्लस् टॅमरले प्रेमाने ओथंबलेली प्रेमपत्रे लिहितो. ती वाचल्यानंतर त्याचे भावविश्व पूर्णपणे विस्कटून टाकण्याचे पाप आपण विनाकारण केले, अशी खंत आता तिला वाटू लागते. यशाच्या गर्वाने, टॉमसच्या मोहाने आंधळी बनलेली ज्युलिआ आता अंतर्मनात डोकावू लागते. आपल्या पतीशी वागण्यातपण आपली चूकच झाली असे तिला वाटू लागते. त्याच्या उदार मनाची खोली आपल्याला कधीच कळली नाही, अशी रास्त जाणीव तिला होऊ लागते. आपल्यातल्या खुजेपणाची तिला लाज वाटू लागते.

ज्युलिआच्या जीवनात आता दुसऱ्या एका मानसिक वादळाला प्रारंभ होतो. कलाविश्वात रममाण झाल्यामुळे वास्तवाशी जवळजवळ नाते तुटलेल्या ज्युलिआला जेव्हा वास्तवाची जाणीव होते, तेव्हा तिला धक्काच बसतो. ऑस्ट्रेलियाहून परतलेल्या रॉजरला ती जेव्हा त्याच्या भविष्याशी निगडित प्रश्न विचारते, तेव्हा त्याच्या उत्तरांनी ती अधिकाधिक अंतर्मुख होऊन जाते. आई आपल्याला आवडते एवढेच तो सांगतो. त्याला आपल्या आईच्या कलागुणांचे कौतुक आहेच; पण तिच्याशी तो भावनिक एकात्म झालेला नाही. रंगभूमीवर साकार केल्या जाणाऱ्या अनेक व्यक्तिरेखांच्या भावनाविष्कारांची ज्युलिआ केवळ एक वाहक असून तिला तिचे असे स्वतःचे स्थान नाही हे तो स्पष्टपणे सांगतो. ज्युलिआ त्याला कला आणि वास्तवता यांतला फरक समजावून सांगण्याचा प्रयत्न करते. कला म्हणजे सत्य आणि सौंदर्य यांचा आविष्कार होय, असे ती सांगते. पण रॉजरने नेहमी आपल्या आईच्या वागण्यात नाट्याभिनयाचेच दर्शन घेतलेले असते. रॉजर सत्य आणि मेक बिलिव्ह यांत फरक करतो आणि आपल्या आईने आयुष्यभर 'मेकबिलिव्ह' साठीच आयुष्य वेचलेले आहे असे त्याला वाटते. यामुळे ती अंतर्मुख बनते. आत्मसंशोधन हा तिचा मार्ग ठरतो. रंगभूमीवरील प्रकाशझोतात वावरताना स्वत्वाला विसरलेली ज्युलिआ आता 'थिएटर' मध्ये पडदा पडल्यानंतरच्या अंधारात स्वत्वाच्या प्रकाशाचा शोध घेण्याचा प्रवास चालू करते. तिच्यातला कलाकार तिच्या मनाच्या अस्तित्वाचा शोध घेऊ लागतो.

ज्युलिआ लँबर्ट म्हणजे सॉमरसेट मॉमने साकार केलेली एक जिवंत व्यक्तिरेखा होय. मॉमनेच सांगितल्याप्रमाणे 'I have taken a trait here and trait there and sought to create a living person.' [३]

प्रसिद्धी, पैसा, कीर्ती यांची शिखरे पादाक्रांत करायला निघाल्यावर वास्तवाचा विसर पडल्यावर काय अवस्था होते याचेच उदाहरण म्हणजे ज्युलिआ होय. ज्या प्रेमापोटी ती मायकेलचा पती म्हणून स्वीकार करते त्याच प्रेमापोटी तो तिला, 'बोअर' वाटू लागतो आणि ती तरुण टॉमसच्या आहारी जाते. ती त्याला खरेदीच करते. आपल्यावर निरपेक्ष प्रेम करणाऱ्या लॉर्ड चार्लस्‌ला झुलवत ठेवण्यात आनंद मानते. पण शेवटी तिला आपल्यात दडलेल्या अपराधीपणाची जाणीव होते आणि वाईट वाटते. आपल्यातल्या या अंधाराचा त्याग करण्यासाठी ती सत्याच्या प्रकाशाचा मार्ग स्वीकारते. म्हणूनच सॉमरसेट मॉमची ज्युलिआ स्वत्वाचा शोध घेणारी प्रवासी वाटते.

**संदर्भ :**

1. William Somerset Maugham : Complete and unabridged work of Maugham; Heinemann/ Octopus, London, 1979, P. 558
2. . . . . ." . . . . . . P. 592

3. . . . .. .". . . . . . .P. 547

कादंबरीतील या लेखात आलेल्या व्यक्ती, स्थळांचे स्पेलिंग खाली देत आहे.

व्यक्ती : मायकेल गोसेलिन : Michael Gosselyn; रॉजर : Roger;

लॉर्ड चार्लस् टॅमरले : Lord Charles Tamerley; टॉमस फेनेल : Thomas Fennel; जिमी लँगटन : Jimmie Langton; ऑव्हिस क्रायटन : Avice Crilon; जोन आणि जिल : Joan and Jill, डॉली : De vries.

ज्युलिआ लँबर्ट : Julia Lambert

स्थळे : चेल्टनहॅम : Cheltenham; मिडलपूल : Middlepool,

सिडॉन्स थिएटर; Siddons Theatre;

(९२, अनिल निवास, शिवाजीनगर सांगली, ४१६४१६.)

---

डॉ. वीणा देव

# साहित्याचा परमभक्त

माझ्या लहानपणापासून दरवर्षी आमच्याकडे एक भेट येते. 'सुकेळयां'ची. केळीच्या सोपात घट्ट गुंडाळलेल्या सुकेळ्यांची पाकिटं, ही ती अनोखी भेट. पहिल्यांदा ही भेट आली, तेव्हाच कळलं, की, वसईला मंजुनाथ नायक नावाचे गृहस्थ आहेत, त्यांनी हा सुका मेवा पाठवलाय. त्या वेळी त्यांचं नाव माझ्या लक्षात राहिलं, कारण हा मेवा मी तेव्हा पहिल्यांदाच खाल्ला. त्याची ती आंबट-गोड चव मला आवडली. सुकेळी आणि मंजुनाथ नायक हे दोन्ही माझ्या मनात परस्परांशी जोडलं गेलं. त्यानंतर त्यांच्यासंबंधी एकेक तपशील कळत गेला तसं, त्यांचं माझ्या मनातलं चित्र हळूहळू ठळक होत गेलं.

मी त्यांना पहिल्यांदा पाहिलं, तेव्हा डोळयांत भरली, त्यांची भरपूर उंची, भरदार अंगयष्टी आणि कुतूहल असलेला चेहरा. त्यांचा पोषाख, बोलणं ह्याची छाप काही माझ्यावर पडली नव्हती. मात्र ज्यांच्यासाठी ते आले आहेत, त्या आप्पांविषयी ह्या माणसाच्या मनात आदर आहे, प्रेम आहे हे जाणवत होते. आप्पांकडे ते आप्पांच्या नवीन प्रसिद्ध झालेल्या पुस्तकावर लेखकाच्या सह्या घ्यायला आले होते. आप्पा त्यांचे आवडते साहित्यिक, तोपर्यंत प्रसिद्ध झालेलं आप्पांचं प्रत्येक पुस्तक त्यांच्याकडे होतंच. इतकंच नव्हे, तर मराठीतली अनेक महत्त्वाची पुस्तकं त्या वेळी त्यांच्याकडे होती.

लहानपणापासून त्यांना हा वाचनाचा नाद आहे. नायक कुटुंब कारवारातलं. व्यवसायाच्या निमित्तानं वसईला आलेलं. पण मंजुनाथना लहानपणापासून नाद लागला, तो साहित्यवाचनाचा. मराठी भाषेवर त्यांचे तेव्हापासून अपार प्रेम आहे. पाचवीत असल्यापासून ते वडिलांकडून खाऊऐवजी पुस्तकं घेत. हॉटेलचा व्यवसाय करणाऱ्या वडिलांनीही आपल्या या मुलाच्या अनोख्या आवडीला दाद दिली, आणि त्यांना भरपूर मराठी पुस्तकं विकत घेऊन दिली. सानेगुरुजींचं 'पुनर्जन्म' त्यांनी वाचलं, आणि त्या लेखनानं असा खोल संस्कार त्यांच्या मनावर केला, की, ते मराठी वाङ्मयाचे परमभक्त झाले. मग त्यांनी सानेगुरुजींची सगळी पुस्तकं मिळवून झपाटल्यासारखी वाचली, आणि त्यांचं कुतुहल अधिकाधिक विस्तारत गेलं. आपल्याला चांगलं वाचायला कुठं मिळेल, अशा वासावरच ते राहू लागले. सखाराम गावडे नावाच्या किराणा मालाचं दुकान असलेल्या मित्राकडे त्यांना 'किर्लोस्कर'चे अंक वाचायला मिळाले. अन् त्यातून खांडेकर, फडके, माडगूळकर बंधू, दाण्डेकर, रणजित देसाई ह्यांच्या लेखनाशी परिचय झाला.

वसईला मॅट्रिकपर्यंत शिक्षण झाल्यावर त्यांना व्यवसायासाठी शिक्षण थांबवावं लागलं. पण पुढं त्यांनी मुंबईच्या साहित्यसंघातर्फे होणाऱ्या मराठीच्या तीन परीक्षा दिल्या. तिथं वा. रा. ढवळे, रा. भि. जोशी ह्यांच्यासारखे उत्तम शिक्षक लाभले. हे शिक्षण त्यांच्या वाचनाच्या आवडीला पूरक ठरलं. त्यांच्या वाचनाला एक दृष्टी मिळाली. वसईच्या डॉ. वर्टीचंही त्यांना मार्गदर्शन लाभलं. अन् त्यांनी ठरवलं, की, हॉटेल व्यवसाय तर करायलाच हवा. कारण त्यावर आपलं अन् आपल्या मोठ्या कुटुंबाचं पोट अवलंबून आहे. पण हे साहित्यातलं विश्व हे आपलं, आपल्यापुरतं विश्व आहे. त्यात रमण्यानं आपल्याला लाभणारा अवर्णनीय आनंद आपण पुरेपूर उपभोगायचा. ह्यासाठी मग त्यांनी काय काय खटपटी केल्या. एक तर पुस्तकं विकत आणून त्या त्या लेखकांना त्यासंबंधी पत्र लिहायचं. ह्यामुळे त्यांच्या अनेक लेखकांशी ओळखी झाल्या. लेखकांकडून आवर्जून उत्तर आल्यामुळं, किंवा कधी मागवल्यामुळेही, त्यांच्याजवळ असंख्य पत्रं साठली. तेवढ्याच स्वाक्षऱ्याही साठल्या. आज वयाच्या चौसष्ठीला त्यांच्याकडे मराठीतल्या लेखकांची हजारो पत्रं आहेत. त्यांतल्या अनेकांचा स्नेह मंजुनाथ नायकांनी गेली तीस-चाळीस वर्षं जपला आहे.

लेखकांच्या ओळखी व्हाव्यात, त्यांचा सहवास लाभावा, ह्यासाठी ते अनेक युक्त्या करीत. एरवीचा स्वभावातला संकोचीपणा ते इथे बाजूला ठेवीत. वसईला व्याख्यानमालेच्या निमित्तानं येणाऱ्या लेखकांना आणाय-पोचवायची जबाबदारी ते स्वतःकडे घेत. त्यामुळे गप्पागोष्टी करायला वेळ मिळे. मुळात ह्या लेखकांवर त्यांचं मनापासून प्रेम असल्यामुळे त्यांच्यासाठी धावपळ करणं, त्यांना खाऊ घालणं, छोट्या-मोठ्या भेटी देणं ह्यात त्यांना विलक्षण आनंद वाटे. ह्या लेखकांपैकी पु. ल., प्रभाकर पाध्ये, कुसुमाग्रज, उमाकांत ठोंबरे, फडके, खांडेकर, रणजित देसाई, र. वा. दिघे, सुमती क्षेत्रमाडे, बाळ सामंत अशी कितीतरी नावं सांगता येतील. मला आठवतं, आप्पांच्याकडे त्यांचं येणं-जाणं सुरू झाल्यावर मग आप्पांचे स्नेही बाबासाहेब पुरंदरे, महादेवशास्त्री जोशी ह्यांनाही त्यांनी जीव लावला. ह्या साऱ्या साहित्यिकांवरच्या मूळ लोभाचं कारण मात्र त्यांनी कायम ठेवलं– 'वाचन'. लक्षणीय पुस्तक बाजारात आलं रे आलं की ते वाचायचं अन् लेखकाला कळवायचं. आपल्या लेखनासंबंधीची ही आस्था कोणत्या लेखकाला सुखावणार नाही ?

साहित्यविषयक कार्यक्रमांना आवर्जून हजर असायचं, हा त्यांचा आवडता विसावा. वसई खरं तर मुंबईत होणाऱ्या कार्यक्रमांच्या दृष्टीनं आजही दूर वाटते. पण गेली कित्येक वर्षं मंजुनाथ ह्या कार्यक्रमांना आवर्जून उपस्थित राहताहेत. व्याख्यानमाला, पुस्तकप्रदर्शनं, प्रकाशनसमारंभ, मुलाखती, कवितावाचन सर्व प्रकारच्या कार्यक्रमांत त्यांना रस आहे आणि एखाद्या नातेवाईकाकडच्या लग्नसमारंभाला ज्या प्रेमानं आणि कर्तव्यबुद्धीनं माणसं जातात, तसे ते साहित्य संमेलनासकट सगळीकडे जात असतात.

अनेकांना प्रश्न पडतो, उत्तम चाललेल्या हॉटेल व्यवसायातून ते एवढा वेळ कसा काय

काढतात ? मुळात आता त्यांच्याकडे आठ-नऊ हजार पुस्तकांचा संग्रह आहे. पाचवीपासून संग्रहाची सुरुवात झालीय. ही सर्व पुस्तकं त्यांनी वाचलेली आहेत. त्यांना चांगली वेष्टनं घालून चांगली सांभाळली आहेत. हे वाचणं, सांभाळणं, वाढवणं ह्याला वेळ कसा काढला ? ह्या प्रश्नाचं एक उत्तर असं की, भल्या पहाटे उठून हॉटेलमध्ये गल्ल्यावर बसायचं. तेव्हा गर्दी कमी असते. वाचून होतं. नंतरही दिवसा-रात्री शक्य होईल तेव्हा वाचन चालू. मला वाटतं, व्यवसायासाठी त्यांच्या मेंदूची यांत्रिकता उपयोगी पडली असावी. एरवी चहा-फराळाची धावपळ करता करता त्यांचं मन वाचनात कसं गुंतलं असेल ?

निमित्तानिमित्तानं हिंडणं खूप झालं. त्या त्या गावी लेखकांना आवर्जून भेटत. साहित्य कुलातल्या कर्तबगार व्यक्तींचं त्यांना अपार कौतुक. त्यांचं बोलणंही सतत त्यावरच असतं. आज एवढी वर्षं ते आमच्याकडे येताहेत, पण आले की बोलण्याचा विषय साहित्य आणि साहित्यिक. पत्रांमध्येही तेच. मला आठवतं, त्यांच्या पत्नी जेव्हा खूप आजारी झाल्या, तेव्हाच्या पत्रात फक्त त्यांचा सूर दुःखाचा होता. तोही मुसंडी मारून वर आलेला असावा. एरवी त्यातही वाङ्मयीन वार्ता असायच्याच.

अनेकांचा स्नेह लाभल्यानं बोलण्याजोगं खूप. पूर्वी कमी बोलत. आता बोलायला आवडतंही खूप. पण गप्पांचं केंद्र साहित्यविश्व. स्नेह्यांच्या आवडी-निवडी प्रेमानं जपल्या असूनही त्यांच्या खाजगी जीवनात डोकावण्याची, आणि साहित्यिकांच्या मसालेदार हकिगती सांगण्याची वृत्ती मला आढळली नाही. उलट एखाद्या साहित्यिकाच्या दुखण्यानं हळवा झालेला, किंवा वाङ्मयीन वादात गुंतलेल्या साहित्यिक मित्रांची मनापासून चिंता करणारा असा हा माणूस आहे. इतकं वाचलेलं, पाहिलेलं, ऐकलेलं असूनही आपण कोणी विशेष जाणकार आहोत, असा आव त्यांच्या वागण्या-बोलण्यात नसतो. मधुकर वृत्तीनं आनंद मिळवीत राहायचा त्यांचा स्वभाव आहे.

साहित्याच्या ह्या आवडीला पूरक ठरलेला त्यांचा आणखी एक नाद, संगीत ऐकण्याचा. दूर राहण्यामुळे सतत मैफलींना जाणं शक्य होत नाही म्हणून त्यांनी आपल्याकडे शास्त्रीय, उपशास्त्रीय संगीताचा प्रचंड साठा केलेला आहे. भारतातल्या उत्तमोत्तम गायकांच्या वीस हजारांवर ध्वनिमुद्रिका, ध्वनिफिती त्यांनी जमवल्या आहेत. आता तर उत्तम, दुर्मिळ, अभिजात अशा चित्रपटांच्या ध्वनिचित्रफितीही त्यांनी विकत घेतल्या आहेत. ह्या साऱ्याचा मनःपूत आस्वाद ते तर घेतच असतात. पण तो आनंद आपल्या मित्रांनीही लुटावा, ह्यासाठीही त्यांची धडपड चालू असते. मला आठवतं, प्रभात-चित्रांचा संच बाजारात आल्यावर ते तो माझ्याकडे घेऊन आले होते. आणि 'तू बघ, अन् मग मला पाठवून दे' म्हणून मोठ्या थैलीतल्या त्या ध्वनिचित्रफिती माझ्याकडे ठेवून गेले होते. असं आनंद वाटणं चालू असतं.

पुस्तकांचंही असंच. पुस्तकविक्रेत्यांशी आता त्यांचा इतक्या वर्षांचा परिचय आहे. ते

मंजुनाथना अनेक सवलती देतात. मंजुनाथही कोणी नवे मनापासून वाचणारे, पुस्तकं खरेदी करणारे भेटले की त्यांना त्या सवलतीचा लाभ करून देतात. असा दिव्यानं दिवा लावण्यात त्यांना आनंद वाटतो.

ह्या सर्व साहित्यकलांच्या भक्तीची फळंही त्यांना कशी लाभतात हे काही वेळा मी पाहिलं, ऐकलं आहे. आपण लिहिलेलं नवं पुस्तक हातात आलं की आप्पांना मंजुनाथांची कशी आठवण होत असे, हे अनुभवलेलं आहे. आप्पांकडून पुस्तक भेट मिळालं की मंजुनाथांच्या चेहऱ्यावर फुललेलं सार्थकतेचं हसू न्याहाळलं आहे.

'सवाई गंधर्व संगीत महोत्सवा'च्या रात्री कित्येक वर्षं त्यांनी कशा जागवल्या, अन् खूप तृप्ती कशी अनुभवली, हे मला ठाऊक आहे. भीमसेनजींचा स्नेह त्यांनी कसा संपादन केला, अन् सवाई गंधर्वची तिकिटं त्यांच्यासाठी कशी राखून ठेवली जातात, हे ऐकलं आहे. अस्सल रसिकतेची साक्ष पटल्यावाचून हे घडणार नाही. 'राजा शिवाजी'मध्ये पुलंच्या झालेल्या सत्काराचं निमंत्रण किती आवर्जून स्वतः पुलंकडून प्रेमानं मंजुनाथांना आलं, हे मला मंजुनाथांनी किती उसळत्या आनंदानं सांगितलंय, ही सारी श्रीमंतीही मंजुनाथांना लाभली आहे. पैशापेक्षा त्यांना ही समृद्धी फार फार मोलाची वाटते.

आज त्यांची प्रकृती तितकीशी साथ देत नाही. पूर्वीचं धिप्पाडपण कमी झालंय. प्रकृतीचे अनेक त्रास आहेत. पण त्यांचं साहित्यप्रेम यत्किंचितही उणावलेलं नाही. त्यात थोडी भरच पडलीय. अनेक साहित्य संस्थांना, नाट्यसंस्थांना त्यांनी देणग्या दिल्या आहेत. अनेक मासिकांचं आजीव सदस्यत्व स्वीकारलंय. आग्रहानं इतरांनाही स्वीकारायला लावलंय.

आता मनात येतंच की त्यांच्या ह्या अमोल धनाचा वारसा सांभाळला जाईल ? उत्तर अवघड दिसतंय. 'माझं वाचन माझ्याबरोबर संपणार' अशी भावना आज त्यांच्या मनात आहे. मुळातच भावनाशील असलेलं त्यांचं मन ह्या विचारानं अधिक हळवं होतं. आपणही अस्वस्थ होतो. पण वाटतं, कारवाराशी नातं असलेला हा माणूस आपल्या 'मऱ्हाठी'शी कसा एकजीव झाला आहे. तिच्या लेण्यांचा आनंद लुटतो आहे. वाटतो आहे, हा दुर्मिळ आनंद ते उपभोगू शकले, हे महत्त्वाचं नाही का ?

पैसा कमी होता तेव्हा, अन् भरपूर मिळायला लागल्यावरही त्यांचा ध्यास एकच राहिलाय. साहित्यप्रेम ! ह्यामुळे आनंदाचे कितीतरी तरंग त्यांनी अनुभवलेले आहेत. हे त्यांचं निराळेपण आहे. त्यांची वाङ्मयीन दैवतं, त्यांची वाङ्मयीन तीर्थक्षेत्रं त्यांचं जीवन उजळून टाकीत आहेत.

वसई स्टेशनला उतरल्यावर स्टेशनच्या अगदी जवळ असलेल्या 'हॉटेल वसंत'मध्ये आजही मंजुनाथ एखादं ताजं पुस्तक वाचताना दिसतील. अन् तुम्ही गेलात की आधी तुम्हाला विचारतील, "वाचलंत हे ? जरुर वाचा !"

(मानसी, तुळशीबागवाले कॉलनी, पुणे ४११००९.)

डॉ. वसंत स. जोशी

# ज्ञानेश्वरीची एकनाथसंशोधनपूर्व प्रत

'ज्ञानेश्वरी' या मराठीतील श्रेष्ठ ग्रंथाच्या नित्यनूतनत्वामुळे तो अभ्यासक आणि सांप्रदायिक यांच्या जिव्हाळ्याचा, प्रेमाचा विषय बनला आहे. 'ज्ञानेश्वरी'ची प्राचीनतम प्रत मिळवून शब्द आणि अर्थदृष्ट्या ज्ञानेश्वरांच्या जवळ जाण्याचे प्रयत्न अनेक विद्वान संशोधकांकडून गेल्या शतकभर होत आले आहेत. राजवाडे, माडगावकर आणि डॉ. हर्षे यांच्या प्रतींच्या काळाबद्दल संशोधकांत मतभेद आहेत. कारण तसा स्पष्ट कालोल्लेख कोणत्याही प्रतीत नाही. राजवाडे ज्ञानेश्वरीच्या यथामूल मुद्रणाबाबत जाणकारांनी शंका व्यक्त केल्या आहेत. राजवाड्यांनी स्वतःच्या मतानुसार मूळ प्रतीत बदल केले असण्याची शक्यताही व्यक्तविली गेली आहे. दुर्दैवाने मूळ प्रत नष्ट झाल्यामुळे/केल्यामुळे प्रत्यंतर पुरावा पाहण्याचे साधनही नाहीसे झाले आहे. डॉ. हर्षे आपली प्रत शके १२७२ मधील मानतात. तथापि कालोल्लेखातील शतंस्थानीचा आकडा उडून तिथली जागा पांढरी पडलेली असल्यामुळे ती प्रत शके १५७२ ची असल्याचे संशोधकांनी सप्रमाण सिद्ध केले आहे. शाळिग्राम प्रतीतील शके १५७२ च्या उल्लेखामुळे तीही प्राचीन म्हणता येत नाही. आज सर्वत्र प्रसृत असलेली एकनाथ संशोधित-संपादित शके १५०६ मधील असली, तरी तिचीही मूळ प्रत उपलब्ध नाही.

या पार्श्वभूमीवर शके १४९० असा स्पष्ट कालोल्लेख असलेली एकनाथ-संशोधित प्रतीच्या पूर्वीची 'ज्ञानेश्वरी'ची हस्तलिखित प्रत प्राचीन मराठी साहित्याचे व्यासंगी संशोधक प्रा. पां. ना. कुलकर्णी यांना कोल्हापुरामध्ये उपलब्ध झाली. ती संशोधित-संपादित प्रत कोल्हापूरच्या शिवाजी विद्यापीठाने १९९३ मध्ये प्रकाशित केली. प्रस्तुत प्रतीत एकनाथांच्या ओव्या नाहीत. तथापि 'सके बारा शते बारोत्तरे। तैं टीका केली ज्ञानेश्वरें। सच्चिदानंदु बाबा आदरें। लेखकु जाला ॥ १७९५ ॥' ही ओवी आहे आणि शेवटी या पोथीची सिद्धनाथ परंपरा सांगणारी ओवी आहे. ग्रंथसमाप्तीनंतर त्या प्रतीच्या लेखनाचा काल आणि लेखक यांच्या उल्लेखाचा पुष्पिकेतील मजकूर पुढीलप्रमाणे आहे :

॥ शके १४९० विभव संवत्सरे पौषेमासे शुद्धे पक्षे चतुर्दश्यां मंदवासरे प्रतिष्ठाने क्षेत्रदेवताग्रहे ग्रंथ संपूर्णमस्तु ॥ गोविंदु लेखकु ॥

प्रा. पां. ना. कुलकर्णी यांनी पिल्ले जंत्रीप्रमाणे हा कालोल्लेख अचूक असल्याचे स्पष्ट केले आहे. त्या दिवशी इंग्रजी दिनांक १ जानेवारी १५६९ असा येतो. प्रस्तुत हस्तलिखिताच्या प्रारंभ पृष्ठावर 'श्रीमद्‌भगवद्‌गीता। टीका ज्ञानेश्वरी' असा स्पष्ट निर्देश आहे. त्यामुळे एकनाथपूर्वकाळातच 'ज्ञानेश्वरी' हे नाव प्रचलित असल्याचे दिसून येते. सिद्धनाथ परंपरेतील या प्रतीचे लेखन कोणा 'गोविंदु' नावाच्या लेखकूने पैठण येथील 'क्षेत्रदेवतागृहा' त केलेले आहे. मात्र त्याच्याविषयी अन्य कोणतीही माहिती उपलब्ध नाही. त्याचा अधिकार आणि स्थान यांची माहिती त्याच्या प्रतीची अधिकृतता सिद्ध करण्यास उपयुक्त ठरली असती. तथापि ती नसल्याने हस्तलिखितास गौणत्व येते असे नाही. हा गोविंदु कदाचित सिद्धनाथ परंपरेतील एखादा अनुग्रहित असू शकेल किंवा एखादा व्यावसायिक लेखकूही असू शकेल. त्याने या हस्तलिखितात केलेल्या शके १४९० या स्पष्ट कालोल्लेखामुळे आजवर उपलब्ध झालेल्या 'ज्ञानेश्वरी' च्या हस्तलिखित प्रतीत ही प्राचीनतम असल्याचे निश्चित होते. या प्रतीतील चौदा पाने गहाळ झाल्यामुळे त्यांवरील मजकूर नव्या पांढऱ्या कागदावर सतरा पानांत लिहिण्यात आला आहे. त्यामुळे या प्रतीत आणखी एकाचा 'हातभार' लागल्याचे दिसून येते.

'ज्ञानेश्वरी' च्या या उपलब्ध प्राचीन प्रतीचे संपादन प्रा. पां. ना. कुलकर्णी यांनी वीस वर्षे खपून परिश्रमपूर्वक आणि साक्षेपाने केले आहे. आपल्या संशोधनाच्या अनुषंगाने विविध विषयांची चर्चा करणारी १४३ पृष्ठांची प्रदीर्घ प्रस्तावना त्यांनी लिहिली आहे. शेवटी शब्दकोश आणि पाच परिशिष्टे जोडली आहेत. प्रदीर्घ प्रस्तावनेत हस्तलिखितांच्या सच्चिदानंद, सिद्धनाथ, जनार्दनस्वामी, एकनाथ, रघुनाथ शिष्य भास्कर, जनी जनार्दन, गोविंद बरवे, गोपाळाश्रम स्वामी, निरंजन रघुनाथ यांच्या परंपरांची (वंशवृक्षांची ?) सविस्तर चर्चा आहे. मुद्रित ज्ञानेश्वरीच्या प्रतींचा मागोवा आहे. राजवाडे, बनहट्टी इत्यादींच्या संशोधनपद्धतीची परखड समीक्षा आहे. हस्तलिखितांच्या संपादनाची पद्धती आणि प्रत्येक अध्यायातील काही पाठभेदांची चर्चा उर्वरित भागात आली आहे. पाठचिकित्सेसाठी आवश्यक त्या नोंदी, उदा. पोथीच्या पानाचे स्वरूप, लांबी, रुंदी, जाडी, अक्षरसंख्या, अनुक्रमांक लिहिण्याची पद्धत, काना-मात्रा-वेलांटी देण्याची पद्धत, बोरूने केलेल्या लेखनाचे स्वरूप, शाई (काळी, फिकट, गेरूचा वापर इ.) मूळ प्रतीत केलेल्या सुधारणांचे स्वरूप वगैरे बारकाव्याने दिल्या आहेत.

या हस्तलिखिताची यथामूलता दृढ करण्यासाठी मूळ प्रतीतील चाळीस पृष्ठांचे ठसे संहितेतच देण्यात आले आहेत. (शिवाय मूळ हस्तलिखित प्रत शिवाजी विद्यापीठाच्या स्वाधीन करण्यात आली आहे) त्यामुळे सत्याचा अपलाप होण्याच्या शंकेस स्थान राहिलेले नाही. तळटीपांतून प्रत्येक अक्षराच्या काना-मात्रा-वेलांटी इतील बदलांचे स्वरूप काटेकोरपणे नमूद केले आहे. त्यामुळे एखाद्या भक्कम इमारतीच्या चिरेबंदी बांधणीचे

स्वरूप या मुद्रित आवृत्तीला लाभले आहे. त्यात संपादक स्वतः मूळ हस्तलिखितात कोठेही न डोकावता तटस्थपणे नोंद करीत राहतात, ही महत्त्वाची गोष्ट आहे. पोथीतील स्पष्ट कालोल्लेख आणि लेखनपद्धतीची प्राचीनता यांच्या अधिकृततेमुळे संपादकांच्या ठायी निर्माण झालेला आत्मविश्वासच त्यातून प्रगट होतो. त्यामुळे त्यांना अभिनिवेश बाळगण्याचे आणि प्रतीचे जुनेपण सिद्ध करण्यासाठी आग्रह धरण्याचे कारणच पडत नाही. ही प्रत सुमारे चारशे वर्षे वापरात असल्यामुळे नंतरच्या काळातील वाचकांनी, मूळ संहितेत बदल न करता बाजूस अनेक शोध घातलेले दिसतात. या सर्व शोधांचे, दुरुस्त्यांचे, लेखनपद्धतीचे स्वरूप लक्षात येण्यासाठी, दिलेले काही पानांचे ठसे उपयुक्त ठरतात. संपादकांच्या सूक्ष्म निरीक्षणाचा, साक्षेपाचा, परिश्रमशीलतेचा प्रत्यय सर्वत्र येतो. 'नामूलं लिख्यते किंचित्' अशी प्रतिज्ञाच त्यामागे असल्याचे जाणवते.

साहित्याच्या पुनर्लेखनाविषयी प्रा. कुलकर्णी प्रस्तावनेत म्हणतात, 'उच्चाराचे' लिपीत संकलन (येथे दोन व्यक्ती हव्यात), लिपीचे लिपीत पुनर्लेखन (येथे एका व्यक्तीचे काम असते) आणि लिपीच्या उच्चारणानंतर लिपीत लेखन (येथेही दोन व्यक्ती पाहिजेत) या तीन प्रकारांनी साहित्याचे पुनर्लेखन होत असते. (प्र. पृ. आठ) चर्चेच्या ओघात त्यांनी पाठचिकित्सेविषयी काही महत्त्वाची विधाने केली आहेत. उदा. जेवढी प्राचीनता अधिक तितकी विकृती कमी...', 'संशोधनात विधानांना महत्त्व नसून पुराव्याला आणि अन्य अभ्यासकांकडून मिळणाऱ्या मान्यतेला मोल असते.' 'एक वेळ मान्यता नाही मिळाली तरी चालेल, पण पुराव्याचा अस्सलपणा तर टिकवलाच पाहिजे.' 'व्यक्तीचे रंगगंध पाठांना चिकटू नयेत.' 'प्रत्येक परंपरेतील आद्यप्रत त्या परंपरेच्या दृष्टिकोनातून तरी अविकृत असते..' 'पाठांतरे का व कशी निर्माण झाली, याची कारणमीमांसा करावी लागेल.' इ. इ. प्रा. कुलकर्णी यांनी सैद्धान्तिक चर्चा सलग आणि प्रारंभीच केली असती, तर बरे झाले असते. प्रस्तावनेत ओवीसंख्या, ओवीक्रम आणि द्विबिंदू यांचा प्रत्येक अध्यायाच्या क्रमाने परामर्श घेण्यात आला आहे, त्यासाठी वि. मो. केळकर यांच्या 'ज्ञानेश्वरीची ओवीसंख्या' या ग्रंथाचा आधार घेतलेला आहे. ओव्यांचे पौर्वापर्य, अर्थदृष्ट्या त्यांचे स्थान आणि क्रम यांची सविस्तर चर्चा त्या त्या ठिकाणी करण्यात आली आहे. त्यामुळेही ओव्यांचे स्थान आणि पाठ यांना बळकटी येते.

प्राचीन हस्तालिखितांच्या पाठचिकित्सेबाबत चर्चा 'पाठचिकित्सा' या आपल्या लेखात डॉ. वि. भि. कोलते यांनी अनेक प्रतींतून मूलस्थापन करण्याच्या पद्धतीस 'ज्ञातृनिष्ठ' (subjective) असे म्हटले आहे. प्रा. पां. ना. कुलकर्णी यांनी आपली जुनी प्रत प्रमाण मानून चर्चा केली आहे आणि या पद्धतीस त्यांनी 'हस्तलिखितनिष्ठ' असा शब्द योजिला असून, सर्वांत जुनी प्रत प्रमाण मानण्याच्या पद्धतीस ज्ञेयनिष्ठ (objective) असे म्हटले आहे. दुसऱ्या पद्धतीस 'संपादकनिष्ठ' म्हणता येईल. मात्र प्रा. कुलकर्णी यांनी अन्य हस्तलिखितांतील पाठ दिलेले नाहीत. त्याऐवजी उपलब्ध हस्तलिखितांतील प्रत्येक

ओवीच्या प्रत्येक अक्षराच्या काना-मात्रा-वेलांटी, फेरफार यांची नोंद त्यांनी केली आहे. प्रस्तावनेत पाठचर्चा करताना प्रत्येक अध्यायातील काही पाठांच्या ओव्यांचे आकडे देऊन त्यांनी त्यांकडे वाचकांचे लक्ष वेधले आहे. तथापि प्रस्तावनेतील हे आकडे एकीकडे आणि संहिता दुसरीकडे यामुळे मूळ पाठ शोधणे अभ्यासकास खूप अडचणीचे होते. त्यासाठी संहितेची पाने उलटावी लागतात.

संहितानिश्चितीसाठी प्रा.पां.ना.कुलकर्णी यांनी 'गुरुचरित्र' या दत्तसंप्रदायाच्या धर्मग्रंथाचे संपादक कै. रामचंद्र कृष्ण कामत, चंदगडकर यांचा आदर्श आपल्यापुढे ठेविला आहे. 'वाङ्मयसंशोधकांनी कामतांच्या या '**अद्वितीय**' कार्याची नोंद घेतली पाहिजे', असे सांगून प्रा. कुलकर्णी पुढे म्हणतात, 'संहितानिश्चितेचे **स्तोम**' न माजविता आपल्या **श्रद्धेने व कष्टाने** कोणत्याही अडचणींवर मात करता येते, याचा वस्तुपाठ गुरुदेवभक्त कामतांनी आपल्यापुढे ठेवला आहे, तशा समर्थ संपादकांची वाट स्वच्छ व स्पष्ट करण्यासाठी हा धिटावा केला आहे' प्रा. कुलकर्णी यांनी संहितानिश्चितीचे (पाश्चात्य ?) स्तोम असा केलेला उल्लेख दुर्दैवी आहे. पाठचिकित्सा आणि समीक्षेचे अद्ययावत निकष लावूनच 'महाभारत'सारख्या सर्वमान्य ग्रंथाची संहिता सिद्ध करण्यात आली आहे. मराठीमध्ये प्रा. अ. का. प्रियोळकर, डॉ. हर्षे, प्रा. श्री. ना. बनहट्टी, डॉ. वि. भि. कोलते, डॉ. श्रीधरराव कुलकर्णी यांनी अपार कष्ट करून पाठचिकित्सेचे आणि संहितासंपादनाचे मानदंड तयार केले आहेत. या पद्धतीला 'स्तोम' म्हणणे आणि सांप्रदायिक पोथीचा पाठपुरावा करणे कितपत युक्त ठरेल ? रा. कृ. कामत यांच्या संपादनात सांप्रदायिकता आणि आनुषंगिक विचारांना प्राधान्य असणे साहजिक आहे. भाषा आणि व्याकरणाच्या दृष्टीने त्यांनी पाठचिकित्सा केलेली नाही. मराठीतील संहितासंपादनात श्री. कामत यांच्या पद्धतीचे अनुसरण कोणी केल्याचे ज्ञात नाही. प्रा. कुलकर्णी यांनीही 'व्याकरणविषयक व भाषाशास्त्रविषयक विवेचन ज्येष्ठ अभ्यासकांनी यापूर्वी, बरेचसे केले असल्यामुळे मी त्यात गुंतून पडलो नाही,' असे म्हटले आहे.

### पाठचर्चा

प्रा. पां. ना. कुलकर्णी यांनी आपल्या प्रस्तावनेत प्रस्तुत हस्तलिखितातील निवडक पाठभेदांची अध्यायवार चर्चा केली आहे. त्या अनुषंगाने आणि शब्दकोशात सापडणाऱ्या काही अन्य पाठांच्या आधारे, त्यांच्या ग्राह्यग्राह्यतेविषयीचा विचार येथे करायचा आहे. अभ्यासकांच्या सोईसाठी प्रा. कुलकर्णी यांनी दिलेल्या क्रमानुसारच तो केला जाणे योग्य होईल. या प्रतीचा उल्लेख यापुढे '**पां**'**प्रत** असा केला आहे. अध्याय आणि ओवी असा क्रम ठेविला आहे.

१.४० 'का सुक्षेत्रीं बीज **पातले**' अन्य प्रतींत घातले, पेरले असे पाठ आहेत. त्याऐवजी 'पां' प्रतीतील 'पातले' हा पाठ अधिक अन्वर्थक वाटतो. 'विस्तारले' या शब्दातील प्रचंडपण

प्रा. पां. ना. कुलकर्णी यांना जाणवले. 'घालण्या-पेरण्या'च्या क्रियेत ते सामावले आहे, असे त्यांना वाटत नाही. पण 'विस्तारले' या शब्दाचा अर्थ 'वाढले' एवढाच घ्यावयास हवा. वट आणि पिंपळाची प्रतिमा समोर आल्याने संपादकांना त्यांचे प्रचंडपण जाणवले असावे. प्रस्तुत प्रतीतील 'पातले' हा पाठ सुयोग्य आहे.

१.७९ 'जेयाते कामधेनू माए । तेयासि **अर्थ** काही आहे' येथे असलेला 'इच्छा, अपेक्षा' या अर्थाचा 'अर्थ' हा पाठ 'अप्राप्य'या अन्य सुलभ पाठापेक्षा चांगला आहे. ओ. १.१५६ मधील 'रानोभा' (म्ह. सडा) आणि १.१९२ मधील 'अति' ऐवजी 'असतिस्नेहे' हे दोन नवे पाठ स्वीकारार्ह आहेत.

१.२०५ 'कैसी नेणो सदयता । उपजली तेथ **चिंता**' 'पां' प्रतीत 'चिंता' हा पाठ असला, तरी तो स्वीकार्य वाटत नाही. मनात सदयता निर्माण झाली, म्हणून 'चित्ता' हाच पाठ योग्य आहे. 'चिंता' कुणाच्या ठिकाणी उत्पन्न झाली ?

१.१२६ 'तो गाजत असे अद्‌भुतु । **दोन्ही सैन्यां तिहींलोकां** आंतु ।' या ठिकाणी दुसरा चरण पूर्ण मानून त्याचे दोन पाठ झाले, असे संपादक मानतात. पण दोन वेगळे पाठ आहेत, हे लक्षात आल्यामुळेच प्रतलेखकाने 'तिन्ही लोकां' हे शब्द खोडलेले असावेत. शिवाय प्रत्ययापूर्वीची 'सैन्यां' आणि 'लोकां' ही दोन सामान्यरूपे एकाच चरणात येणेही उचित वाटत नाही. प्रश्न चरणात अक्षरे किती आहेत, याचा नाही.

१.१३३ 'भेरि निसाण मादल । **शंखटि काहला** भोगल ।'

या ठिकाणी पां. ना. कु. यांनी 'शंखटि काहळा' हा पाठ दिला आहे. त्यांनीच सादर केलेल्या नरींद्राच्या 'रुक्मिणी सैंवरा'तील क्र. २३०६ या ओवीत 'काहाळा टीवळा' अशी दोन वेगवेगळी वाद्ये दिली आहेत. प्रतकाराने 'टिवळा' या शब्दांतील दोन अक्षरे अनवधानाने गाळल्यामुळे ही समस्या उत्पन्न झाली. येथे 'टिवळा' हाच पाठ योग्य होय. संपादकांनी टी पुढे कंसात 'वळा' ही दोन अक्षरे दिली असती, तर अर्थबोध होण्यास मदत झाली असती.

१.१५८ 'जैसा **प्रलयादी काळु** मांडला' या चरणात संपादकांनी 'प्रलयदी' हा पाठ स्वीकारला आहे. त्यांच्याच प्रतीत 'मांडला' हे क्रियापद आहे, 'माल्हवला' असे नाही. त्यामुळे क्रियापदाला उचित असा 'प्रलयकाळु' हा कर्तृवाचक शब्द स्वीकारणे, अधिक योग्य वाटते. 'दी' हे अक्षर कंसात देता आले असते.

३.१३४ 'मग **वरिबुनिया** अन्नातें । सर्वत्र प्रसवे'

'वरिषुनिया' हा शब्द येथे 'वर्षून' असे कृदन्त आहे. त्याचा पुढील ओवीतील 'ते' या सर्वनामाशी संबंध जोडावयाचा असेल, तर येथे 'नाम'च असावयास हवे आणि ते 'वर्षु' म्हणजे 'पर्जन्य' असू शकते. त्यामुळे 'वरिषुनिया' पेक्षा 'वर्षुएया' हा पाठ अधिक बरा वाटतो.

३.२२६ 'तवं कमलाहृदयरामु । जो योगियांचा कामु'

प्रस्तुत प्रतीतील 'कमलहृदयरामु' हा पाठ ओवीतील अन्य चरणांशी जुळणारा आणि मनोज्ञ अर्थ देणारा असल्याने अधिक चांगला आहे.

४.२० 'आव्हीडीली नाथीली आस्थाबुद्धि'

येथे 'आव्हीडीली' 'नाथीली' या दोन एकत्र आलेल्या शब्दांचे काय करावयाचे, असा प्रश्न संपादकांना पडला आहे. नसलेली (नाथिली) आस्थाबुद्धी म्हणजे अनास्था. ही 'अनास्था' आडमार्गाला गेली, म्हणजे तिला विषयसुख हीच परमावधी वाटू लागते. असा अर्थ केला, तर प्रस्तुत चरणातील दोन्ही शब्द योग्य आणि आवश्यक आहेत, असे म्हणता येण्यासारखे आहे.

७.६६ प्रमाण प्रतीतील काही पाठही संपादकांनी आपल्या मतानुसार मांडले आहेत. त्यामुळे या संपादनास 'हस्तलिखितनिष्ठ' असे कसे म्हणता येईल ? प्रस्तुत ओवीतील 'आता महदादी हे माझि माया' या चरणात त्यांनी 'महदादी' हा पाठ स्वीकारला आहे. मूळ पोथीत 'महदी' असा शब्द असून समासात 'न' आहे. 'ह'चा 'हा'जरी झाला, तरी 'महानदी' हाच शब्द येतो. 'दा'ची कोणतीच खूण तेथे नाही. तेव्हा हा नवा पाठ मूळ पोथीत कसा देता येईल ?

९.८ 'काई घडेयावरि सरस्वतें । पढों सिकिजे'

या ओवीतील 'घडे यापरी सरस्वतें' हा पाठ योग्य आणि चांगला आहे. अन्य प्रतींतून 'घडेयावरी सारस्वतें' असा पाठभेद स्वीकारून चर्चा करण्यात आली आहे. त्याऐवजी प्रस्तुत प्रतीतील 'सरस्वते' या शब्दाचा 'समुद्र' हा अर्थ घेतल्यास तो अधिक काव्यमय दृष्टान्त वाटतो.

९.४७ 'जो जाणणेया आविद्यांचा गावी'

या ठिकाणी 'आघवेया' आणि 'विद्यांचा' असे दोन पाठ संभवतात. त्यांचे मिश्रण होऊन हा तिसराच पाठ तयार झाला. प्रस्तुत प्रतीत अशा तऱ्हेने पाठांच्या संमिश्रणाची बरीच उदाहरणे आढळतात. त्यांचा एकत्रित विचार करून काही निष्कर्ष काढता आले असते. प्रस्तुत ओवीत तयार झालेला 'आविद्या' हा पाठ म्ह. अविद्या-लौकिक विद्या या अर्थाने संपादकांना मान्य आहे काय ?

१०.१५ 'कां साडपन्हरेया रजणी' - अन्य प्रतींत 'कसवटी' असा पाठभेद आहे. 'रजणी' या शब्दाचा 'उटी' असा अर्थ संपादकांनी दिला आहे. त्या अर्थाने हा पाठ अधिक चांगला आणि योग्य वाटतो.

१०.५२ 'चोरू तरि तो चि भांडारी कीजे' या चरणातील प्रस्तुत प्रतीतील पाठ विषयानुरोधाने अन्वर्थक आणि 'चोखु' या अन्य प्रतींतील पाठापेक्षा सरस आहे.

१०.६३ 'तें विश्व चि हें' हा प्रस्तृत प्रतीतील चरण अर्थदृष्ट्या योग्य वाटतो. 'रा'

प्रतीतील 'विश्व हे स्वप्न' हा चरण स्पष्टीकरणात्मक म्हणून स्वीकार्य वाटत नाही.

१०.२००

*हां गा सुर्यु कीं सीळा*
***चंद्रमा म्हणो एतु आहे ॐ विला ।***

प्रस्तुत प्रतीतील या ओवीत '**चंद्रमा** म्हणों' एतु आहे ओविला' हा पाठच जुना व योग्य म्हणता येईल काय ? अर्थदृष्ट्या 'अग्नी' हा अन्यत्रचा पाठ अधिक योग्य वाटतो. कारण अग्नी हा पवित्र असल्याने तो कधीच ओवळा असत नाही, ही कल्पना सर्वश्रुत आहे. त्याऐवजी 'चंद्रम्या'स ओवळा म्हणता येईल. कारण त्याला सूर्यकिरणांचा स्पर्श झालेला असतो आणि तो कलंकितही आहे. अग्नीच्या ठिकाणी हीण उरतच नाही. १०.२१२ या ओवीच्या पहिल्या चरणातील 'गुडाकेश' या अर्थाचा 'कुटिलालकमस्तका' हा पाठ योग्य वाटतो. 'पांडवकुळटिळका' या अन्यत्रच्या पाठात सुलभीकरणाची प्रवृत्ती आहे. पाठसंशोधनसंकेतानुसार दुर्बोध शब्द ठेवणे, हे अधिक योग्य होय. १०.२४५ ही ओवी पाठ आणि अर्थदृष्ट्या योग्य आणि जुनी वाटते.

अ. ११ ओ.१२

*जेथ शांतादृभुत रोकडे ।*
*आणि एरां **शांतांचे पवित** जोडे ॥ (पां. प्रत)*
*जेथ शांतादृभुत रोकडे ।*
*आणि एरां **रसां पडप** जोडे ॥ (अन्य प्रतींतील पाठ)*

'पां' प्रतीतील पाठ सोडल्यास अन्य सर्व प्रतींत 'आणि एरां रसां पडप जोडे' असाच पाठ आहे. संपादकांनी म्हटले आहे, 'वस्तुतः या अकराव्या अध्यायात शांत आणि अद्भुत या दोन रसांचे प्रत्यक्ष दर्शन घडते. पण इतर रसांना 'पडप' जोडले आहे, म्हणजे काय हे समजत नाही." त्यांच्या मते 'एरां म्हणजे इतरांना (इतर रसांना असेही म्हणता येईल) पवित्रक प्राप्त होईल' असे ज्ञानदेव सांगतात. 'आपल्या प्रतीतील पाठाची भलावण करताना त्याच्या अर्थाची ओढाताण झाल्याचे येथे जाणवते. प्रस्तुत ओवीतील 'पडप' आणि 'पवित' या दोन पाठांच्या अर्थाचा विचार करण्यासारखा आहे.

'ज्ञानेश्वरी'च्या राजवाडे, गोडबोले, दांडेकर, आठल्ये इ.च्या प्रतीत '**पडप**' हाच पाठ आहे. याचा अर्थ वा. वि. आठल्ये 'आश्रय' असा देतात. दांडेकरांनी 'शोभा' असा अर्थ दिला आहे. तो त्यांनी रघुनाथ भास्कर गोडबोले त्यांच्या 'हंसकोशा'तून घेतलेला असावा. 'राजवाडे ज्ञानेश्वरी'च्या शब्दकोशात 'पडप'चे प्रतिष्ठा, महत्त्व, शृंगार असे अर्थ दिले आहेत. 'शृंगार' हा अर्थ 'हंसकोशा'तून घेतला असावा. पण तेथील ओवीचा संदर्भ वेगळा आहे. (नेमक्या अर्थाऐवजी अनेक अर्थ देण्यात आलेले असल्यामुळे 'राज्ञा'मधील शब्दकोश अन्य कोणी तयार केला असावा, अशी शंका येते) त्याच 'हंसकोशा'त आलेला 'बरोबरी'



अनुक्रमणिका

हा अर्थ येथे चपखलपणे बसतो. अकराव्या अध्यायाच्या प्रास्ताविकात रसविषयक उल्लेखाच्या दोन ओव्या येतात.

*१) जेथ शांताचिया घरा । अद्‌भुत आला आहे पाहुणेरा ।*
*आणि येरां ही रसां पांतिकरा । जाहला भानु ॥ २ ॥*
*२) जेथ शांताद्‌भुत रोकडे । आणि एरां रसां* **पडप** *जोडे ।*
*हें अल्पचि परि उघडें । कैवल्य येथ ॥ १२ ॥*

या दोन्ही ओव्यांत ज्ञानदेवांनी इतर रसांना शांत आणि अद्भुत यांच्या 'पांतिकरा'चा (पंक्तींचा) म्हणजे बरोबरीचा मान दिला आहे. त्यामुळे शांतरसाच्या पवित्रकाने इतर रसांना पवित्र बनविण्याचा प्रश्न येथे उद्‌भवत नाही. शांत, अद्भुत किंवा अन्य रस या गोष्टी येथे अल्प म्हणजे गौण आहेत. कारण प्रत्यक्ष कैवल्य या अध्यायात 'उघडे' झालेले आहे. साक्षात कैवल्याचे दर्शन प्रस्तुत अध्यायात घडत असल्यामुळे रसाविष्कारांनी त्याविषयी बोलण्याचा प्रयत्न अल्प म्हणजे तोकडाच म्हणावा लागेल.

आता 'पवित' या शब्दाचा विचार करू. महानुभाव साहित्यात हा शब्द वारंवार येतो. संपादकांनी आपल्या शब्दकोशात 'पवित्रक, यज्ञोपवीत, पोवते' असे अर्थ दिले आहेत. डॉ. वि. भि. कोलते यांनी 'जानवे' असा त्याचा अर्थ दिला असून पुढे 'पविते पर्व' या शब्दाचा 'गुरूला जानवे वाहण्याचा सण' असाही दिला आहे. ('लीळाचरित्र' शब्दकोश पृ. ८९०, प्रथमावृत्ती, १९७८) तागाची दोरी असा त्याचा आणखी एक अर्थ, दर्यापासून बनविलेल्या बोटात घालावयाच्या वळयालाही ते नाव आहे. आपल्या प्रतीतील 'पवित' या पाठाच्या समर्थनार्थ संपादकांनी 'पवित' चे मूळ 'पवित्रक' आणि ते धारण करणारा तो शांतरस इतरांना पवित्र बनवितो, असा दूरान्वयाचा अर्थ लावला आहे. एकदा शांतीच्या बरोबरीचे स्थान प्रारंभीच दिल्यानंतर इतर रसांना पवित्र करण्याचा प्रश्न उद्भवत नाही. तेव्हा 'शांतांचे पवित' या संदर्भहीन पाठापेक्षा 'एरां रसां पडप जोडे' हा प्रचलित पाठ स्वीकारणेच योग्य ठरेल.

११.४६० 'तरि हे गंधर्व नगरीचे उमाळे' ही 'पां' प्रतीतील ओवी सार्थ आणि शब्द जुने आहेत. 'रा' प्रतीतील ओवी प्रक्षिप्त वाटते.

११.३९४ 'हां गा भीष्माऐसा ब्राह्मणु' (पां प्रत). अन्यत्र 'कवणु' हा पाठ आहे. 'ब्राह्मणु' शब्दाद्वारे संपादकांना 'वृत्तिब्राह्मणत्व' आणि 'जातिब्राह्मणत्व' ज्ञानदेवांना सुचवावयाचे असेल काय, अशी शंका आहे. पण असा प्रयोग अन्यत्र आढळत नाही. भीष्म हा क्षत्रिय होता. त्याचे 'वृत्तिब्राह्मणत्व' स्पष्ट करावे लागेल. 'कवणु' हा पाठ अधिक सहज वाटतो.

१२.५ हृदयाकाशपल्लकी । हालविसी निजे'

या ओवीतील 'हालविसी' हा पाठ संपादकांना योग्य वाटतो. 'परिये देसी' हा जुना पाठ आहे. पाठचिकित्सेत पाठनिश्चितीसाठी सुलभ पाठाऐवजी अर्थदृष्ट्या दुर्बोध वाटणारे पाठ ठेवण्याचा संकेत आहे. 'परिये देणे' हा जुना चांगला पाठ आहे. त्यात अधिक गोडवा आहे.

त्यातील आशय दुर्बोध होत चालल्यामुळे 'हालविसी' हा सोपा पाठ आला असावा. या पाठाची चर्चा करताना संपादकांनी म्हटले आहे, 'वेगवेगळ्या कालखंडातील हस्तलिखितातील पाठ कालमानानुसार पाहून अशा बाबतीत निर्णय देणे, अधिक शास्त्रशुद्ध ठरेल.'

१२.१५ 'राणिवे बैसवी श्रोते । श्रवणाचिये.'

प्रस्तुत 'पां' प्रतीतील 'श्रोते' हा पाठ अधिक अन्वर्थक आणि सार्थ वाटतो. अन्य प्रतींतील 'श्रोते' हा पाठ वैशिष्ट्यपूर्ण वाटत नाही.

१२.४७

*मग संयमाची धाटी । सूनि मुरडिली आला वाटी' ।*
*इंद्रियें कोंडिली कपाटीं । हृदयांचा ॥*

या ओवीत संपादकांना 'आला वाटी' हा पाठ अधिक योग्य वाटतो. 'इंद्रिये आलेल्या वाटेने मुरडिली,' म्हणजे ती कोणत्या वाटेने आली ? त्यापेक्षा प्रस्तुत प्रतीतच दुरुस्त केलेला 'आव्हाटीं' हा शब्द अधिक समर्पक वाटतो. दुरुस्तीसाठी सोपा शब्द योजण्याची प्रवृत्ती असताना, प्रस्तुत प्रतीत तिथे 'आव्हाटीं' या तुलनेने जुन्या आणि दुर्बोध शब्दाची योजना होते, याचा अर्थ हा शब्द दुसऱ्या जुन्या प्रतीत असला पाहिजे.

१३.८०९ 'आणि भजिनालिया सवे...' ही प्रस्तुत प्रतीतील ओवी अधिक योग्य वाटते. 'राजवाडे' प्रतीतील ओवीत फेरबदल आणि सुलभीकरणाची प्रवृत्ती आहे.

१३.१०२७

*रूप हे छाया : पैल जळ हे माया'*
*ऐसे जो धनंजया : नीवाडू करी ॥*

या ओवीतील दुसऱ्या चरणात मूळ पोथीत 'हा ब्रह्म' असे शब्द आहेत. अन्य सर्व प्रतींतून 'पैलजळ' हा पाठ स्वीकारण्यात आला आहे. एरव्ही स्वप्रतीतील पाठाविषयी आग्रही असताना, येथे स्वतःलाच शंका आल्यामुळे संपादकांनी तो पाठ बाजूस सारला आहे. पण त्यामुळे हे संपादन 'हस्तलिखितनिष्ठ' न होता 'संपादकनिष्ठ' होणार नाही काय ? मूळ धोरणानुसार 'हा ब्रह्म' हा पाठच द्यावयास हवा होता.

१४.१५४ प्रस्तुत प्रतीतील या ओवीच्या तिसऱ्या चरणातील 'मोटेन एके मानी' हा पाठ, त्याच्या 'शिदोरी' या अर्थामुळे योग्य वाटतो. अर्थ न कळल्यामुळे 'दो दाणां' किंवा 'गोमटे न' असे पाठ निर्माण झाले असणे शक्य आहे.

१५.२९९ 'किंबहुना आत्मेयाचा...' ही ओवी 'रा' प्रतीत यमकासह पूर्णतः फिरवून घेतली आहे. या पटांगण प्रतीत अशा प्रकारे बऱ्याच ठिकाणी ओव्या सुबोध करण्याची सान्वय देण्याची पद्धती दिसते. कदाचित श्रोत्यांना 'ज्ञानेश्वरी' समजावून सांगताना या परंपरेतील वक्त्यांनी अशा तऱ्हेचे बदल केले असण्याची शक्यता आहे. अ. १५.३०४ ही ओवीदेखील 'रा' प्रतीत फिरवून सुगम केलेली दिसते.

१७.२४

*तरि तक्षकाची फडे । टोकुनि **कौंतो** मणि काढे ।*
*कैं नासीकीचा केशु जोडे । सींहोचीये ॥*

आठल्ये प्रतीत 'टोकुनि'ऐवजी असलेल्या 'ठाकुनि' हा पाठ अधिक योग्य वाटतो. दुसरा चरण 'ठाकोनि कै तो मणि काढे ।' असा आहे. 'कौंतो' असा पाठ स्वीकारून संपादकांनी त्याचा अर्थ 'भाला' असा दिला आहे. तथापि त्यांनीच अवलंबिलेल्या पद्धतीने विचार करावयाचा झाल्यास पृष्ठमात्रायुक्त 'कौंता' असे लेखन असेल, तर 'ता'वर मात्र येऊन 'कैंतो' असाच पाठ सिद्ध होतो. त्यामुळे 'कौंतो' हा पाठ अग्राह्य म्हणावा लागतो.

१७-४२५ या ओवीत संपादकांनी 'रियुवेषा' हा मूळ प्रतीतील पाठ दूर सारून अन्यत्रचा 'रिपुचेया' हा पाठा स्वीकारला आहे. यामुळे 'संपादकनिष्ठता' आली आहे.

१८-१२३

*लता पीके आघवी । तव चुतु बांधे पालवी ।*
*मग हातु न लवी **माधवी** । **सोडु** निघाली ॥*

नित्यनैमित्तिक कर्मांपासून प्राप्त होणाऱ्या फळांचा त्याग निरिच्छपणे एखाद्या वमनाप्रमाणे करावा, हा विचार मांडताना ज्ञानदेवांनी हा दृष्टांत दिला आहे. या ओवीत 'लता' हा कर्ता नाही किंवा आम्रवृक्षही कर्ता नाही, तर माधवी म्हणजे वसंत ऋतू हा कर्ता आहे. 'माधवी' हा शब्द गाळल्यास संपादकांच्या मतानुसार यमकहानी होत नसली, तरी अर्थहानी जरूर होते. 'सोडुनि घाली' म्ह. 'त्याग करतो.' ('सोडु निघाली' असाही पदच्छेद,) लता, पुष्पांनी आणि आम्र (वृक्ष) फळांनी डवरलेले असताना, त्यांचा उपभोग न घेता, (निरिच्छपणे) वसंतऋतू त्यांचा त्याग करतो, हाच अर्थ अधिक योग्य वाटतो. तेव्हा संपादकांच्या मतानुसार 'माधवी' हा 'आगंतुक' पाठ असला, तरी प्रत्यक्षात तोच महत्त्वाचा शब्द आहे. या ओवीचा विचार सामग्र्याने आणि पूर्वापार संदर्भात होणे गरजेचे आहे. वसंतऋतूच्या आगमनाने वेलींना फुले येतात, आम्रतरूंना मोहर फुटतो, फळे येतात; पण त्यांचा आस्वाद घेणारे मात्र वेगळेच असतात.

१८-४६० प्रस्तुत ओवीतील 'उपलाण' म्ह. 'आघाडीचे सैन्य' आणि 'कंकाण' म्हणजे घोड्यांची एक जात असे वेगळे अर्थ संपादकांनी दिले आहेत. त्यामुळे ओवीतील अर्थ फारसा बदलत नसला, तरी शब्दयोजनेतील अन्वर्थकता ध्यानी येते.

'ज्ञानेश्वरी' च्या 'पसायदाना' तील ओ. १७७७ (अ. १८) मध्ये **'तोषावे'** या प्रचलित पाठाऐवजी **'तोषाजावे'** असा अधिक चांगला पाठ या प्रतीत आहे. प्रचलित ओ. १७८१ (अ. १८) मधील **'बोलते पां अर्णव'** अर्णव । पियूषांचे' या चरणात 'पां' हा शब्द अर्थहीन वाटतो. त्याऐवजी प्रस्तुत प्रतीतील 'बोलतेयां अर्णव' हा पाठ अधिक सरस आणि अन्वर्थक असा आहे.

### शब्दकोश

प्रदीर्घ प्रस्तावनेनंतर उपलब्ध मूळ संहिता आणि शेवटी शब्दकोश, परिशिष्टे देण्यात आली आहेत. उपलब्ध संहिता काटेकोरपणे देण्याचा संपादकांनी प्रयत्न केला आहे. तथापि त्यांतून टिपलेली वैशिष्ट्ये सामान्य वाचकापेक्षा अभ्यासकांनाच उपयुक्त ठरणारी आहेत. शब्दकोशात वर्णानुक्रमी अत्यावश्यक असते. प्रस्तुत 'ज्ञानेश्वरी' च्या प्रतीत, अध्याय आणि ओवी या क्रमाने शब्दकोशाची मांडणी केल्यामुळे एखाद्या नेमक्या शब्दाचा अर्थ मिळविण्यास कष्ट पडतात. 'सर्व कठीण शब्दांचा हा कोश नव्हे. . . समग्रता हा या शब्दकोशाचा विशेष नव्हे,' अशी आपली भूमिका संपादकांनी स्पष्ट केली आहे. या शब्दकोशात कित्येक शब्दांचे दोन किंवा अधिक अर्थ देण्यात आले आहेत. उदा. विबय (८.१०३), उदोणे (८-१४२), उपखा (९.१४४) इ. त्यामुळे ओवीतील विशिष्ट शब्दाचा नेमका अर्थ वाचकाला समजून घ्यावा लागतो. शब्दकोशात मूळ संहितेतीलच पाठ देण्यात आले असल्याने मुळाचा पडताळा पाहताना आणखी काही पाठांची चर्चा आवश्यक वाटली. त्यांतील काही पुढे देत आहे.

अ. ६. ४३६ 'ॐ लांन्तरला' या शब्दापुढे संपादकांनी प्रश्नचिन्ह केले आहे.' ऐसा ॐ लान्तरला काजी' या पूर्वीच्या (क्र. ४३५) ओवीत 'तैसी दोन्ही दुरावली' अशी रचना आहे. या दोहोंना जो दुरावला, दोहोंला अंतरला असा त्याचा अर्थ होतो. 'दोहोंला अंतरला' या दोन शब्दांचा मिश्र पाठ (दो) ओलां (अं) तरला' असा तयार झालेला दिसतो. 'योगाच्चलित मानसः' याचे ते रूपांतर आहे. संपादकांनी अन्य प्रतींतील पाठ-निदान शब्दकोशात दिला असता, तर हे स्पष्ट झाले असते.

अ-७.९१ अशक्य गोष्टींचे वर्णन करताना ही ओवी येते. **'जरि चोरा सभा दाटे'** या चरणात 'जर चोरांची सभा भरली', म्हणजे ते जसे अशक्य असा अर्थ होतो. संपादकांनी सभा या शब्दाचे न्यायमंदिर, सभासद, पंच असे अर्थ दिले असून 'दाटे' या शब्दाचा घाबरणे असा अर्थ दिला आहे. तो येथे लागू होत नाही.

अ. ७-९७ 'बोधाचा जोडला तारा' या चरणातील 'तारा' या शब्दाचे 'तेजोबल, चांदणी, पायउतार' असे अर्थ संपादकांनी दिले आहेत. वास्तविक 'तारा' या शब्दाचा 'सांगड' (तारून नेणारी) हा अर्थ येथे योग्य होईल. मूळ ओवीतील पूर्वापर संबंधाचा अन्वय शब्दकोशातील अर्थाने लागत नाही.

अ. ७-१५४ 'म्हणोनि प्रकाशाचेनि देहबळे' या चरणात 'प्रकाशशक्तीने' असा अर्थ होतो. संपादकांनी दिलेले शरीर आणि दिवस हे अर्थ येथे अन्वर्थक वाटत नाहीत.

अ. ९-१७९ 'चित्ताचेनि कपाळे गेले' (पां. प्रत) ऐवजी 'चिंतेचेनि कपाटे (दारात गेले)' हा अन्यत्रचा पाठ अधिक योग्य. 'चिंतेच्या दारात जाऊन तामसीच्या मुखात पडतात' हा

अर्थ सुसूत्र होतो. 'पां' प्रतीतील चरणाचा अर्थ संपादकांनाही शंकास्पद वाटतो.

**अ. ९-१८२** 'पां' प्रतीत 'अगस्तिगवसणी' असा पाठ असून संपादकांनी शब्दकोशात त्यापुढे प्रश्नचिन्ह केले आहे. कंसात अगस्ति = त्वगस्थि असे लिहून त्यापुढे प्रश्नचिन्ह केले आहे. या ठिकाणी 'त्वगस्थिगवसणी' हाच पाठ योग्य वाटतो. (त्वक् = त्वचा) त्वचा आणि अस्थी यांची गवसणी असा सरळ अर्थ त्यातून निष्पन्न होतो.

**अ. १२-६३** 'अहोरात्र वावी। मवावा वारा,' या चरणातील 'वाव' या शब्दाचा संपादकांनी दिलेला वायू, श्वास हा अर्थ ओवीतील अन्य कल्पनांशी जुळणारा, म्हणून योग्य वाटतो. 'हातांनी वारा मोजावा' हा अन्य संपादकांचा अर्थ केवळ शब्दार्थ वाटतो.

**अ. १३-५८२** या ओवीतील 'वळित' आणि 'खोंग' या शब्दांचे 'पां' प्रतीत दिलेले अर्थ लक्षात घेण्यासारखे आहेत. त्यानुसार ओवीचा अर्थ अधिक अन्वर्थक आणि स्पष्ट होतो.

**अ. १३.६११** 'शैलकक्षा निकुंजरें' = हिरवीगार वनस्पती ? (पां. प्रत) हा चरण 'शैलकक्षाचि कुंजरें' असा द्यावयास हवा होता. मूळ प्रतीत 'नि' ऐवजी 'चि' अशी दुरुस्ती केलेली आहे, ती योग्य वाटते.

**अ. १३.७९३** 'गोरी' (पां. प्रत) हा पाठ देऊन 'आकर्षित करणारे गाणे' असा अर्थ दिला आहे. पण तेथेच असलेला 'गोडी' ('री' च्या ऐवजी 'डी' ही दुरुस्ती) हा पाठ 'स्त्रियेची आवड कमी होऊ देत नाही' या अर्थाने अधिक योग्य वाटतो.

प्रा. पां. ना. कुलकर्णी यांच्या विवेचनाच्या संदर्भात काही मतभेद झाले, तरी या प्रतीत अनेक जुने आणि अर्थदृष्ट्या महत्त्वपूर्ण पाठ आहेत, हे मान्य करावे लागेल. या प्रतीचा 'लेखकू' अधिक साक्षेपी असता, तर तिचे मोल अधिक वाढले असते. एकनाथ संशोधनपूर्व काळातील प्रतींचे रूप दर्शविणारी ही प्रत उपलब्ध झाल्याने यापुढील 'ज्ञानेश्वरी' संशोधनकार्यात तिचा परामर्श अटळ ठरणार आहे. प्रा. पां. ना. कुलकर्णी यांनी मूळ संहिता देताना दाखविलेला साक्षेप प्राचीन साहित्याच्या संशोधकांनी लक्षात घेण्यासारखा आहे. कोल्हापूरच्या शिवाजी विद्यापीठाने ऐतिहासिक आणि साहित्यविषयक अनेक महत्त्वपूर्ण ग्रंथांचे प्रकाशन यापूर्वी केले आहे. प्रा. कुलकर्णी संपादित 'ज्ञानेश्वरी' च्या प्रकाशनाचेही मौलिक कार्य विद्यापीठाने केले आहे. त्याबद्दल विद्यापीठाचे अभिनंदन आणि कुलगुरू आणि कुलसचिव यांना धन्यवाद. संपादक प्रा. पां. ना. कुलकर्णी त्यांच्या या महत्त्वपूर्ण संशोधनकार्याबद्दल अभिनंदनास पात्र आहेत.

**ज्ञानेश्वरी**— संपादक : प्रा. पां. ना कुलकर्णी
प्रकाशक : शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर ४१६००८
मूल्य : रुपये तीनशे पन्नास

(१७३० ई, सहावी गल्ली, राजारामपुरी, कोल्हापूर ४१६००८.)

# ज्ञानदेवांच्या अभंगवाणीचे शब्दसौष्ठव

संशोधनाचे प्रमुख प्रकार दोन : एखाद्या ग्रंथाची संहिता प्रथमच मिळवून व तिचे सटीप संपादन करून ती संहिता प्रसिद्ध करणे, तसेच एखाद्या ग्रंथाच्या अनेक प्रती मिळवून त्या प्रतींच्या तुलनात्मक अभ्यासातून त्या ग्रंथाची पाठचिकित्सा करणे हा संशोधनाचा एक प्रकार होय. अ. का. प्रियोळकरांनी 'क्रिस्ताचे यातनागीत' या काव्याचे हस्तलिखित नव्याने शोधून काढले व विवेचक पद्धतीने ते सिद्ध करून प्रकाशात आणले. तसेच रघुनाथ पंडितकृत 'दमयंती-स्वयंवर' या आख्यानकाव्याच्या विविध प्रतींचा तौलनिक परामर्श घेऊन प्रियोळकरांनी प्रकाशित केलेली त्या काव्याची पाठशुद्ध आवृत्ती हेही मूलभूत संशोधनच होय.

संशोधनाचा दुसराही एक प्रकार आहे. प्रकाशित ग्रंथातील आशयाचा, पूर्वसूरींनी लावलेल्या विविध अर्थांपेक्षा वेगळा व नवा असा त्या ग्रंथाच्या अंतरंगाचा अन्वयार्थ लावून दाखविणे, अंतरंगाचे नवे 'इंटरप्रिटेशन' करणे, हेही एक प्रकारचे संशोधनच होय. ग्रंथराज ज्ञानेश्वरीचे लेखन विदग्ध रसवृत्तीच्या विलासासाठीच झाले आहे, या सिद्धांताला धरून केलेले ग्रंथलेखन हे ज्ञानेश्वरीचे संशोधनच होय.

'ज्ञानदेवांच्या अभंगातील शब्दकळा' हे सौ. वसुंधरा बनहट्टी यांनी लिहिलेले पुस्तक संशोधनाच्या दुसऱ्या प्रकारात समाविष्ट होते. आपल्या अभ्यासासाठी लेखिकेने ज्ञानदेवगाथेची संहितानिश्चिती हा विषय निवडलेला नाही, तर उपलब्ध ज्ञानदेवगाथेतील अभंगांच्या आधारेच तिने आपला संशोधनप्रकल्प सादर केला आहे. ज्ञानदेवांच्या अभंगांमधील काव्य, तत्त्वज्ञान आणि अभंगांच्या शब्दरचनेतून उमटणारे ज्ञानदेवांचे व्यक्तिमत्त्व यांचा शोध घेण्याचा हा प्रयत्न आहे.

लेखिकेचा हा प्रयत्न अभिनव आणि प्रशंसनीय आहे. एक तर ज्ञानेश्वरी, अमृतानुभव व चांगदेव पासष्टी या ज्ञानदेवांच्या तीन प्रबंधांवर विपुल व कसदार ग्रंथलेखन झाले असले, तरी ज्ञानदेवगाथा त्या मानाने दुर्लक्षित राहिली होती. या गाथेतील अभंगरचना जशी स्फुट स्वरूपाची आहे, तशीच तिच्याविषयीची आजवर झालेली समीक्षाही स्फुट स्वरूपाचीच आहे. सर्वस्वी स्वतंत्र अंगाने आणि स्वायत्त अभ्यासपद्धतीने ज्ञानदेव गाथेचा परामर्श घेणारा पहिला लक्षणीय ग्रंथ, म्हणून सौ. बनहट्टींच्या या प्रकल्पाकडे पाहता येईल.

## ग्रंथाची मांडणी

ग्रंथारंभी 'सुभग दर्शन' ही डॉ. वि. रा. करंदीकरांची प्रस्तावना दिलेली आहे. 'सुट्या रचनेतील शब्दांच्या द्वारा तीमधील आंतर सुसंगतीचा शोध घेण्यात लेखिकेने खूपच यश मिळविलेले आहे. लेखिका आपल्या प्रतिपाद्य विषयाशी किती तद्रूप होते, याचे काही स्थळी घडणारे दर्शन विलोभनीय आहे,' अशा शब्दांत प्रस्तावनाकारांनी या ग्रंथाची भलावण केली आहे. ही प्रशंसा सर्वस्वी योग्यच आहे.

यानंतरच्या प्रास्ताविकात लेखिकेने आपली भूमिका, संक्षेपाने पण नेमकेपणाने मांडली आहे. ज्ञानेदवांच्या अभंगांतील रचना बघताना, एकेका शब्दाचे काव्यविषयक व तत्त्वज्ञानविषयक अनेक पैलू अभ्यासता येतात. अभंगांच्या पदबंधातील शब्दांना मागच्या-पुढच्या शब्दांचेही संदर्भ असतात, याचे उचित भान ठेवून, शब्दकळेचा परामर्श लेखिकेने घेतला आहे.

यापुढील चार प्रकरणांतून आपला ग्रंथ लेखिकेने सादर केला आहे. त्यांपैकी 'अभंगांतील काव्यसौंदर्य' हे पहिले प्रकरण पुढील तीन प्रकरणांची पार्श्वभूमी म्हणून आलेले आहे. त्यात ज्ञानदेवगाथेचे संक्षेपतः रसग्रहण केलेले आहे. 'अभंगातील काव्यात्म शब्दांचा आस्वाद', 'तत्त्वज्ञानपर शब्दांचे विवेचन' आणि 'शब्दकळेतून प्रतीत होणारे ज्ञानदेवांचे व्यक्तिमत्त्व' ही पुढची तिन्ही प्रकरणे म्हणजे ज्ञानदेवांच्या अभंगांची तीन प्रमुख वैशिष्ट्ये विशद करणारे तीन शोध-निबंध होत, असे म्हणता येईल.

आपल्या या सर्व विवेचनासाठी लेखिकेने वेचक व समर्पक आधार जागोजागी दिले आहेत. पण अभ्यासाची साधने म्हणून शेवटी संदर्भसाहित्य सूची अपेक्षित होती. ती उणीव वजा करता ग्रंथाची एकूण मांडणी सुसंगत व सर्वस्पर्शी आहे.

## काव्यसौंदर्याची मीमांसा

बालक्रीडा, गौळणी, विरहिणी इत्यादी विषयांवरील अभंग सूचकतेतील सौंदर्याने कसे रसरसलेले आहेत, हे पहिल्या प्रकरणात सांगितले आहे. गौळणी म्हणजे ज्ञानदेवांच्या चित्तवृत्ती आहेत. व्यवहार्य पातळीवरच्या रूपकांमध्ये योग, ज्ञान व अध्यात्म या पातळीवरची उपमाने वापरल्यामुळे अभंगांची वाङ्मयीन पातळी उंचावली आहे. विराण्यांमध्ये परमात्मभेटीची तळमळ व विरहवेदनेचा झाकोळ आहे. 'निलिये रजनी वाहे, मोतीया सारणी.' अशा अभंगातून योग, अध्यात्म व सगुणवर्णन या तिहेरी झोक्यावर निळाईत हिंदोळणारे काव्यवैभव आहे. त्या अभंगांची भाषा प्रतिमावाही शब्दांची आहे. शब्दांच्या आकृतिबंधातून आपल्याला ज्ञानदेवांच्या आत्मानुभूतीचे प्रतिदर्शन घडते.

## काव्यात्म शब्दांचा आस्वाद

ज्ञानदेव-गाथेतील शब्दांना पैलूदार सौंदर्य आहे. त्या शब्दांचे सौंदर्य सप्तरंगी लोलकासारखे खुलत राहते. हे अभंग अपार्थिवाच्या पातळीवरील आहेत. त्यात प्रकर्षाने प्रतीत होणारा शांतरस, शृंगार-वत्सलादी अन्य रसांना स्वतःमध्ये समाविष्ट करून घेणारा आहे. तसेच भक्ती व करुण या रसांनाही इथे भरपूर वाव आहे. निरंजन, प्रेम, सुनील, कापूर, चंदन, विंजणवारा, अमृत, घुणघुणा, अनाहतनाद इत्यादी शब्दांचे अभंग काव्यात ज्ञानदेवांनी केलेले अनन्यसाधारण उपयोजन लेखिकेने 'रसाळपणाच्या लोभा'ने उलगडून दाखवले आहे. त्या संदर्भात शब्द, स्पर्श, रूपादी पंचेंद्रियांचे वाचक असलेल्या शब्दांचे तिने केलेले विवेचन अर्थपूर्ण व रससंपन्न आहे.

## तात्त्विक संज्ञांचे विवेचन

काव्यात्मता व तत्त्वचिंतनपरता यांचे अद्वैत ज्ञानदेवगाथेत आपल्याला जाणवते. जगाला शांती, सामान्य माणसाला ब्रह्मज्ञानाची ओळख, आणि सर्वांच्या मनाला समाधान प्राप्त व्हावे, या हेतूने ज्ञानदेवांनी साहित्यगुणांचा आविष्कार करत करत आपले तत्त्वज्ञान जगाला सांगितले. त्यांचे हे तत्त्वज्ञान स्वानुभवाधिष्ठित व समन्वयवादी असल्याचे लेखिकेने स्पष्ट केले आहे. 'अधरींचा गुणु । श्रुतिगर्भीं समवर्णु । दोहीस्वरीं गोडी वेणु । जग निववितु गे माये ॥' या पद्धतीने ज्ञानदेव निर्गुणाच्या उपमा सगुणरूप देवाला देतात व त्यातून सगुण-निर्गुणभक्तीचा समन्वय साधतात. तसेच 'एक नाम हरी । द्वैत नाम दुरी । अद्वैत कुसरी । विरळा जाणे ॥' अशी अद्वयानंदाची बैठक ते वारकरी पंथाला मिळवून देतात. अमृतानुभवातील चिद्‌विलासवाद गाथेतही आला आहे. 'स्वरूपीं पाहता बिंबी बिंब उमटे । ते मेघःश्याम दाटे । बुंधीमनीं ॥' या अभंगाचा तोच आशय आहे. अद्वैतानंद, सोहंबोध, निर्गुण परमात्मा व हठयोगसाधना यांना अनुसरून ज्ञानदेवीय अभंगांतून नाथपंथाचे तत्त्वज्ञान आले आहे.

## शब्दकळेतून व्यक्तित्वदर्शन

ज्ञानदेवांच्या भक्तियुक्त व्यक्तिमत्त्वाचे बलस्थान म्हणजे त्यांनी केलेले नामसंकीर्तन होय. संतत्व, व्युत्पन्नता, साक्षात्कारप्राप्ती व कविवृत्ती हे ज्ञानदेवांच्या व्यक्तिमत्त्वाचे गुणविशेष त्यांच्या अभंगकवितेतून प्रत्ययास येतात. भक्ती, संतसंग, आत्माराम, प्रणव, आत्मप्रभा, गौळण, विरहिणी, निळा इत्यादी शब्दांची साधार मीमांसा करून त्यांच्या आधारे व्यक्तिमत्त्वाचा हा शोध लेखिकेने घेतला आहे. मार्मिकता व सूक्ष्माभ्यास यांचे फलित या दृष्टीने हा शोध लक्षणीय आहे.



अनुक्रमणिका

### ग्रंथनामातील दोन घटक

'ज्ञानदेवांच्या अभंगातील शब्दकळा' या ग्रंथनामातील 'अभंग' व 'शब्दकळा' या दोन्ही संज्ञा महत्त्वाच्या आहेत त्यांपैकी 'अभंग' या संज्ञेची व्याप्ती लेखिकेने स्पष्ट केली आहे.(पृ.४४) 'अभंग हा एक 'छंदप्रकार आहे,' असे जुजबी वर्णन लेखिकेने केले आहे. पण एक वृत्तप्रकार म्हणून अभंगाची अनेकविध वैशिष्ट्ये, ओवी व अभंग यांचे तुलनात्मक वर्णन आणि अभंगाचे प्रकार याविषयांचे अधिक सखोल व साधार विवेचन इथे अपेक्षित होते.

अभंग हे जसे एक 'वृत्त' आहे, तशीच ती एक 'वृत्ती' आहे. 'ज्ञानदेवांचे काही अभंग म्हणजे अंतर्बाह्य भावगीतेच आहेत,' असे मोघम विधान लेखिकेने केले आहे. (पृ.४४) पण 'भावगीत' म्हणजे काय ते मात्र सांगितले नाही. खरे तर ज्ञानदेवांन्चा एकेक अभंग म्हणजे 'पारमार्थिक भावगीत' (मेटॅफिजिकल लिरिक) आहे. त्याची साधार चर्चा या संदर्भात अपेक्षित होती.

'शब्दकळा' ही दुसरी संज्ञा. तिचा अर्थ लेखिकेने कुठेच दिलेला नाही. प्रस्तावनाकारांनी मात्र ही संज्ञा स्पष्ट केली आहे.(पृष्ठ सात, परिच्छेद दुसरा) 'शब्दांची निवड आणि तीमधील चातुर्य, तसेच शब्दांच्या योजनेतील औचित्य, सूक्ष्मता आणि सौंदर्य' असा समर्पक खुलासा त्यांनी केला आहे. खरे तर उचित शब्दकळा ही शुक्ल पक्षातील वाढत्या चंद्रकळांप्रमाणे अभंगातील आशयाचे सौंदर्य वृद्धिंगत करते.

### बहुश्रुतपणाचे विपुल पुरावे

विवेचनाच्या ओघात येणारे आपले मुद्दे प्रत्ययकारी ठरण्याच्या दृष्टीने लेखिकेने जागोजागी अधिकारी अंतरंगांची वचने उद्‌धृत केली आहेत. त्यांत कालिदास, कबीर, सूरदास, नरसी, रामकृष्ण, विवेकानंद यांच्यापासून 'बी', बा. भ. बोरकर, शं. गो. तुळपुळे, गं. बा. सरदार, प्र. न. जोशी यांच्यापर्यंतची अनेक मंडळी भेटतात. त्यांच्या ग्रंथांतील अवतरणे/उदाहरणे अगदी सहजपणे येतात. त्यामुळे लेखिकेचे विवेचन प्रत्ययकारी होते. त्याला वजन लाभते. या विवेचनाला रससिद्ध निवेदनशैलीची जोड लाभल्यामुळे ते अधिक रोचक होते. उदाहरणार्थ, ज्ञानदेव 'चैतन्याचा गाभा नीलबिंदू' अशा अभंगांतून निळ्या वर्णाचा संबंध योगप्रक्रियेशी असल्याचे सुचवितात. वारंवार ठिबकणाऱ्या मधाच्या थेंबांनी कुपी भरत जावी, तसे मनात साठणाऱ्या त्या शब्दाने निळाईचे सौंदर्य फाकत जाते.' (पृ.३०) 'इवलेसे रोप' (पृ. ३५), 'पैल तोगे काऊ' (पृ. १०६), 'बरवावो हरि' (पृ. १६४) इत्यादी अभंगांची रसग्रहणे मूळ आशयातील विचारसौंदर्य व भावलावण्य यांना पुरेपूर न्याय देणारी उतरली आहेत.

### काही किरकोळ त्रुटी

'निरूपण' हा शब्द सर्वत्र 'निरुपण' असा ऱ्हस्व छापलेला आहे.(पृ.१८,१९) तीच गोष्ट 'रूप' या शब्दाची (पृ. २०.२१). कीर्ती (किर्ती, पृ.१६), सात्त्विक सच्छिल,(सत्शील, पृ. १६२, सात्त्विक, पृ. २०), 'जी गौळण' (जे गौळण, पृ. २३), इत्यादी. 'स्वतः ज्ञानेश्वरांची मनोवस्था (मनोऽवस्था) वर्णन करण्यासाठी त्यांनी गौळणीचे प्रतिमान वापरले आहे' (पृ.२४) अशी सदोष वाक्यरचनाही क्वचित् स्थळी भेटते. 'रेशीमगुंता' नव्हे 'रेशीमवीण' (पृ.१९).

### काही समुचित शब्दप्रयोग

ज्ञानदेवांची मनगौळण (पृ. २४), गोमटी गौळण (पृ. २५), विरहवेदनेचा झाकोळ (पृ. २७), रूपाचा बडिवार (पृ. ६२), अचानक आलेली सुगंधी झुळूक (पृ. ९२) काव्यगुणांची अक्षय दिवाळी (पृ. १९८), इत्यादी शब्दसंहती मूळ आशयाला विशेष परिमाण मिळवून देतात.

### ग्रंथाचे संशोधनमूल्य

ज्ञानेश्वरीकर्ते ज्ञानेश्वर निराळे आणि अभंगकार ज्ञानदेव निराळे, असा जुना वाद आहे. हे दोघे वेगळे नसून, एकाच व्यक्तिमत्त्वाची स्पंदने या दोन्ही ग्रंथांतून ध्वनित झाली आहेत, या मताच्या पुष्ट्यर्थ सौ. बनहट्टींचा प्रस्तुत ग्रंथ फार उपयुक्त ठरेल. आपले विवेचन त्यांनी केवळ ज्ञानदेव गाथेपुरते मर्यादित ठेवलेले नाही. ज्ञानेश्वरी, अमृतानुभव व चांगदेवपासष्टी या ज्ञानेश्वरकृत ग्रंथांचेही आधार त्यांनी आपल्या समालोचनात अनेक ठिकाणी घेतले आहेत. विशेषतः ज्ञानेश्वरीतील 'विदग्धा रसवृत्ती' ज्ञानदेवगाथेतही प्रत्ययास येते. (पृ. ४१-४२). ज्ञानेश्वरीतील ब्रह्मसाक्षात्काराचा शांतरस अभंगगाथेतही उत्कर्षाप्रत गेला आहे. (पृ.४८-४९). ग्रंथभरातील विविध विषय विवेचनाच्या संदर्भात लेखिकेने ज्ञानेश्वरी व गाथा यांतील साम्यस्थळे देऊन त्या दोहोंतील अद्वैत साधार स्पष्ट केले आहे. भावार्थदीपिकाकार ज्ञानेश्वर आणि अभंगकर्ते ज्ञानदेव हे एकच होत, हे प्रत्ययकारी पद्धतीने विशद होण्याच्या दृष्टीने प्रस्तुत ग्रंथप्रकल्प लाख मोलाचा ठरावा.

### पूर्णतेच्या दिशेने

प्रस्तुत ग्रंथप्रकल्प एकात्म व निर्दोष होण्याच्या दृष्टीने काही गोष्टी सुचविणे युक्त ठरेल. ठळक मुद्रणदोष दूर करावेत. संदर्भ ग्रंथसूची व लेखिका परिचयसूची अशा दोन सूची द्याव्यात. चर्चित अभंगांची संहिता देणारे परिशिष्ट (या सूचींच्या अगोदर) द्यावे. प्रत्येक लेखातील पोट-मुद्यांना उपशीर्षके द्यावीत.

ज्ञानदेवगाथेतील शब्दांची निवड लेखिकेने चोखंदळपणे केली आहे. काव्यदर्शन, तत्त्वदर्शन व व्यक्तित्वदर्शन हे त्या निवडीमागील तिन्ही हेतू सफळ झाले आहेत. मात्र प्रतिपाद्य विषयांची पुनर्रचना करून, शब्दमीमांसेतील पुनरुक्ती टाळणे जरुरीचे आहे. या लहान-मोठ्या सूचनांचा अवलंब केल्यास ग्रंथाचे स्वरूप अधिक बांधेसूद होईल. मात्र आहे त्या स्वरूपातही ग्रंथ विचारप्रवर्तक आणि आकर्षक झाला आहे, ते निर्विवादपणे सांगता येईल.

(ज्ञानदेवांच्या अभंगातील शब्दकळा : सौ. वसुंधरा बनहट्टी, सुविचार प्रकाशन मंडळ, पुणे ३०.
पृष्ठे डेमी सोळा + २१२ = २२८. मूल्य रु. ७५.)
(६०/१५ भारती निवास कॉलनी, पुणे ४११००४)

---

डॉ. नीलिमा गुंडी

## साहित्यविचाराचा प्राथमिक परिचय

प्रा. अरविंद वामन कुलकर्णी यांचे 'साहित्यविचार' हे पुस्तक विशिष्ट वाचकवर्ग गृहित धरून लिहिलेले आहे. नव्याने व्यवसायात पदार्पण करणारे प्राध्यापक आणि मराठी विषयाचे महाविद्यालयीन तसेच विद्यापीठ स्तरावरील विद्यार्थी, हा साधारणतः त्यांना अपेक्षित असलेला वाचकवर्ग आहे. पुणे विद्यापीठाच्या अभ्यासक्रमात प्राचीन काव्यशास्त्र आणि पाश्चात्त्य समीक्षाशास्त्र या दोन्ही प्रणालींचा मेळ घातलेला आहे. त्या दृष्टीने प्रस्तुत पुस्तक उपयुक्त ठरेल, असा विश्वास पुस्तकाचे प्रस्तावनाकार डॉ. गं. ना. जोगळेकर यांनी व्यक्त केला आहे.

साहित्याचे स्वरूप, साहित्याचे प्रयोजन, साहित्याची निर्मितिप्रक्रिया, साहित्याची भाषा, साहित्याचा आस्वाद, साहित्याची सामाजिकता, साहित्यिक अभिरुची आणि साहित्यप्रकाराची संकल्पना, अशी एकूण आठ प्रकरणे पुस्तकात समाविष्ट आहेत.

अध्यापनाच्या क्षेत्रातील अनेक वर्षांचा अनुभव आणि व्यासंग यांमुळे प्रस्तुत पुस्तकात साहित्याची परिभाषा सोपेपणाने उकलून दाखवायचे अवघड काम लेखकाला सहजसाध्य झाले आहे. येथे वाङ्मयीन संकल्पना स्पष्ट करताना भारतीय आणि पाश्चात्त्य विचारवंतांच्या महत्त्वपूर्ण व्याख्यांचे– विचारांचे एकसूत्रीकरण सहजगत्या केले गेले आहे. तसेच समीक्षाशास्त्रातील नव्या विचारप्रणालींचाही यात समावेश केला आहे.

यातील 'साहित्यातील सामाजिकता' व 'साहित्यिक अभिरुची' ही प्रकरणे विशेष

चांगली उतरली आहेत.

तरीही हे पुस्तक वाचताना काही बाबतींत अपुरेपणा जाणवतो. कारण विवेचनाच्या ओघात आलेल्या अवतरणांचे संदर्भ काही ठिकाणी दिले गेलेले नाहीत. काही लेखकांच्या नावांचा उल्लेख विवेचनात येतो, पण तेथे वा संदर्भसूचीत त्यांच्या पुस्तकांच्या नावाचा उल्लेखच नाही. (उदा. म. सु. पाटील, के. रं. शिरवाडकर, मिलिंद मालशे.) पुस्तकात पाश्चात्त्य लेखकांचे अनेकदा संदर्भ आले आहेत, पण संदर्भसूचीत एकाही इंग्रजी पुस्तकाचा उल्लेख नाही.

काही ठिकाणी विवेचन त्रोटक-टिपणवजा वाटते. समकालीन वाङ्मयातील उदाहरणांनिशी विषय प्रतीतिगम्य करणे लेखकाला सहजशक्य झाले असते. विशेषतः प्रतिमा, अभिरुची आणि औचित्य इ. विषयीचे विवेचन वाचताना ही उणीव भासते. तसेच पुस्तकात साहित्य आणि इतर ललितकला, साहित्यातील वाद अशी काही प्रकरणेही समाविष्ट करणे शक्य झाले असते.

एक निर्मितिशील लेखक, अध्यापक व समीक्षक या नात्यांनी आलेल्या अनुभवांतून लेखकाच्या मनात निर्माण झालेले प्रश्न व त्यांचा स्वतंत्रपणे घेतलेला शोध यात समाविष्ट झाला असता, तर लेखकाच्या स्वतंत्र दृष्टीचा ठसा यात प्रभावीपणे उमटला असता, असे वाटत राहते !

अर्थात साहित्यविचाराची प्राथमिक स्वरूपात ओळख करून देणे व त्याविषयीच्या अभ्यासाची जिज्ञासा जागृत करणे, हा लेखकाचा मर्यादित हेतू पुस्तकातून नक्कीच साध्य होऊ शकेल.

(साहित्यविचार : प्रा. अरविंद वामन कुलकर्णी, प्रतिमा प्रकाशन, पुणे, ३०, पृष्ठे १९८, मूल्य रु. ७०/-)

(३, अन्नपूर्णा, १२५९, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, पुणे ४११००२.)

---

प्रा. अरुणा म्हाळंक

## कसोटीला न उतरणारी कादंबरी

इतिहास हा कोणत्याही राष्ट्राच्या जीवनातील महत्त्वपूर्ण घटक असतो. अनेकदा या कालखंडामुळेच ते राष्ट्र जिवंत राहिलेले असते. भविष्याकडे पाहण्याची दृष्टी इतिहासातून मिळते. म्हणून इतिहास जनतेपुढे मांडणे हे जोखमीचे काम असते. जे जसे घडले तसेच मांडणे, ऐतिहासिक कालक्रम, घटना यांच्याशी कसलीही तडजोड न करता, विपर्यास न

करता लिहिणे म्हणूनच कठीण असते.

प्रभाकर दिघे यांची नानासाहेब पेशवे यांच्या जीवनावरील 'संन्यासी' ही कादंबरी मात्र ऐतिहासिक कादंबरीच्या कोणत्याच कसोटीला उतरत नाही.

अगदी लहान वयापासूनच लेखकाच्या मनात '१८५७'च्या बंडावर पुस्तक लिहिण्याचे घोळत होते. त्यानंतर श्री. दिघे यांची अनेक पुस्तकेही प्रसिद्ध झाली आहेत. परंतु ही ऐतिहासिक कादंबरी १८५७ च्या बंडावर न लिहिता नानासाहेब पेशवे यांच्या जीवनावर लिहिली आहे. त्यासाठी बरेच वाचन केल्याचे ते सांगतात, परंतु अशी पुस्तकांची नामावली व संदर्भसूची मात्र लेखकाने दिलेली नाही. केवळ एका इंग्रजी पुस्तकाचा नामोल्लेख लेखकाने केला आहे. 'संन्यासी' हे एकंदर त्याच पुस्तकावर आधारित असावे असे वाटते. वास्तविक पेशव्यांवर मराठीत विपुल वाङ्मय उपलब्ध असताना लेखकाला इंग्रजी पुस्तकच आकर्षक, आधारभूत व विश्वसनीय का वाटते हे कोडे संपूर्ण पुस्तक वाचूनही उलगडत नाही.

तात्या टोपे हे 'टोपे' या आडनावानेच सर्वज्ञात आहेत. येथे श्री. दिघे यांनी मात्र त्यांना 'टोपी' हे आडनाव बहाल केले आहे. असा बदल करण्याचे कारण उमगत नाही.

ऐतिहासिक लेखन म्हटले की, त्या भाषेला ऐतिहासिक रुबाब व प्रासादिकता असणार ही अपेक्षा असते, किंबहुना अशाच भाषेत लेखन करणे हेच लेखकाचे कौशल्य असते. पण येथे लेखकाने ह्या गोष्टीला पूर्णपणे फाटा दिला आहे. यातील पेशवे स्वतःला 'आम्ही' न म्हणता सामान्य माणसासारखे 'मी' म्हणतात. उदा. १) मला तुमच्याकडून खोटे नकोय. २) मी ऐकायला आतुर झालो आहे. इ. ही अशी वाक्ये पेशव्यांच्या व्यक्तिरेखेला अधिकच मृतवत बनवतात. पेशव्यांचे सेवकसुद्धा पेशव्यांना 'अहो पेशवे' असेच संबोधतात. उदा. 'पेशवे, या पेचप्रसंगातून आपली सहज सुटका होईल असे वाटते.' (पान ६२) अझीमखान हाही 'पेशवे' असेच संबोधतो. त्यामुळे यातील संवाद हे पेशवे दरबारातील न वाटता एखाद्या कचेरीतील मित्रांचे वाटतात. यात लेखकाने पेशवे आणि त्यांची इतर दरबारी मंडळी यांच्यातील सलगी ठायी ठायी आढळते व वाचताना ती अतिशय खटकते.

तात्या टोपे यांना स्वतःच्या पत्नीकडे नानासाहेब पाठवतात. तात्या जेव्हा तेथून परततात, तेव्हा पेशवे त्यांना विचारतात, 'मान वर करून तिचं सौंदर्यपान केलंत की मान खालीच घातलीत?' (पान ११८) पेशवे व टोपे यांच्यातील हा संवाद पेशवेपदाची आब न राखणारा तसेच ऐतिहासिक कादंबरीतील पात्रांशी विसंगत वाटतो.

'संन्यासी' या नावाबद्दलही असाच विचार मनात येतो. कथानकाच्या अंतिम टप्प्यात पेशव्यांबरोबरची सर्वच माणसे या ना त्या कारणाने त्यांच्यापासून दुरावतात. मृत्यू पावतात. त्याच कालखंडात पेशव्यांमागील इंग्रजांचा ससेमिरा तीव्र बनतो. म्हणून एकटे पडलेले पेशवे स्वतःला इंग्रजांपासून वाचवण्याच्या, जपण्याच्या उद्देशाने संन्यास वेष धारण करतात

व दूर निघून जातात. ही गोष्टदेखील पेशव्यांच्या लौकिकास न शोभणारी आहे. तथापि लेखकाला मात्र पेशव्यांची ही दांभिकताच इतकी महत्त्वाची वाटते की, तेच नाव कादंबरीला देऊन लेखक त्यावर अधिक प्रकाश टाकतो.

(संन्यासी : प्रभाकर दिघे, नवचैतन्य प्रकाशन, मुंबई, पृष्ठे ४३६, मूल्य रु. १७५/-)

(४२/६७७, लोकमान्यनगर, पुणे ३०)

---

द. धों. रत्नपारखी

# आठवणींचा त्रोटक आलेख

आयुष्याच्या वाटा कशी वळणे घेतात आणि त्या वाटांवर कोणत्या प्रकारची माणसे भेटतात यावर जीवनाचे रंग बदलणे अवलंबून असते. कधी आयुष्य रूक्ष बनते तर कधी समृद्ध. आयुष्यात चांगली माणसे भेटणे व त्यामुळे आयुष्याला अर्थ प्राप्त होणे हा एक भाग्ययोगच म्हटला पाहिजे. असा भाग्ययोग लाभलेले डॉ. राम बिवलकर यांनी त्यांना आयुष्यात अवचित भेटलेल्या मोठ्या माणसांच्या आठवणी आपल्या 'अवचित पडल्या गाठी' या पुस्तकात सांगितल्या आहेत. प्रसिद्ध साहित्यिक (ना. सी. फडके, महादेवशास्त्री जोशी, साने गुरुजी, गो. नी. दांडेकर, रा. भि. जोशी इ.), प्रकाशक (केशवराव कोठावळे), कलावंत (सुधीर फडके, चिंतामणराव कोल्हटकर), राजकीय नेते व समाजसेवक (डॉ. आंबेडकर, एस. एम. जोशी, अण्णासाहेब सहस्रबुद्धे, जयंतराव टिळक इ.) अशा विविध व्यक्तींच्या गाठी पडल्या. या संपन्न व्यक्तिमत्त्वांच्या सहवासाच्या सकस आठवणींचा रंजक आलेख खरेतर वाचकांपुढे यावयास हवा होता. या विविध व्यक्तींचे गुणविशेष, स्वभावाच्या विविध छटा बहारीने प्रकट व्हावयास हव्या होत्या. परंतु यातील बरेचसे लेख केवळ काही आठवणी सांगण्यापलीकडे किंवा त्यांची नोंद करण्यापलीकडे जात नाहीत. दत्तू बांदेकरांची ऑफिसमध्ये घडलेली ओझरती भेट, साने गुरुजींची वडिलांच्या घरी झालेली भेट, पु. भा. भावेंची व्याख्यानानिमित्त झालेली भेट, रामेश्वरदास बिर्लांची रेल्वेच्या डब्यातील भेट, सुधीर फडकेंची गाण्याच्या कार्यक्रमासंबंधात झालेली भेट, एस.एम. जोशींची शनिवार वाड्यासमोरील सभेच्या गर्दीतील भेट या फार त्रोटक आणि स्वभावाच्या एखाद्या अंगाचे पुसट दर्शन घडविणाऱ्या वरवरच्या आठवणी वाटतात. त्यात त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचे दर्शन होत नाही. चिंतामणराव कोल्हटकरांची आठवण ही चिंतामणरावांचे व्यक्तिमत्त्व सांगण्याऐवजी केवळ गडकऱ्यांच्या आठवणी सांगणारे पात्र म्हणूनच सांगितली आहे. आचार्य अत्रे यांच्या आठवणीत त्यांच्या विनोदी किश्शांचीच वर्णने

जास्त आहेत. देवरामभाऊंच्या लेखात त्यांच्यावरील खटल्याचीच माहिती सांगितली आहे. पं. महादेवशास्त्री जोशी, बाबासाहेब आंबेडकर, रा. भि. जोशी, केशवराव कोठावळे, ना. सी. फडके, नरहर कुरुंदकर इत्यादींच्या आठवणी मात्र थोड्या आत्मीयतेने व विस्ताराने सांगितल्या आहेत. परंतु त्यातही त्या व्यक्तींचे व्यक्तिमत्त्व पूर्णपणे उलगडलेले नाही. या व्यक्तींचे स्वभावविशेष, गुणदोष, भावभावना यांचे विश्लेषण करून त्या व्यक्तिमत्त्वांचा वेध घेतला गेला नाही. अवचित घडलेल्या या आठवणींच्या गाठी अशा रीतीने सुरगाठीच राहिल्या आहेत. त्रोटक नोंदी आणि वरवरच्या चित्रणामुळे वाचकांच्या मनात या आठवणींची निरगाठ बसू शकत नाही.

लेखकाची भाषा साधी, सुबोध आहे व वर्णनशैली आकर्षक आहे. काही लेखांतील लेखनात त्यांची लेखणी आश्वासक वाटते. तो आश्वासक सूर पकडून लेखन झाले तर पुढील लेखन वाचकांच्या मनाची पकड घेणारे होऊ शकेल याची खात्री मात्र या पुस्तकातून मिळते.

(अवचित पडल्या गाठी : डॉ. राम विठ्ठलकर, मोरया प्रकाशन, डोंबिवली, पृष्ठे १४५, मूल्य रु. ५०/-)
(विनायक स्मृती, प्रभात रस्ता, पुणे ४११००४.)

---

प्रा. सुनील भा. शिंदे

## अनिलांच्या कवितेची वैशिष्ट्यपूर्ण समीक्षा

एकूणच मराठी कवितेवर मूलगामी परिणाम साधणारी कविता म्हणून आत्माराम रावजी देशपांडे ऊर्फ 'अनिल' यांच्या रचनेचा निर्देश केला जातो. आपल्या काव्यातून प्रेमभावनेला प्राधान्याने स्थान देणाऱ्या अनिलांनी आपल्या कवितेला प्रायोगिक स्वरूपाची दिशा प्राप्त करून दिली आहे. प्रायोगिक तत्त्वावर साकारलेल्या अनिलांच्या काव्यरचनेने मराठी साहित्यात आपले स्वतंत्र अस्तित्व आणि वेगळेपणही जपले आहे.

कवी अनिलांच्या काव्यविश्वाचा अभ्यासपूर्ण मागोवा घेणारा आस्वादक असा समीक्षणपर ग्रंथ प्राचार्य डॉ. पंडितराव पवार यांनी 'अनिलांची कविता : स्वरूप आणि आविष्कार' या शीर्षकाने सिद्ध केला आहे. प्राचार्य पंडितराव पवार यांनी प्रस्तुत ग्रंथाबाबत घेतलेल्या परिश्रमाच्या संदर्भात येथे सांगावयाचे वेगळे वैशिष्ट्य म्हणजे तीन स्वतंत्र परिशिष्टे ग्रंथाच्या अखेरीस समाविष्ट केलेली आहेत. 'निवडक अभ्याससूची व संदर्भ साहित्य सूची' तसेच अनिलांच्या काव्यासंबंधी काही ख्यातकीर्त साहित्यकारांची मते आणि अनिलांच्या जीवनातील महत्त्वपूर्ण घटना या बाबतीत प्रामुख्याने परिशिष्टांमध्ये साक्षेपाने चर्चा केली आहे. अनिलांची कविता उमलताना, अनिलांच्या व्यक्तिमत्त्वाचा कवितेतील

आविष्कार, त्यांच्या काव्यातील प्रेमभावना अनिलांच्या काव्यातील सामाजिक आणि राष्ट्रीय जाणिवा, काव्यातील निसर्ग, कवितेचा घाट आणि मुक्तछंदाचे प्रवर्तन या विषयावरील सात प्रकरणांच्या स्वरूपात डॉ. पवार यांचा हा समीक्षेवरील ग्रंथ प्रकटला आहे.

अनिलांच्या काव्यातील सामाजिक आणि राष्ट्रीय जाणिवांचा शोध घेणाऱ्या डॉ. पंडितराव पवारांनी 'अनिलांच्या काव्यातील विचारसरणी संपूर्णतया समाजवादावर उभारलेली आहे, ती विनाशापेक्षा निर्मितीला महत्त्व देते' यासारख्या विधानातून तर्कशुद्ध भूमिका व्यक्त केलेली आहे. (पृष्ठ १०६) या संदर्भात आधारादाखल लेखकाने 'सांगाती' तसेच 'पेर्ते व्हा'सारख्या कवितांविषयी विश्लेषण केलेले आहे. मराठी साहित्याच्या अभ्यासकांना हा ग्रंथ स्वागतार्ह वाटेल असा विश्वास व्यक्त करताना ज्ञानपीठ पुरस्कार विजेते कविवर्य वि. वा. शिरवाडकर (कुसुमाग्रज) यांनी ग्रंथाच्या सुरुवातीस 'स्वागत' करताना लिहिले आहे– 'निफाड महाविद्यालयाचे प्राचार्य डॉ. पंडितराव पवार यांनी अनिलांच्या काव्याचा रसिकतेने आणि बारकाईने अभ्यास करून, काव्याच्या सर्व वैशिष्ट्यांचे सांगोपांग आणि मार्मिक विवेचन केले आहे.' अनिलांच्या सामाजिक कवितेचे विशेष स्पष्ट करताना डॉ. पवार यांनी या कवितेचे परंपरेशी असणारे नाते व समकालीन कविता आणि अनिलांची कविता यांच्या संबंधाविषयीचे स्पष्टीकरणदेखील केलेले आहे. (पृष्ठ ११७) अनिलांच्या कवितेचा घाट (फॉर्म) जाणून घेताना डॉ. पवारांनी निसर्ग व कवीचे अंतःकरण यांच्यातील भावोत्कट नात्याचा अनिलांच्या कवितेतून घेतलेला शोध स्पष्ट करताना पुढील काव्यपंक्तीचा निर्देश केलेला आहे.

*वेळ झाली भर माध्यान्ह,*
*माथ्यावर तळपे उन,*
*नको जाऊ कोमेजून*
*माझ्या प्रीतीच्या फुला रे" (फुलवात)*

अनिलांच्या काव्याचा अभ्यासपूर्ण आस्वाद घेताना लेखकाने व्यक्त केलेले निष्कर्ष पुरेसे स्पष्टीकरण देणारे ठरले आहेत.

अनिलांच्या काव्यासंदर्भात डॉ. पवार यांनी नामवंत साहित्यिक अनंत काणेकर, कुसुमाग्रज, वि. म. कुलकर्णी, कृ. ब. निकुंब, विंदा करन्दीकर, स. गं. मालशे इत्यादींच्या मुलाखती ग्रंथात समाविष्ट करून महत्त्वाची कामगिरी पार पाडली आहे. निसर्गाच्या माध्यमातून प्रकट होणारी कवी अनिल यांची मानवता विश्लेषणास घेताना डॉ. पवार यांनी 'पेर्ते व्हा' या कवितेबद्दल सखोल चर्चा केली आहे.

*"भिऊ भिऊ भिऊ, नका भिऊ भिऊ भिऊ*
*उठारे उठारे सत्वर सत्वर, तत्पर तत्पर*
*पेरा पेरा पेरा, नवबीजे पेरा*

अनुक्रमणिका

*नव्या आशा धरा, पेर ते व्हा परते व्हा"*

या कवितेवर भाष्य करताना डॉ. पवार म्हणतात, "हा संदेश देणारा पावशा केवळ पक्षी राहत नाही, तर दुःखाचे कढ सोसणारा, जीवनातील नवी उमेद बाळगणारा, नव्या जगाच्या निर्मितीचा संदेश देणारा महान प्रेषित वाटतो" याशिवाय प्रस्तुत कविता लेखकाला नवसृजनाला प्रेरणा देणारी, मानवता, आशावाद इ. भाव व्यक्त करणारी सर्वश्रेष्ठ कविता वाटते.

अत्यंत परिश्रमाने व अभ्यासपूर्ण रीतीने साकारलेला 'अनिलांची कविता : स्वरूप आणि आविष्कार' हा डॉ. पवार यांचा समीक्षा ग्रंथ मराठीत वैशिष्ट्यपूर्ण स्थान निर्माण करणारा ठरला आहे.

(अनिलांची कविता : स्वरूप आणि आविष्कार - डॉ. पंडितराव पवार, मोरया प्रकाशन, डोंबिवली (प) ४२१ २०२ मूल्य रु. ९०, पृष्ठे २२३)

(कमान वेस, आगरकर लेन, अकोले (जि. अहमदनगर) ४२२६०१.)

---

## साभार स्वीकार

**अनुभव तुकोबाचा :** संपा. हे. वि. इनामदार, स्नेहल प्रकाशन, पुणे, पृष्ठे २४९, मूल्य- १२०/-
**विमुक्त :** दादासो. मोरे, सुरेश एजन्सी, पुणे, पृष्ठे १५०, मूल्य- ८०/-
**इंग्रजी कसे शिकवावे :** रा. सी. सराफ, सुरेश एजन्सी, पुणे, पृष्ठे ९६, मूल्य- ४०/-
**सर्ज्या :** सुरेश पां. शिंदे, कॉन्टिनेंटल प्रकाशन, पुणे, पृष्ठे २५६, मूल्य- ७५/-
**भेसळ :** मु. शं. देशपांडे, मंजूळ प्रकाशन, पुणे, पृष्ठे ९६, मूल्य- ४०/-
**कृष्णमेघ :** उल्हास देवधर, सुनील प्रकाशन, ठाणे, पृष्ठे २३७, मूल्य- ८०/-
**हराळी :** अनंत भोयर, मेहता प्रकाशन, पुणे, पृष्ठे ९५, मूल्य- ४५/-

# साकेत प्रकाशनाची नवी पुस्तके

| क्र. | पुस्तकाचे नाव | लेखकाचे नाव | किंमत |
|---|---|---|---|
| १. | सामुदायिक आरोग्य आणि परिचारिका सेवा | डॉ. बरीदे/डॉ. कुलकर्णी | १५०-०० |
| २. | आंबा बाग | डॉ. अनंतराव पाटील | ६०-०० |
| ३. | पाणीच पाणी | शिरकांडे/वराडे | ६०-०० |
| ४. | भाजीपाला कीड आणि नियंत्रण | प्रा. दत्ताजी पवार | ६०-०० |
| ५. | कृत्रिम उपग्रह आणि अवकाशविज्ञान | सुधाकर भालेराव | ८०-०० |
| ६. | शास्त्रज्ञांची दैनंदिनी | प्रभाकर इनामदार | ७०-०० |
| ७. | दे दान सुटे गिऱ्हान | आर. के. त्रिभुवन | ७५-०० |
| ८. | दलितसाहित्य– चर्चा आणि चिंतन | गंगाधर पानतावणे | १००-०० |
| ९. | हैद्राबादचा मुक्तिसंग्राम आणि आम्ही | खोत/विर्धे | ९०-०० |
| १०. | ऐकण्याची कला | सतीश पोरे | ५०-०० |
| ११. | उर्वरित नंतर | भालचंद्र देशपांडे | ९०-०० |
| १२. | कागद किमया | अमर परदेशी | ५०-०० |
| १३. | आक्रंदन | शशिकांत तासगांवकर | ४५-०० |
| १४. | भारतीय नृपती | श. रा. देवळे | ५०-०० |
| १५. | दीपमाळ | श. रा. देवळे | ५०-०० |
| १६. | मुखवटे | जे. के. जाधव | ५५-०० |
| १७. | शेवंता जित्ती हाय | प्रल्हाद जाधव | ३०-०० |
| १८. | शेतीविषयक ४५ पुस्तके उपलब्ध | | |
| १९. | बाळवाङ्मय प्रकल्प पुस्तके ३०८ मिळतील. | | |
| २०. | ग्रंथालयास लागणारी सर्व रजिस्टर्स मिळतील. | | |

---

साकेत प्रकाशन प्रा. लि.

साकेत, ११५, म. गांधीनगर, फायरब्रिगेड मार्ग, स्टेशन रोड, औरंगाबाद ४३१००५

फोन : २६६९२, २६६९५

# कार्यवृत्त : जुलै-सप्टेंबर १९९४

**२० जुलै :** 'उमलते अंकुर' या, कवी माधव ज्यूलियन यांच्या जन्मशताब्दीनिमित्त सादर होणाऱ्या मासिक कार्यक्रमात नवोदित कवयित्री आश्लेषा महाजन यांचे कवितावाचन.

**२२ जुलै :** ज्येष्ठ ग्रामीण कथाकार कै. ग. ल. ठोकळ यांच्या स्मृतिदिनानिमित्त प्रा. म. ना. अदवंत यांच्या हस्ते दोन कथासंग्रहांना पारितोषिके देण्यात आली : (१) लचांड– संदानंद देशमुख, (२) एक एक काडी गवताची– अरुण जाखडे.

**३० आणि ३१ जुलै :** संतश्रेष्ठ सावतामाळी यांच्या स्मरणार्थ डॉ. ल. रा. नसिराबादकर यांची दोन व्याख्याने आयोजित करण्यात आली होती. विषय खालीलप्रमाणे :

१) संतसाहित्याच्या अभ्यासाची आवश्यकता,

२) तेराव्या शतकातील उपेक्षित संतांची कविता.

**१ ऑगस्ट :** म. सा. परिषद आणि दलित साहित्य परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने कै. अण्णा भाऊ साठे यांच्या जन्मदिनाचा विशेष कार्यक्रम प्रा. गो. म. कुलकर्णी यांच्या अध्यक्षतेखाली साजरा करण्यात आला. या प्रसंगी कै. अण्णा भाऊ साठे यांच्या



अनुक्रमणिका

व्यक्तिमत्त्वाविषयी आणि साहित्याविषयी डॉ. भालचंद्र फडके आणि श्री. अरुण खोरे यांची भाषणे झाली.

**५ ऑगस्ट :** कै. ना. सी. फडके यांच्या जन्मशताब्दीनिमित्त 'आम्हाला जाणवलेले ना. सी. फडके' या विषयावर डॉ. अ. रा. कुलकर्णी यांच्या अध्यक्षतेखाली डॉ. म. वि. गोखले, म. श्री. दीक्षित यांची भाषणे झाली.

**११ ऑगस्ट :** थोर साहित्यिक कै. पु. भा. भावे यांच्या पुण्यतिथीनिमित्त 'घणाघाती भावे' या विषयावर श्री. श्री. म. जोशी यांचे व्याख्यान झाले.

**१९ ऑगस्ट :** 'उमलते अंकुर' या मासिक कार्यक्रमात इंदुरच्या कवयित्री सौ. शोभा तेलंग यांचे कवितावाचन.

**२१ सप्टेंबर :** 'उमलते अंकुर' या कार्यक्रमात श्री. शेखर जोशी यांनी आपल्या कविता सादर केल्या.

**२२ सप्टेंबर :** डॉ. शं. गो. तुळपुळे आणि श्री. जयवंत दळवी यांच्या दुःखद निधनानिमित्त संयुक्त श्रद्धांजली सभा आयोजित करण्यात आली. या प्रसंगी डॉ. मु. श्री. कानडे, वि. स. वाळिंबे, डॉ. वीणा देव, डॉ. वि. भा. देशपांडे, डॉ. पंडित आवळीकर आणि गं. ना. जोगळेकर यांची श्रद्धांजलीपर भाषणे झाली. कार्यवाह डॉ. जोगळेकर यांनी म. सा. परिषदेतर्फे शोकप्रस्ताव मांडला.

**रवीन्द्र भट,** कार्यवाह

# शाखावृत्त

**श्रीरामपूर**

**११ ऑगस्ट : अभिनंदन व कृतज्ञता सोहळा :** जानेवारी १९९४ मध्ये घेण्यात आलेल्या म. सा. प. च्या विविध परीक्षांमध्ये उत्तीर्ण झालेल्या ९० विद्यार्थी-विद्यार्थिनींचे अभिनंदन श्रीरामपूर शाखेतर्फे करण्यात आले. त्यांना शाखेचे अध्यक्ष अॅड. रावसाहेब शिंदे ह्यांच्या हस्ते प्रमाणपत्रे देण्यात आली. तसेच ह्या विद्यार्थ्यांना ज्यांनी मार्गदर्शन केले, अशा २५ शिक्षक-प्राध्यापकांना अॅड. शिंदे ह्यांच्या हस्ते स्नेहवस्त्र व गुलाबपुष्प देऊन त्यांच्याविषयीची कृतज्ञता व्यक्त करण्यात आली. ह्या प्रसंगी येथील बोरावके महाविद्यालयाचे प्राचार्य वि. गो. कसबेकर ह्यांचे 'म. सा. प. परीक्षा : स्वरूप व महत्त्व' ह्या विषयावर व्याख्यान झाले. ना. सी. फडके जन्मशताब्दीनिमित्त शाखेतर्फे प्रा. बाबूराव उपाध्ये ह्यांनी ना. सी. फडके यांच्यासंबंधी माहिती कथन केली. साहित्य क्षेत्रातील यशाबद्दल श्रीरामपूर परिसरातील सात साहित्यिकांचे खास अभिनंदन करण्यात आले. ह्याप्रसंगी परीक्षेविषयीच्या अहवालाचे वाचन कार्यवाह सौ. मीनाताई जगधने ह्यांनी केले, आभारप्रदर्शन कोषाध्यक्षा प्रा. सौ. मंजिरी सोमाणी ह्यांनी केले. सोहळ्याचे सूत्रसंचालन

दुसरे एक कार्यवाह प्रा. डॉ. अविनाश कांबळे ह्यांनी केले.

**डॉ. अविनाश वि. कांबळे, सौ. मीनाताई जगधने,**
**कार्यवाह**

**जळगाव**

१६ जून रोजी प्रा. पंढरीनाथ कोळी यांच्या 'अपूर्ण चित्र' या कथासंग्रहाचे व श्री. दत्ता कुलकर्णी यांच्या 'सारे प्रवासी प्रीतीचे' या नाटकाचे प्रकाशन उत्तर महाराष्ट्र विद्यापीठाचे कुलगुरू डॉ. नि. कृ. ठाकरे यांच्या हस्ते झाले. अध्यक्षस्थानी डॉ. जी. डी. बेंडाळे होते. डॉ. प्रभाकर श्रावण चौधरी यांनी दोन्ही पुस्तकांविषयी समीक्षा– भाषण केले. पाहुण्यांचे स्वागत शाखेचे अध्यक्ष श्री. नारायण शिरसाळे यांनी केले तर उपाध्यक्ष प्रा. आत्माराम पाटील यांनी आभार मानले.

३० जुलै : कथालेखक व साहित्य संमेलनाचे माजी अध्यक्ष शंकर पाटील यांच्या श्रद्धांजलीचा कार्यक्रम आयोजित केला. श्री. नारायण शिरसाळे, नंदकुमार भारंबे, तुषार वाघुळदे, मधु वाघोडकर, प्रा. डी. व्ही. पाटील यांनी शंकर पाटील यांच्या साहित्याची ओळख करून देऊन त्यांना श्रद्धांजली अपर्ण केली.

१ ऑगस्ट : लोकशाहीर अण्णाभाऊ साठे जयंतीनिमित्त प्रा. डी. व्ही. पाटील यांचे 'कथा व कादंबरीकार साठे' या विषयावर व्याख्यान आयोजित केले होते. अध्यक्षस्थानी दलित कवी त्र्यंबक सपकाळे होते. नारायण शिरसाळे यांनी स्वागत व प्रास्ताविक केले. कार्याध्यक्ष नंदकुमार भारंबे यांनी आभार मानले.

**प्रा. नंदकुमार भारंबे, कार्याध्यक्ष**

**इस्लामपूर**

१ जुलै : येथील कर्मवीर भाऊराव पाटील महाविद्यालयातील मराठीच्या प्राध्यापिका सुमन शेटे या आपल्या दीर्घ सेवेतून निवृत्त झाल्यानिमित्त त्यांचा जाहीर सत्कार करण्यात आला. प्रा. शामराव पाटील यांनी स्वागत व प्रास्ताविक केले. प्रा. शैला सायनाकर यांनी त्यांना शाल व श्रीफळ देऊन सत्कार केला. या वेळी प्रा. सुमन शेटे यांच्या कार्याचा गौरव करणारी प्रा. दीपा देशपांडे, प्रा. दीपक स्वामी, प्रा. शैलजा सायनाकर, श्री. सदानंद बोंगाणे, श्री. गोपाळराव हसवनीस, प्रा. डॉ. एम. एस. हसबनीस यांची भाषणे झाली. श्री. शहानवाज मुल्ला यांनी आभार मानले. श्री. अरुण महाळुंगकर यांनी सूत्र संचालन केले.

८ जुलै : 'कवी कालिदास यांनी फक्त 'मेघदूत' हे एकच काव्य लिहिले असते तरी ते अजरामर झाले असते. त्यांच्या प्रतिभेची भरारी उत्तुंग अशी होती. मेघदूत हे एक प्रतिभेचे लेणे आहे' असे मनोगत प्रा. रा. पां. निपाणीकर यांनी प्रमुख पाहुणे म्हणून बोलताना व्यक्त

केले. श्री. विलास कुलकर्णी यांनी पाहुण्यांचे स्वागत व प्रास्ताविक केले. श्री. आर. डी पाटील यांनी प्रा. निपाणीकर यांचा गुच्छ देऊन सत्कार केला. श्री. मधुकर शेटे यांनी आभार मानले. श्री. सदानंद बोंगाणे यांनी सूत्रसंचालन केले.

**शहानवाज ज. मुल्ला, मधुकर शेटे,** कार्यवाह

**फलटण**

**१३ ऑगस्ट** रोजी आचार्य अत्रे जयंतीच्या निमित्ताने शालेय विद्यार्थ्यांच्या निबंध व वक्तृत्व स्पर्धा फलटण शाखेने आयोजित केल्या होत्या. इ. ८ वी ते १० वी व इ. ११ वी, १२ वी असे दोन गट स्पर्धासाठी आयोजित केले होते. निबंध स्पर्धेसाठी १३ विद्यार्थी-विद्यार्थिनींनी व वक्तृत्व स्पर्धेसाठी ७ विद्यार्थी-विद्यार्थिनींनी भाग घेतला. प्रत्येक गटातील प्रथम तीन क्रमांकांना पारितोषिके देण्यात आली. प्रथमतः आचार्य अत्रे यांच्या प्रतिमेस प्रमुख पाहुणे श्री. रा. वा. जोशी यांनी पुष्पहार घातला. अध्यक्षस्थानी शाखेचे अध्यक्ष प्रा. वि. अ. शेख होते.

श्री. रा. वि. जोशी यांच्या हस्ते स्पर्धकांना पारितोषिके देण्यात आली. निबंधस्पर्धेसाठी प्रा. बी. टी. वाल्मिक यांनी व वक्तृत्व स्पर्धेसाठी सौ. संध्या पेठकर यांनी काम पाहिले. शेवटी श्री. पी. आर. इनामदार यांनी आभार मानले. श्री. स. ग. तावरे यांनी कार्यक्रमाचे सूत्रसंचालन केले.

पत्रकार श्री. दत्तोपंत देशपांडे यांनी शाखेस आचार्य अत्रे यांचे छायाचित्र भेट म्हणून दिले.

**स. ग. तावरे,** कार्यवाह

**सोनई**

**४ ऑगस्ट** रोजी महाराष्ट्र साहित्य परिषद, सोनई शाखेच्या वतीने दिवंगत साहित्यिक कै. शंकर पाटील यांना भावपूर्ण श्रद्धांजली अर्पण करण्यात आली. सभेच्या अध्यक्षस्थानी शाखेचे कार्यकारी अध्यक्ष श्री. विनायकराव आंबरे पाटील होते. शाखेचे कार्यवाह श्री. वसंतराव भोर यांनी शाखेचा कार्यअहवाल सादर केला.

कार्यवाह श्री. नामदेवराव देसाई यांनी कै. शंकर पाटील यांच्या साहित्यावर चर्चा केली. सर्वश्री. डॉ. केदारनाथ चांडक, खरात, एस. बी. शेटे, अरविंद लिपाणे यांनी कै. शंकर पाटील यांच्यासंबंधी माहिती सांगितली. शेवटी श्री. विजय नांगरे यांनी आभार मानले.

**नामदेवराव देसाई,** कार्यवाह

**डोंबिवली**

**३१ जुलै :** सौ. माधवी घारपुरे यांच्या घरी, कविवर्य कै. बा. भ. बोरकर यांचा स्मृतिदिन

कार्यक्रम आयोजित करण्यात आला. वक्त्या होत्या खालसा महाविद्यालयाच्या प्राध्यापिका सौ. वृंदा कौजलगीकर. संत कवींपासून कै. मर्ढेकरांच्या कवितेपर्यंतचा आढावा घेऊन त्यांनी बोरकरांच्या कवितेचे वैशिष्ट्य सांगितले. 'तेथे कर माझे जुळती' व 'जीवन त्यांना कळले हो' या त्यांच्या कवितांनी कार्यक्रमाचा समारोप करण्यात आला.

कार्यक्रमाच्या सुरुवातीस श्री. माधव मनोहर, तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, बाळ कोल्हटकर, शंकर पाटील, व. शां. देसाई, डॉ. र. वि. हेरवाडकर या दिवंगतांना श्रद्धांजली वाहण्यात आली.

प्रख्यात कादंबरीकर प्रा. ना. सी. फडके यांच्या जन्मशताब्दीनिमित्त डोंबिवली शाखा व येथील ब्राह्मण सभा यांच्या संयुक्त विद्यमाने रविवार दि. २८ ऑगस्ट रोजी एक कार्यक्रम आयोजित केला होता. येथील पेंढरकर महाविद्यालयाचे उपप्राचार्य प्रा. श्यामकांत अत्रे प्रमुख वक्ते होते. समारंभाचे अध्यक्षस्थान सिडकोचे अध्यक्ष श्री. नकुल पाटील यांनी भूषविले.

'साहित्य शास्त्राचा विचार मांडणारे प्रा. फडके हे मराठीतले पहिलेच व एकमेव ललित साहित्यिक; तसेच कलेसाठी कला, या तत्त्वाचे आग्रही प्रतिपादक आणि हर्ष व क्षोभ या दोन प्रमुख रसांचा कल्लोळ होणे हाच उत्तम साहित्याचा आत्मा असतो असे फडक्यांचे ठाम मत होते,' असे विचार प्रा. अत्रे यांनी आपल्या भाषणात मांडले.

या प्रसंगी चित्रकार मुकुंद तळवलकर यांनी रेखाटलेल्या फडके यांच्या चित्राचे श्री. नकुल पाटील यांच्या हस्ते अनावरण झाले आणि डोंबिवली शाखा आयोजित कथास्पर्धेचा पारितोषिक वितरण समारंभही श्री. पाटील यांच्या हस्ते पार पडला. रोह्याचे सुनील कुलकर्णी यांना प्रथम क्रमांकाचे तर डोंबिवलीच्या सौ. माधवी घारपुरे व प्रा. सौ. वृंदा कौजलगीकर यांना द्वितीय पारितोषिक विभागून देण्यात आले व तृतीय पारितोषिक श्री. जयंत निंबाळकर यांना मिळाले.

डोंबिवली शाखेचे एक ज्येष्ठ आजीव सदस्य हरि रामचंद्र इनामदार (वय वर्षे ८७) यांचे नुकतेच निधन झाले. त्यांना श्रद्धांजली वाहण्यात आली.

**मधुकर देशपांडे, कार्यवाह**

**धुळे**

सुप्रसिद्ध समीक्षक प्रा. डॉ. श्रीपाल सबनीस यांच्या अध्यक्षतेखाली स्थानिक दिवंगत कवी कै. विद्याधर वैद्य यांचा स्मृतिदिन साजरा करण्यात आला. प्रमुख पाहुणे म्हणून दैनिक 'आपला महाराष्ट्र' चे कार्यकारी संपादक राजन खान उपस्थित होते.

श्री. राजन खान, जगदीश देवपूरकर, डी. बी. जगत्पुरिया यांनी कै. विद्याधर वैद्य यांच्या निवडक कविता सादर केल्या. प्रा. पुरुषोत्तम पाटील यांचे या वेळी भाषण झाले. सूत्रसंचालन प्रा. भगवान ठाकूर यांनी केले. आभार प्रा. राजश्री शेलकर यांनी मानले. कार्यक्रम यशस्वी

करण्यासाठी प्रा.पुं.म.चित्ते,आणि श्री.हि.रा.चौधरी यांनी सहकार्य केले.

मुंबईचे प्रसिद्ध कवी प्रा. भगवान भोईर आणि प्रा. गुरुदेव वैद्य यांच्या उपस्थितीत भारतरत्न डॉ. बाबासाहेब आंबेडकर जयंती साजरी करण्यात आली. कार्यक्रमाचे अध्यक्ष म्हणून डॉ.श्रीपाल सबनीस उपस्थित होते.

प्रा. भोईर यांनी फुले-आंबेडकर यांच्या विचारांवर आधारित परिवर्तनवादी साहित्य हेच खरे जीवनवादी साहित्य असल्याचे सांगितले. डॉ. सबनीस यांनी सर्व महापुरुषांच्या विचारांची बेरीज केल्यास सामाजिक समता व सुसंवाद निर्माण होण्यास मदत होईल असे सांगितले. प्रा. पुं. म. चित्ते यांनी आभार मानले. कार्यक्रम यशस्वी करण्यासाठी प्रा. सौ. राजश्री शेलकर,बी.बी.महाजन,पी.यू.पवार यांनी सहकार्य केले.

प्रसिद्ध कवी प्रा.डॉ.यशवंत मनोहर यांच्या काव्यवाचनाचा बहारदार कार्यक्रम साजरा झाला.कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी लोकसाहित्याचे अभ्यासक प्रा.डॉ.प्रभाकर मांडे होते.

या वेळी डॉ.मनोहर यांनी आपल्या निवडक कवितांचे वाचन केले.डॉ.प्रभाकर मांडे यांनी अध्यक्षीय भाषणात डॉ.मनोहर यांच्या कवितेचे वैशिष्ट्य सांगितले.

**३१ जुलै :** मसाप धुळे शाखा,प्रथमेश सांस्कृतिक मंडळ व भावना प्रकाशन यांच्या संयुक्त विद्यमाने श्री. सुभाष आहिरे यांच्या 'मोलकरीण' एकांकिका संग्रहाचे प्रकाशन डॉ. श्रीपाल सबनीस यांच्या हस्ते झाले.कार्यक्रमाचे अध्यक्ष म्हणून वा.रा.सोनार उपस्थित होते.

प्रा.पुरुषोत्तम पाटील,कविवर्य उत्तम कोळगावकर,प्रा.रविकिरण झोळ इत्यादी प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित होते.

सर्वश्री महेश जोशी, डी. व्ही. सुतार, प्रशांत जगदेव, डॉ. खलील देशमुख इत्यादींनी कार्यक्रम यशस्वी करण्यास मोलाचे सहकार्य केले.

**१ ऑगस्ट :** कै. अण्णाभाऊ साठे जयंतीनिमित्त सुप्रसिद्ध विचारवंत श्री. शरद पाटील यांचे व्याख्यान झाले. त्यांनी 'फक़िरा' कादंबरीच्या अनुषंगाने आपले मौलिक विचार मांडले. वर्गवादी जाणिवेतून माणसांचे दुःख मांडणारा हा प्रतिभासंपन्न लेखक उपेक्षित राहिल्याबद्दल त्यांनी खेद व्यक्त केला. हा कार्यक्रम मसाप व आंबेडकरी साहित्य संसद यांच्या संयुक्त विद्यमाने घेण्यात आला.

व्याख्यात्यांचा परिचय डी. बी. जगत्पुरिया यांनी करून दिला. संचालन प्रा. भगवान ठाकूर यांनी केले. कार्यक्रमासाठी सर्वश्री गणेश निकुंभ, मिलिंद पवार, प्रा. पुं. म. चित्ते, दीपक निकम, सतीषचंद्र कुलकर्णी यांनी सहकार्य केले.

**५ ऑगस्ट :** फडके जन्मशताब्दी व्याख्यान : 'कै. ना. सी. फडके प्रतिभेची साधना करणारे साधक होते. त्यांच्या लेखणीत वाचकांना खिळवून ठेवण्याचं सामर्थ्य होतं,' असे विचार फडके जन्मशताब्दी निमित्त आयोजिलेल्या कार्यक्रमाचे अध्यक्ष म्हणून लोकसाहित्याचे अभ्यासक प्रा.डॉ.प्रभाकर मांडे यांनी मांडले.

श्री.रवीन्द्र पिंगे यांचेही या वेळी भाषण झाले.प्रास्ताविक व स्वागत प्रा.पुरुषोत्तम पाटील यांनी केले. पाहुण्यांचा परिचय प्रा. भगवान ठाकूर यांनी करून दिला. सूत्रसंचालन डी. बी. जगत्पुरिया यांनी केले. विविध क्षेत्रांत स्पृहणीय यश व पुरस्कार मिळवणाऱ्या सर्वश्री प्रा. के. जी.पाटील,प्रा. भगवान ठाकूर,आर.डी.देवरे,ज्येष्ठ पत्रकार कांतीलालजी गुजराथी व प्रा.सौ. नीला पांढरे यांचा या वेळी सत्कार करण्यात आला.प्रा.पुं.म.चित्ते यांनी आभार मानले.

डी. बी. जगत्पुरिया, कार्याध्यक्ष





अनुक्रमणिका

